# समाज-विकास

## समाज आणि संस्कृति यांसंबंधींचे विचार

संपादक
प्रो० श्रीकृष्ण केशव क्षीरसागर

कॉंटिनेंटल् प्रकाशन, टिळक रोड, पुणें २.

# आधुनिक गद्याचा विकास—

मराठीच्या अभ्यासाचा प्रवेश अलीकडे उच्च विद्यालयांतील सर्व वर्षांच्या वर्गांत झाला आहे. पहिल्या दोन वर्षांत सामान्यतः आधुनिक काव्य व गद्य यांचा थोडाफार परिचय अपेक्षिलेला असतो. गद्य आणि काव्य यांच्या लेखनाच्या उद्देशाप्रमाणेंच अभ्यासाच्या उद्देशांतही फरक असणें साहजिक आहे. आधुनिक काव्याच्या अध्ययनाचा उद्देश सहृदयतेचा विकास हा म्हटला, तर आधुनिक गद्याच्या अध्ययनाचा उद्देश, विचारांचा आणि अभिव्यक्तीचा विकास हा म्हणतां येईल. केशवसुत, तांबे, गडकरी, यांच्या कविता वाचून विद्यार्थ्यांनीं तशा कविता लिहाव्या अशी अपेक्षा नसते; तर तशा कवितांच्या पृष्ठभागीं असलेल्या भूमिकेशीं सहृदयतेनें समरस होण्यास शिकावें ही अपेक्षा असते. गद्य हें पद्याच्या मानानें अधिक सरळ आणि उघड असल्यानें, गद्यांतील वैयक्तिक भूमिकेशीं समरस होण्याचा तितकासा प्रश्न नसतो. त्यांतील विचारांचें बौद्धिक आकलन करणें व अभिव्यक्तीच्या धाटणीचें, म्हणजेच शैलीचें सूक्ष्म परिशीलन करणें, हा गद्याच्या अभ्यासाचा मुख्य भाग असतो. प्रत्येकावर कवि होण्याची सक्ती करतां येणार नाहीं हें जितकें खरें, तितकेंच गद्यलेखन प्रायः कोणालाच टाळतां येणार नाहीं, हेंही खरें आहे, असें म्हट-ल्यास फारशी अतिशयोक्ति होणार नाहीं. उच्च विद्यालयांतील पहिल्या दोन वर्षांतील मराठी गद्याच्या अभ्यासाचा उद्देश, आधुनिक गद्याच्या परिचया-इतकाच, 'अभिव्यक्ती' च्या शक्तीचा विकास हाही म्हणतां येईल. 'अभिव्यक्तीचा विकास' ऊर्फ 'गद्यलेखन' यासंबंधीं आपल्या विद्यार्थ्यांत बऱ्याच विपर्यस्त कल्पना दिसून येतात. 'विचार व्यक्त करतां येत आहेतच; कारण भाषा आपली आहे. तेच विचार आलंकारिक, प्रौढ आणि ढंगदार भाषेंत मांडणें, एवढेंच काय तें शिकायचें!' अशी अनेकांची कल्पना असते. तर कांहींची कल्पना, 'गद्याच्या अभ्यासानें विचारांची वाढ करावयाची', ही असते. या दोन्ही या कल्पना तितक्याशा बरोबर नाहींत. विचारांची

वाद करण्याची जबाबदारी केवळ मराठी या विषयावर नाहीं; आणि 'ढंगदार' लिहिण्याच्याही आधीं 'सरळ' लिहावयास शिकणें आवश्यक आहे. अपक्व लेखकांच्या लिखाणांत, आलंकारिकतेची अगर ढंगदारपणाची उणीव, हा मुख्य दोष नसतो; तर जें म्हणायचें आहे त्याहून वेगळेंच म्हटलें जाईल, असे शब्द लेखणींतून पडणें, हा मुख्य दोष असतो. प्रौढ विद्यार्थ्यांच्या हातून अनेकदां झालेल्या एका अगदीं ढोबळ प्रमादाचें उदाहरण देतों: 'लघुनिबंधांत विषय क्षुद्र असावा लागतो.' हें विधान घ्या.

यांत व्याकरणदोष नाहीं; आलंकारिकता अधिक हवी होती असें नाहीं; तर अभिव्यक्तींतील ढिलेपणा, भोंगळपणा हा त्यांतील दोष आहे. त्या विधानाच्या लेखकाला म्हणायचें आहे कीं, 'लघुनिबंधाला क्षुद्र विषय देखील चालतो;' 'विषय महत्त्वाचा अगर गंभीरच असावा लागतो असें नाहीं.' पण त्याला यासंबंधांत जें माहीत आहे तें; जें म्हणायचें आहे तें; आणि त्याच्या संग्रहीं जे शब्द आहेत ते, यांपैकीं कशावरच त्या लेखकाची पक्की पकड नसल्यानें, त्याचें तें विधान केवळ शिथिलच नव्हे, तर विपरीतही झालें आहे! अर्वाचीन गद्यप्रभूंच्या निवडक उताऱ्यांचा सूक्ष्म अभ्यास आणि दीर्घ व्यासंग केल्यानें, वर सूचित केलेल्या अगदीं प्राथमिक पण फार महत्त्वाच्या अर्थानें, अभिव्यक्तीची कला कमावण्यास मदत होईल, असें वाटतें.

या संग्रहांत अभ्यासार्थ उतारे निवडतांना, प्रमुख दृष्टि हीच ठेवलेली आहे. यांतील बरेचसे उतारे निबंधात्मक असले, तरी सर्वच निबंध नाहींत. निबंधाखेरीजही विचारप्रधान गद्यांतील उतारे घेतले आहेत. पण गीतारहस्य, नीतिशास्त्रप्रवेश, हिंदुधर्मसमीक्षा यांसारख्या शास्त्रीय ग्रंथांतील उतारे मात्र घेतलेले नाहींत. ज्यांत केवळ विचारांचा 'विलास' अगर 'खेळ' आहे, असेही निबंध घेतलेले नाहींत; तर समकालीन समाजाच्या उद्धाराच्या तळमळीनें वेगवेगळ्या क्षेत्रांत महत्त्व पावलेल्या व्यक्तींनीं लिहिलेलें प्रभावी गद्य, यांत निवडलें आहे. समाजसुधारणेची तळमळ, हेंच या स्फुट-रत्नांना सूत्रबद्ध करणारें सूत्र असलें, तरी केवळ सुधारकाग्रणींचेच उतारे घेतले आहेत असें नाहीं. मात्र देशाच्या उद्धाराला समाजसुधारणेची किंबहुना सामाजिक विचाराचीही तादृश गरज नाहीं, अशी ज्या गद्यप्रभूंची समजूत होती, त्यांचे उतारे—एकविधता ढळेल म्हणून—घेण्यांत आलेले नाहींत. तसेंच, ज्यांच्या

विचारांचा अगर शैलीचा, समाजमनावर मोठासा ठसा उमटलेला नाहीं, अशा लेखकांचे उतारे केवळ सर्वसंग्राहकता साधण्याकरितां अन्तर्भूत करून पुस्तकांचा आकार वाढविणें इष्ट वाटलें नाहीं. ज्यांना देशाच्या उद्धाराला सामाजिक पुनर्घटना अपरिहार्य वाटत होती व अशा पुनर्घटनेच्या चिंतनांतूनच ज्यांच्या प्रभावी गद्य लिखाणाचा जन्म झाला, अशा लेखकांचे उतारे '**समाजविकास**' या पुस्तकांत एकत्र केले आहेत.

नुकत्याच विसर्जन पावलेल्या इंग्रजी राजवटीनें, सुमारें सवाशें वर्षांपूर्वी आपल्या पहिल्या संपर्कानें महाराष्ट्राच्या एकूणएक जीवनांगांत आमूलाग्र बदल घडवून आणला. आज ज्याचा एवढा गौरवास्पद विकास झालेला दिसत आहे, त्या विचारप्रधान मराठी गद्याचा प्रारंभही इंग्रजांच्या संपर्कानेंच झाला. इंग्रजी अमलापूर्वी प्रायः पद्यात्मक रचनेकडेच कल अधिक असला, तरी गद्याच्याही कांहीं प्रकारांचा विकास पुष्कळच झाला होता. बखरी आणि राजकारणी पत्रव्यवहार हें या गद्याचें प्रमुख स्वरूप होतें. या दोन्ही प्रकारांत तत्कालीन राजकीय घडामोडींचेंच चित्र प्रायः असलें, तरी वाङ्मयीन सौंदर्यांत ज्यांची बरोबरी करणारे ग्रंथ पुन्हा होणें मुष्किल आहे, असें '**भाऊसाहेबांच्या बखरी**'[1] सारखे सुंदर ग्रंथही त्यांत होऊन गेले. क्वचित् रामचंद्रपंत अमात्यांच्या '**आज्ञापत्रा**'[2] सारखे स्वतंत्र विषयावरील सूत्रमय ग्रंथही होऊन गेले. केवळ आधुनिक समजली जाणारी आत्मरतीची प्रवृत्ति ज्या पुस्तकांत इंग्रजशाहीपूर्वीच उमटून गेली, असें नाना फडणिसांच्या छोट्याशा आत्मचरित्रासारखें असाधारण पुस्तकही क्वचित होऊन गेलें !

तथापि जुन्या आणि नव्या गद्यांतील फरक हा केवळ वाङ्मयप्रकारांचा अगर वाङ्मयविषयांचा नाहीं. तो केवळ शब्दयोजनेचा ( Diction चा ) अगर शैलीचा ( Style चा ) ही नाहीं. तो फरक मूलतः वाचकवर्गाचा आहे हें लक्षांत घेतलें पाहिजे. इंग्रजी अमलानंतर थोड्याच दिवसांत सार्वत्रिक शिक्षणाचा—निदान सार्वजनिक शिक्षणाचा—पाया घातला गेला. या देशाचे

१. भाऊसाहेबांची बखर : लेखक कृष्णाजी शामजी. खरा लेखक चिंतो कृष्ण वळे, असा ग्वाल्हेर येथील आनंदराव फाळके यांचा नवीन शोध. ( डॉ. तुळपुळे, महाराष्ट्र सारस्वत पुरवणी १९५१ )

२. आज्ञापत्र : लेखनकाल इ. स. १७१६. ( राज्याभिषेक शक ४२ ).

लोक आपल्या हजारों वर्षांच्या इतिहासांत पहिल्याप्रथमच आन्तरराष्ट्रीय तुलनेच्या डोळ्यांनीं पाहूं लागले. शिकलेल्यांच्या पहिल्या पिढीला स्वजनां-संबंधीं निकडीचें कर्तव्य दिसूं लागलें. ते स्वजनांना उद्देशून लिहूं लागले. त्यांचे लेख व ग्रंथ वाचणारांची संख्या दरसाल वाढूं लागली. पण या सर्व गोष्टींचें श्रेय सार्वत्रिक शिक्षणाइतकेंच छापखान्यांच्या आगमनाकडेहीं जातें !

नानासाहेब पेशवे यांच्या अगर गोविंदराव काळे यांच्या कांहीं सुंदर पत्रां-सारखीं पत्रें तर एकेका वाचकाकरितांच असणार; पण जुन्या बखरी देखील अल्पसंख्य वाचकांच्याच हातीं जाणार, हें त्यांच्या कसबी लेखकांना पुरतें माहीत होतें. नव्या गद्याची स्थिति तशी नव्हती. आतां सर्वच वाचूं लागणार, याची जाणीव इंग्रजी अमलाबरोबर निर्माण झालेल्या लेखकांना होती, व यामुळें सार्वजनिक शिक्षणाप्रमाणेंच 'सार्वजनिक' गद्यालाही प्रारंभ, इंग्रजी अमलानंतर झाला म्हटलें तर चूक होणार नाहीं. गद्याचा अभ्यास करीत असतां, ही 'वाचकांची दृष्टि' लक्षांत न आल्यानें पुष्कळच विपरीत कल्पना रूढ होतात. या बाबतींत लोकहितवादीसंबंधींचे प्रचलित ग्रह उदाहरण म्हणून उल्लेखिण्यासारखे आहेत. स्वजनांचें हित डोळ्यापुढें ठेवून विपुल आणि चिरस्थायी गद्य लिहिणारे पहिले लेखक लोकहितवादी हेच होत. (लेखनारंभ १८४८). यांनीं असंख्य निबंध लिहिले; तसेच अनेक ग्रंथही लिहिले. पृथ्वीराज चव्हाणाचें चरित्र, स्वाध्याय, गीतातत्त्व, आगमप्रकाश, ऐतिहासिक गोष्टी (तीन खंड), लंकेचा इतिहास, गुजराथचा इतिहास (भाषान्तर आणि विस्तृत स्वतंत्र विवेचन) यांसारखे अनेक बहुमोल ग्रंथही त्यांनीं लिहिले. तथापि त्यांच्या शतपत्रांतील व स्फुट-लेखांतील विशिष्ट शैली-वरून, त्यांच्या लेखनांत कलेचा व सुसंस्कृततेचा अभाव होता,—इतकेंच नव्हे, तर त्यांच्या लेखनांत, आचरटपणा व गांढवळपणा होता, अशा प्रकारचे अभिप्राय अनेकांनीं व्यक्त केले आहेत. एके ठिकाणीं तर 'त्यांची भाषा इंग्रजी वळणाची होती' असा विलक्षण अभिप्रायही व्यक्त करण्यांत आला आहे! लोकहितवादींचा उद्देश आणि वाचकवर्ग ध्यानीं घेतल्यास, यांतील बरेच गैरसमज टाकून द्यावे लागतील.

विष्णुशास्त्रींच्या काळीं सुशिक्षित वाचकवर्ग निर्माण झालेला होता. नव्या पदवीधरांना, आपण इंग्रजांशीं आधुनिक लोकशाहीच्या आयुधांनीं सामना

देऊं शकूं ' असा पहिलावहिला आत्मविश्वास वाटूं लागला होता. विष्णुशास्त्रींच्या नंतरच्या पिढ्या प्रौढ, पल्लेदार, आणि स्वजनगौरवयुक्त गद्य वाचणाऱ्या—व बहुधा लिहिणाऱ्याहि—होत्या. त्या फिरून लोकहितवादींच्या गद्याकडे वळतांच, त्यांना एकदम तफावत दिसणें साहजिक होतें. तथापि आपल्या सुस्त, स्वयंमन्य, आणि अशिक्षित जातिबांधवाकरितां परकीय अमलाच्या पहिल्याच पिढींत लिहूं लागलेल्या या पुरुषाचें गद्य, इतकें सडेतोड व फटकळ नसतें, तरच आश्चर्य. तें असें नसतें, तर त्यास 'हितवादी' तरी खासच म्हणतां आलें नसतें. पण आजचे वाचक डोळ्यांपुढें धरून आणि चिपळूणकरांसारख्यांचा भाषागौरवाचा हेतु इतरत्रही गृहीत धरून, पहिल्या पिढींतील या वैतागलेल्या देशभक्ताच्या लिखाणाकडे पाहिल्यानें, असा दुष्ट ग्रह निर्माण झाला आहे. लोकहितवादींचा उल्लेख 'देशभक्त' म्हणून करणें, हेंही वस्तुतः रूढ पद्धतीला सोडूनच आहे! कारण, स्वजनांच्या गुणगौरवावर भर देणें म्हणजे देशप्रेम, अशी कल्पना चिपळूणकरांच्या स्वजनगौरवामुळें निर्माण झाली. पण लोकहितवादींनीं यच्चयावत् स्वजनांची निंदा केली होती, असेंही म्हणतां येत नाहीं. खरें ज्ञान आणि खरा धर्म यांच्याऐवजीं भाकड कथा आणि वर्षांतून साडेतीनशें व्रतें यांचें रान ज्यांनीं माजूं दिलें, त्या वरिष्ठ वर्गावर आणि विशेषतः रावबाजीच्या काळच्या पुण्यावर त्यांचा कटाक्ष होता. त्यांच्या शतपत्रांत त्यांनीं नाना फडणविसाचें शहाणपण निकालांत काढलें आहे; परंतु 'राजस्तानचा इतिहास' या भाषान्तरित पुस्तकाच्या स्वदस्तुरच्या टीपेंत, त्यांनीं शिवाजी महाराजांस प्रतिरामचंद्र म्हणून गौरविलें आहे. त्यांनीं ब्राह्मणांना अत्यंत कडक शब्दांत दूषण लाविलें आहे. पण त्याबरोबरच आपल्याकडील ब्राह्मण, कायस्थ यांसारख्या विद्यापरंपरा असलेल्या जाती युरोपियनांहून बुद्धीनें वरचढ असतात, असा अभिप्राय इंग्रजांना भूदेव मानण्याच्या काळांत दिला आहे!

लोकहितवादींच्याच स्फुटलेखनांतील भाषेहून त्यांची ग्रंथांतील भाषा वेगळी आहे. कारण ग्रंथलेखनांत त्यांनीं डोळ्यापुढें ठेवलेला उद्देश व वाचकवर्ग वेगळा होता. वस्तुस्थिति अशी आहे कीं आंग्लयुगपूर्व बखरींची शैली आणि कृष्णशास्त्री यांच्यापासून सुरू झालेली आधुनिक पुणेरी शैली, यांना सांधून घेणारा दुवा म्हणजे लोकहितवादींची शैली होय. लोकहितवादी हे

कृष्णशास्त्रीहून एक वर्षानें वडील. कृष्णशास्त्रींनीं स्वजनांच्या ऐतिहासिक दोषांनीं बेचैन होऊन स्वतंत्र लिहिलें असतें तर बहुधा लोकहितवादींच्या शैलींतच लिहिलें असतें. परंतु त्यांचें गद्य प्रायः इंग्रजी कथावाङ्मयाच्या भाषान्तराच्या रूपाचें अगर शालेयज्ञानवर्धक निबंधाच्या रूपाचें असल्यानें, तें प्रौढ, सौम्य, व संस्कृतप्रचुर आहे.

तथापि टिळकांच्या पूर्वींच्या सर्वच लेखकांत—विष्णुशास्त्री चिपळूणकरांतही एक प्रकारचा ओबडधोबडपणा ( crudeness ) आहेच, असें दिसून येईल. 'कां कीं' 'असो' यासारख्या पदांचा सुकाळ, हा तर विष्णुशास्त्रींच्या शैलींतील जुनाटपणा आणि ढिलेपणा जाणवून देतोच; पण त्यांच्या निबंधाची जातही एकप्रकारें जुनाटच होती. लॉर्ड मेकॉले या प्रख्यात इंग्रज निबंधकाराचे अनेक दोष व गुण चिपळूणकरांनीं कळत न कळत उचलले होते. पण शंभरपानी मेकॉलेशाही निबंधाला अर्वाचीन काळांत चिपळूणकरांखेरीज फारसे अनुयायी मिळण्याचा संभव नाहीं! चिपळूणकरांच्या शैलीचा परिणाम टिळकांच्या नंतरच्या ( टिळकांच्या नव्हे ) बहुतेक सर्व पिढ्यांवर झाला आहे. परंतु त्यांचा मेकॉलेछाप निबंधप्रकार पुढें चालू करण्याचें धाडस कोणीही केलें नाहीं. कारण बारा बारा महिने मागील अंकावरून पुढें चालणारा चिपळूणकरी निबंध, आधुनिक काळांत लोकप्रिय होण्यासारखा नव्हता. पल्लेदार पण समतोल पेललेलीं वाक्यें, भडक आणि भुरळ पाडणारी शैली, स्वजनगौरवाचें आणि आत्मसंतुष्टतेचें मादक वारें, निःशंक विचार आणि ठसठशीत मांडणी, या सर्व दोषसंपृक्त गुणांत आणि गुणप्राय दोषांत, चिपळूणकर हे कळत न कळत मेकॉलेसंप्रदायाचे होते, पण त्यांच्याहून अधिक विद्वत्ता, अधिक कळकळ, अधिक तर्कशुद्धता आणि अधिक गांभीर्य असलेली परंपरा, त्यांच्या हयातींतच टिळकआगरकरांनीं सुरू केली होती.

चिपळूणकरी निबंधाचीच परंपरा टिळक आगरकर यांनीं चालविली असें म्हणणें बरोबर नसलें तरी चिपळूणकरांच्या शैलीचा परिणाम त्यानंतरच्या सर्वच पिढ्यांवर दिसतो, हें मात्र कबूल करावें लागेल. त्यांच्या भाषेंतील थाट आणि डौल; त्यांच्या विचारांतील स्वजनगौरव, आणि त्यांच्या कोटिक्रमांतील निःशंकपणा आणि भडकपणा, यांनीं त्यांच्या नंतरच्या पिढ्यांतील तरुण वाचकांना अक्षरशः धुंद करून साहित्यिक बनविलें, यांत शंका नाहीं.

' चिपळूणकर हे अर्वाचीन पुण्याचे जनक आहेत. ' या डॉ. केतकर यांच्या अभिप्रायांत[1] अर्वाचीन महाराष्ट्रावरील चिपळूणकरांच्या खोल ठशांचें यथार्थ वर्णन झालें आहे. पण चिपळूणकरांच्या कार्याचें मूल्यमापन, अर्वाचीन पुण्याच्या मूल्यमापनाप्रमाणेंच थोडेफार विवाद्य ठरणें मात्र साहाजिक आहे !

टिळकांची शैली आकर्षक नव्हती, किंबहुना टिळकांचे लेख शैलीच्या दृष्टीनें विशेष उल्लेखनीय नाहींत, अशा प्रकारचें मत प्रचलित होणें हा चिपळूणकरी शैलीच्या मोहनीचाच एक परिणाम होय. ' लेखनांत लेखकांच्या व्यक्तिमत्त्वाचा उमटलेला ठसा म्हणजे शैली ' असें शैलीचें लक्षण पाश्चात्य टीकावाङ्मयांत केलें जातें; व ' Style is the man ' ही आपल्याकडेही आतां प्रायः म्हणच झाली आहे; तथापि सहेतुक कलात्मकता दिसेल, तरच आज आपण 'शैली' असल्याची ग्वाही देतों. वास्तविक शैलींतही विविध भेद कल्पिणें शक्य आहे. मार्दवयुक्त ( Feminine ) आणि, कणखर ( Masculine ), सहेतुक कलाकुसर असलेली ( Sophisticated ) आणि सहज गुणांनीं अन्वित ( Unsophisticated ), यांसारखे भेद केल्याशिवाय विविध पुरुषांच्या विविध ' वाङ्मयी मूर्तीं'चें सौन्दर्य समजावून घेतां येणार नाहीं. लोकहितवादी अगर टिळक यांची शैली चिपळूणकरांच्या शैलीसारखी नाहीं; लोकहितवादींची तर स्थळाविशेषीं जुनाट व ओबडधोबडही वाटते. तथापि दोघांच्याही लेखनांत दोन प्रखर समाज-भास्कर डोळ्यापुढें उभे राहिल्यावांचून राहात नाहींत. त्यांची तळमळ, त्यांचा पोक्तपणा, त्यांचा तापटपणा, त्यांची कुशाग्रता, त्यांच्या प्रत्येक वाक्यांत प्रत्ययाला येते;—नव्हे, त्यांचा कडक आवाज आपण ऐकत आहों, त्यांची उग्र चर्या आपण पाहात आहों, आणि ती चर्याही आपणांकडे पाहात आहे, असें वाटल्यावांचून राहात नाहीं.

बुद्धीची तीक्ष्णता आणि मनाची निर्भयता यांचा प्रत्यय टिळकांच्या वाक्यावाक्यांतून येतो. पण टिळकांच्या भाषेचें आणखी एक वैशिष्टय म्हणजे चिपळूणकर—आगरकर, केळकर—कोल्हटकर, फडके--माडखोलकर, यांपैकीं कोणाहूनही त्यांचा संस्कृत काव्यग्रंथांशीं व शास्त्रग्रंथांशीं अधिक परिचय असून, त्यांची भाषा मात्र कमी संस्कृतप्रचुर आहे. शुद्ध आणि अशिथिल

---

१ केतकर यांचें खाजगीपत्र, व्यक्ति आणि वाङ्मय ( प्रो० क्षीरसागर ).

वाक्यरचनेच्या बाबतींतही, टिळकांची बरोबरी फारच थोडे मराठी गद्यलेखक करूं शकतील. शैलीच्या बाबतींत टिळकांना चिपळूणकरांइतके अनुयायी मिळाले नाहींत, हें सत्यही आहे आणि साहजिकही आहे. तथापि अर्वाचीन मराठी गद्यांत भाषा, विचार, आणि कोटिक्रम याचा ‘ कडकपणा ’ ज्या ज्या गद्यलेखकांत आढळतो, त्यांनीं त्यांनीं टिळकांचा थोडाफार वारसा मिळविला आहे असें म्हणतां येईल. एकच ठळक उदाहरण द्यायचें म्हटल्यास प्रो. त्र्यं. शं. शेजवलकर यांच्या शैलीचें देतां येईल. तथापि अद्यापही आलंकारिता आणि माधुर्य हेंच गद्य-शैलीचें प्रमुख घटक मानण्याकडे आपला कल असल्यानें, टिळक व लोकहितवादी यांच्या परंपरेचें व्हावें तितकें अभिज्ञतायुक्त निरीक्षण झालेलें दिसत नाहीं.

गद्यशैलीचा आणि निबंधाचा विकास अजमावीत असतां, आणखीही एक गैरसमज होत असल्याचें निदर्शनास येईल. पाश्चात्य देशांतील—विशेषतः फ्रान्स आणि इंग्लंडमधील—निबंधाच्या तुलनेनें आपल्यांतील निबंधांत कलात्मकता कमी दिसते, असा एक समज आहे. या दृष्टीनें निबंध-वाङ्मयाचें परीक्षण करून, आपल्याकडील निबंधांत ‘ आत्मनिष्ठा नसली तरी ध्येयनिष्ठा खचित आहे ’[1] हा विद्वानांनीं काढलेला निष्कर्ष खरा आहे. तरी लेख, गंभीर निबंध, प्रबंध ( दीर्घ-निबंध ), आणि ललित निबंध, या प्रकारांचें वेगवेगळें स्थान आणि महत्त्व आहे ही गोष्ट विसरून चालणार नाहीं. गंभीर निबंध जाऊन त्याच्या जागीं लघु आणि ललित निबंध आला, अशी स्थिति आपल्याकडेही नाहीं; पाश्चात्य देशांत तर नाहींच नाहीं. दोन्ही प्रकार प्रसंगभेदानें आणि प्रवृत्ति-भेदानें प्रत्येक कालखंडांत चालू राहण्यासारखेच आहेत व चालू राहिलेही आहेत.

व म्हणूनच आज लिहिला जाणारा गंभीर निबंध हा चिपळूणकरी परंपरेतलाच निबंध समजणें तितकेंसें बरोबर होणार नाहीं. आजच्या गंभीर निबंधांत शैली आणि मांडणी यांच्या दृष्टीनें पुष्कळ फरक झालेला आढळून येईल. शॉ, चेस्टरटन् , रसेल, डीन इंग, हॅव्हलॉक एलिस् यांच्या गंभीर निबंधांतील व प्रबंधांतील गद्य, अत्यंत विचारघन असूनही कलात्मक असल्याचें आढळून येईल. पण या गंभीर गद्यांतील कलात्मकता, आणि

१ डॉ. शं. गो. तुळपुळे, प्रस्तावना—मराठी निबंधकार.

लघुनिबंधांतील खेळकर प्रमेयनिरपेक्षता, यांत मात्र फारसें साम्य नाहीं. तसेंच मेकॉले व चिपळूणकर यांच्या निबंधांतील गांभीर्य आणि शॉ, चेस्टरटन, एलिस् यांच्या प्रबंधांतील गांभीर्य यांतही साम्य नाहीं. शास्त्रीय प्रज्ञा, आवेश, श्रद्धा, बौद्धिक विनोद, भाषाप्रभुत्व, लयबद्धता, ओघ यांसारख्या असंख्य गुणांनीं नटलेलें अर्वाचीन पाश्चात्य गद्य, लघुनिबंधांतील कलात्मकतेपेक्षां वेगळ्याच कलात्मकतेनें मंडित आहे, असें दिसून येईल. आजच्या मराठी स्फुट–गद्याचा विकास अर्थातच या प्रज्ञावंत पाश्चात्य गद्यभास्करांच्या प्राण-वर्धक प्रकाशांत होत आहे. या गद्यांतील विचारच मनाची पकड घेत असल्यानें, आणि त्यांतील कला लघुनिबंधांतील कलेहून सूक्ष्मतर असल्यानें, तें अद्याप चिपळूणकरी परंपरेंतच गणलें जातें. तथापि जॉनसनचें गद्य आणि शॉ याचें गद्य, यांत जेवढा फरक आहे; मॅकॉलेचे दीर्घ निबंध आणि एलिस् यांचे दीर्घ निबंध यांत जेवढा फरक आहे, तेवढाच चिपळूणकरांच्या काळचा मराठी विचारप्रधान निबंध आणि आजचा मराठी विचारप्रधान निबंध यांत फरक आहे; व म्हणून आज चिपळूणकरी निबंध आणि लघुनिबंध एवढाच फरक करून चालणार नाहीं.

ज्यांतील विचार तत्त्वज्ञानाच्या उंचीला पोहोंचले आहेत; ज्यांतील श्रद्धा प्रेषिताची उत्कटता धारण करीत आहे; आणि ज्यांतील कलात्मकता म्हणजे खेळकरपणा नसून काव्यमयता आहे, अशा अर्थमंथर आणि उत्कट गद्याचे पाहिले प्रणेते विसूभाऊ राजवाडे, केतकर आणि सावरकर हे होत. त्यांच्या नंतरच्या पिढींतील प्रो. शेजवलकर यांचेंही नांव आतां विद्वन्मान्य झाल्यानें यांत अंतर्भूत करण्यास हरकत नाहीं. या परंपरेंतील याहूनही अर्वाचीन नांवें निश्चित करण्याचा काळ अद्याप आला नसला, तरी कलात्मक गद्याची ही एक वेगळी परंपरा पूर्वींच निर्माण झाली आहे व आजही वाढत आहे, हें निर्दिष्ट करणें जरूर आहे. कारण विचारघनता आणि कलात्मकता यांत विरोध आहे, या समजुतीमुळें, मराठी गद्यांतील या प्रभावी संप्रदायाकडे पुष्कळदां दुर्लक्ष होतें.

टिळकांच्या शैलीप्रमाणेंच केतकरांच्या शैलीसंबंधींही, आपल्या माधुर्य-विषयक कल्पनांमुळें गैरसमज झालेले दिसतात. विचारांना प्रत्येक विधानांत धक्का देणें; पूर्वग्रहांना पदोपदीं आव्हान देणें; थोड्या शब्दांत विपुल अर्थ

सामावून दाखविणें; सूक्ष्म आणि गहन इंग्रजी शब्दांना तितकेच अर्थपूर्ण प्रतिशब्द लीलया बनविणें; भविष्यासंबंधीं अमर्याद आशावाद आणि दुर्मतांसंबंधीं अमर्याद तुच्छता शब्दाशब्दांतून प्रतीत करणें, हे ज्ञानकोशकार केतकरांच्या शैलीचे विशेष होत. एवढ्या अपार स्फोट–शक्तीनें भारलेल्या या ‘ आर्ष ’ शैलींत क्वचित् अपरिचित संस्कृत संज्ञा, ‘ कां कीं ’ यांसारखीं कंटाळवाणीं अव्ययें, अगर ‘ देता झाला ’ ‘ बोलता झाला ’ यांसारखा हरदासी भूतकाळ आढळला; किंवा एखाद्या कंठाळी वाक्याच्या ‘ होल्डॉल् ’ मध्यें त्याचे असंख्य गौण–प्रधान अवयव वेडेवाकडे आवळले गेले, तर तो डॉक्टरांच्या शैलीचा, म्हणजे व्यक्तिमत्त्वाचाच, एक भाग म्हणून गोड करून घेण्याचा वाचकाला मोह होतो !

या दोषाला जर व्यक्तिमत्त्वाच्या आवेगाचा अथवा Violence चा दोष म्हटला, तर सावरकर यांच्या शैलींत तर तो वाजवीहून अधिक आहे, असें म्हणावें लागेल. प्रचारकी बाणा आणि भाषाशुद्धीचें व्रत, यांमुळेंही सावरकरांच्या भाषेंत एक प्रकारचा राकटपणा–एक प्रकारचें Violence आलेलें आढळतें. तथापि विचारांतील असाधारण जोम, व्यक्तिमत्त्वांतील दुर्दम्य श्रद्धा, आणि मूळांतील भाषाप्रभुत्व यांमुळें केतकर–सावरकरांचें गद्य म्हणजे चिपळूणकरी गद्याच्याही पुढची मजल आहे, यांत शंका नाहीं.

वस्तुतः व्यक्तिमत्त्व, विचार आणि शैली यांना पृथक् मानणेंच बरोबर नाहीं. व या दृष्टीनें अमुक एका लेखकानें गद्याला ‘ कलात्मकतेची जोड दिली ’, ‘ कल्पनाविलासाची जोड दिली ’ यांसारख्या शब्दप्रयोगांनीं चुकीचा समज निर्माण होण्याचा संभव असतो. जेथें प्रतिपाद्य विषय आणि कलात्मक मांडणी; प्रतिपाद्य विषय आणि कल्पना–विलास, असे दोन भाग दिसूं शकतात, तेथें शैलीची–व अर्थात् मूळ व्यक्तिमत्त्वाचीही–एकात्मता–Integrity–नाहीं, असेंच म्हणावें लागेल. शिवराम महादेव परांजपे यांच्या पहिल्या पहिल्या उत्कट लेखांत, व्यक्ति, विषय, आणि विलास अशी विभागणीच करतां येत नाहीं; तर पुढच्या पुढच्या क्षीणतर लेखांतून मात्र, मनांत मूळ विषय कोणता व मागाहून त्याला कल्पनाविलास कोणता चिकटविण्यांत आला, हें सहज निवडून काढतां येतें !

या दृष्टीनें पाहतां आपल्या प्रसिद्ध गद्यप्रभूंच्या गद्यांत, व्यक्तिमत्त्वानें

विचारांना आकार दिलेला, आणि विचारसरणीमुळें शैली निश्चित झालेली, असाच प्रकार दृष्टीस पडेल. आणि म्हणूनच लोकहितवादी, चिपळूणकर, आगरकर, टिळक, गोळे, सावरकर, केतकर, माटे, न. र. फाटक यांपैकीं प्रत्येकाच्या व्यक्तिमत्त्वाची व निष्ठेची जात समजावून घेणें आवश्यक होऊन बसतें. लोकहितवादी व आगरकर दोघेही सुधारक; पण दोघांच्या शैलींत मोठीच तफावत आहे. लोकहितवादी सुधारक असले, तरी त्यांची धर्म-श्रद्धा कडक होती; तर आगरकर पूर्ण नास्तिक होते. समोर नुकत्याच झालेल्या राज्यक्रान्तींतून, लोकहितवादी वास्तववादी शहाणपण शिकले होते; तर आगरकर मिल्-स्पेन्सर यांच्या ग्रंथांतून केवळ 'अमूर्त' ( abstract ) समाजशास्त्रीय तत्त्वें शिकले होते. या तफावतीचा परिणाम त्यांच्या शैलीवर दिसून आल्याखेरीज राहात नाहीं. न्यायमूर्ति रानडे आणि लोकहितवादी हे दोघेही इंग्रजी राज्य हा ईश्वरी प्रसाद मानीत; आणि दोघेही श्रद्धावान् होते. पण लोकहितवादींच्या इंग्रजस्तुतींच्या बुडाशीं स्वजातिबांधवांच्या 'मूर्ख समजुतीं' विषयींची चीडच अधिक होती. रानड्यांच्या इंग्रजस्तवनांत, खराखुरा इष्टसिद्धीचा आनंद होता; तर लोकहितवादींच्या स्तवनांत इष्टापत्तीसंबंधींचा त्रागा होता. 'अशा कांहीं तरी दैवी तडाख्याखेरीज आमच्या विचारांत क्रान्ति होणें शक्यच नव्हतें' हा बाजीरावी पुणें पाहिलेल्या सरदार गोपाळ हरींचा राग होता! रानडे-भांडारकरांना पारलौकिक सद्गतीची तळमळ विशेष असल्यानें ते व त्यांचा प्रार्थनासमाज, भागवतधर्माला अधिक जवळ होते; तर आपल्या बांधवांच्या ऐहिक सुखाला लोकहितवादी प्राधान्य देत असल्यानें ते आर्य समाजासारख्या लढाऊ संप्रदायाला अधिक जवळ होते.[1] या सर्व गोष्टींचा परिणाम त्यांच्या त्यांच्या शैलीवर दिसून आल्याखेरीज राहात नाहीं.

या दृष्टीनें पाहतां, या संग्रहांत निवडलेल्या समाजविकासविषयक विचारांत व त्यांच्या प्रवर्तकांत पांच सहा प्रकार करतां येतील, व या वैचित्र्याचा परिणाम गद्यशैलीवर झालेला दिसून येईल. स्थूलमानानें वर्गीकरण करायाचें झालें, तर (१) धर्मश्रद्ध सुधारक, (२) धर्मश्रद्धाहीन सुधारक, (३) कर्म-

---

१ दयानंद यांनीं त्यांना आर्यसमाजाच्या ट्रस्टीमंडळांत घेतलें होतें ही गोष्ट अर्थपूर्ण आहे.

योगी सुधारक, (४) सुधारकांचे सुधारक, (५) राष्ट्रवादी सुधारक, (६) समाजशास्त्रज्ञ सुधारक असे भेद करतां येतील. हे भेद परस्परव्यवच्छेदक असतीलच असें मात्र नाहीं. गोळे, केतकर व माटे यांना 'उद्धारक' ( Revivalist ) या अधिक परिचित नांवानें संबोधणेंही सयुक्तिक होईल. परंतु 'आगरकरी' म्हणजेच 'केवळ तात्त्विक' सुधारकांची सामाजिक वस्तुस्थितीपासून आणि सामाजिक मानसशास्त्रापासून जी फारकत झाली होती, ती सांधून घेणें, हें गोळे, केतकर आणि माटे यांचें मुख्य कार्य आहे. व म्हणून त्यांच्या समाजविषयक लेखनांत समाजावरील टीकेपेक्षां, समाज-सुधारकांवरील टीका अधिक आढळणें स्वाभाविकच आहे. पण सुधारकांवरील त्यांच्या टीकेंत आणि विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या टीकेंत फरक आहे. व म्हणूनच 'सुधारकांचे सुधारक' असें या त्रयीचें वर्णन करण्यानें त्यांचें वैशिष्ट्य सूचित होईलसें वाटतें. प्रो. अण्णासाहेब कर्वे आणि महर्षि विठ्ठल रामजी शिंदे यांचा भर विचारप्रसाराहून प्रत्यक्ष कार्यावर अधिक असल्यानें, त्यांस कर्मयोगी सुधारक म्हणणें युक्त होईल. विवेकानंद आणि सावरकर हे दोघेही निर्भय आणि कट्टे ( uncompromising ) सुधारक असले, तरी हिंदु समाज समर्थ आणि हिम्मतवान् करण्यालाच त्यांनीं प्राधान्य दिलें असल्यानें, त्यांस राष्ट्रवादी सुधारक म्हणावें लागेल. डॉ. इरावती कर्वे आणि श्री. ना. गो. चापेकर यांचें लिखाण सुधारणाविषयक म्हणण्यापेक्षांही केवळ समाजविषयक म्हणणेंच अधिक रास्त होईल. समाज हा त्यांच्या अभ्यासाचा विषय आहे. व या दृष्टीनें त्यांस समाजसुधारक म्हणण्यापेक्षां समाजशास्त्रज्ञ म्हणणेंच अधिक युक्त होईल. वास्तविक डॉ. केतकर यांना या समाजशास्त्रज्ञ लेखकांच्या वर्गांत घालणें जरूर होतें. पण समाज हा केतकरांच्या केवळ अभ्यासाचा विषय नव्हता; त्यांना कांहीं तरी प्रत्यक्ष घडून येण्याची त्वरा होती. ही त्वरा व उत्कटता, हा त्यांच्या नुसत्या विद्वत्तेचा अगर मतप्रणालीचा भाग नसून, त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा भाग होय. व म्हणूनच त्यांची शैली ही केवळ शास्त्रज्ञाची शैली नाहीं. शास्त्रज्ञाची शैली ही जितकी निर्विकार ( आणि निर्गुणही ! ) असावी, असा कांहीं लोकांचा आग्रह आहे, तितकी त्यांची शैली निर्विकार नव्हती. पण शास्त्रीयतेच्या दृष्टीनें काढलेला हा दोष, वाङ्मयीनतेच्या दृष्टीनें गुण ठरतो. कारण व्यक्तिनिरपेक्ष शास्त्रांची निर्विकारता

संपून, व्यक्तिमत्त्वाच्या रंगरूपाचा प्रान्त सुरू झाला, म्हणजेच शैलीचा व वाङ्मयाचा प्रान्त सुरू झाला असें समजावें.

पण डॉ. इरावतीबाई कर्वे यांचें लिखाणही केवळ समाजशास्त्रज्ञाचें लिखाण नाहीं, आणि या संग्रहांत निवडलेला त्यांचा उतारा तर समाजशास्त्र, ललित-निबंध आणि गद्यकाव्य या तिन्हींच्या सरहद्दींना भिडला आहे. जुन्या रूढींचा, त्यांस लक्ष्मणाच्या रेघेप्रमाणें अनुल्लंघ्य म्हणून, बाऊ वाटत नाहीं; तसेंच नव्या रूढिमुक्ततेंत त्यांस, जुन्या सुधारकांस दिसे तसा मोक्षही दिसत नाहीं. कौटुंबिक आणि विद्यालयीन संस्कारांच्या दृष्टीनें त्या इतक्या ‘ नवीन ’ पिढींतील आहेत, कीं वारकरी मंडळीसारख्या जुनाट भाविक समाजाकडे त्या एखाद्या फिरंगी मुशाफराच्या तिऱ्हाइत नजरेनेंही पाहूं शकल्या असत्या ! परंतु समाजशास्त्रज्ञाच्या आणि सुधारकाच्या विच्छेदक दृष्टीबरोबरच, कवीचे डोळे आणि स्त्रीचें हृदय त्यांस लाभलें आहे असें दिसतें. ( तें सर्वच स्त्रियांना लाभतें असें नाहीं ! ) यामुळें त्यांचें हें लिखाण, काव्य आणि शास्त्र यांचा दुर्मिळ संगम घडवून आणणाऱ्या लिखाणापैकीं आहे, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

समाजशास्त्रीय लिखाणांत हा दुर्मिळ वाङ्मयगुण मिश्रित करणारी परंपरा महाराष्ट्रांत आधींच होती. प्रो. श्री. म. माटे यांच्या व्यक्तिमत्त्वांत हेंच मनोहर मिश्रण आहे. समाजाकडे वस्तुमात्राचा भेद करणाऱ्या शास्त्रज्ञाच्या नजरेनेंही पाहायचें, आणि वस्तुमात्रांत विरघळणाऱ्या साहित्यिकाच्या नजरेनेंही पाहायचें, हा प्रो. माटे यांनीं आपला एक वाङ्मयीन विशेषच बनविला आहे. या दोहोंपेक्षांही आणखी कांहीं विशेष त्यांच्या वाङ्मयांत—व अर्थात् त्यांच्या व्यक्तिमत्त्वांतही—आहेत. ते केवळ समाजाभ्यासक व समाजसुधारकच आहेत असें नाहीं;—त्यांना समाजासंबंधीं एक प्रकारचा उल्हास आणि हौस आहे. यामुळें समाजासंबंधींचें त्यांचें लिखाण शास्त्रज्ञांच्या लिखाणासारखें केवळ शास्त्रीय, अगर सुधारकांच्या लिखाणासारखें केवळ त्वेषयुक्त नसतें, तर सदैव प्रसन्न आणि उल्हासयुक्त असतें. त्यामुळेंच, विचारप्रधानलेखन करूनही कादंबरीकारांइतकी लोकप्रियता मिळविण्याची करामत करणारे लेखक, असें त्यांचें वर्णन केल्यास वावगें होणार नाहीं.

त्यांचा आणखी एक विशेष म्हणजे त्यांचा प्रचारकी बाणा. या विशेषाचे

फायदेही असतात आणि तोटेही असतात. या बाण्यामुळेंच, माटे यांच्या लिखाणांत अलीकडे विचारांची पुनरावृत्ति आणि (सुगमतेच्या लोभानें केलेला) अकारण विस्तार, हे दोष डोकावत आहेत. शब्दांच्या निवडीसंबंधीं (Diction संबंधीं) ही त्यांचा एक विशिष्ट संप्रदाय आहे. याचाही प्रचारकी बाण्यामुळें क्वचित् अतिरेक होतो, असें दिसून येईल. पण कादंबरीकाराचें लालित्य, शास्त्रज्ञाची कुशाग्रता आणि केतकरांपूर्वींच्या सुधारकांत प्रायः न आढळणारी विचारांची परिपक्वता, यांचें अपूर्व मिश्रण प्रथमच जर कोणाच्या लिखाणांत आढळत असेल, तर तें प्रि. महादेव शिवराम गोळे यांच्या. प्रो. माटे यांनीं 'अधिकांकरितां अधिक' न लिहितां, केवळ निवडक वाचकांकरितां लिहायचें ठरवलें असतें, तर गोळे यांच्या बिनजोड सामाजिक विचाराचे आणि अनुकरणातीत गद्यशैलीचे आजचे प्रतिनिधि तेच ठरले असते, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

लोकहितवादी, चिपळूणकर, आगरकर व टिळक या चौघांच्याही भाषेंत संयमापेक्षां आवेशाचाच प्रत्यय अधिक येतो असें म्हणावें लागतें. या चौघांत टिळकच, वाल्मीकीनें रामाचें वर्णन केल्याप्रमाणें, '**समुद्र इव गांभीर्ये स्थैर्ये च हिमवानिव**' असें होतें. तथापि प्रत्यक्ष पराक्रमाच्या क्षेत्रांत उभ्या असलेल्या मुनीलाही क्षोभ टाळतां येत नाहीं ! यामुळें टिळकांच्या गद्यांत, संयमांतूनही जाणवणाऱ्या प्रक्षोभाची प्रतीति येते. आगरकर तर उघडपणें सद्भावनांच्या आहारींच जात. चिपळूणकरांच्या लेखनांत झोकदारपणा आहे, पण संयम आणि सुश्लिष्टता नाहीं. विचारांची प्रगल्भता, भाषेवर प्रभुत्व आणि त्या प्रभुत्वामुळेंच आलेला संयम जर मराठींत प्रथमच—व कदाचित् अखेरचाच !—कोणाच्या शैलींत दिसत असेल, तर तो प्रि. गोळे यांच्या होय. आधुनिक मराठी गद्यांत झोकदार लिहिणारे कमी नाहींत, ओजस्वी शैलीला तुटवडा नाहीं; निर्दोष, निर्विकार, विद्वत्ताप्रचुर पण निर्गुण असे गद्य लिहिणारेही कमी नाहींत. पण ज्याला इंग्रजींत 'Effortless authority' म्हणजे 'निरायास प्रभुत्व' म्हणतात, व जें इंग्रजी गद्याच्या सुवर्णयुगांतील एडमंड बर्कच्या प्रत्येक वाक्यांत दिसतें, तें मराठींतील कोणा एका लेखकाच्या गद्यांत निरपवादपणें दिसत असेल, तर तें प्रि. गोळे यांच्याच गद्यांत, असें म्हणावें लागेल. बर्कचें अन्तरंग फ्रेंच रिव्होल्यूशनमधील अनन्वित कृत्यांनीं ढवळून

निघालें होतें; तर गोळे यांचें अन्तःकरण सुधारकांच्या अतिरेकांनीं हालवून निघालें होतें. आजच्या भाषेंत सांगावयाचें, तर दोघेही 'प्रतिक्रान्ती' चे नेते होते. पण गंभीर आणि संयत गद्यशैलीला, उदार प्रतिक्रान्तीची भूमिका थोडीशी उपकारकच होते, असें या दोघांच्या सुंदर शैलीवरून म्हणावेसें वाटतें !

गद्यशैलीची परमोच्च अवस्था सिद्ध होण्यास समाज आणि व्यक्ति यांच्या जीवनांतील विशिष्ट अवस्थाच पोषक होतात असें म्हणतात. वाङ्मयाच्या इतिहासांत क्वाचित् 'गद्याचा जमाना' म्हणून वेगळा निवडलेलाही आढळतो. ॲरिस्टॉटल् यानें तर आपल्या 'ऱ्हेटरिक्' वरील ग्रंथांत, 'प्रमेय-वाक्य लोकव्यवहारवेत्त्या वृद्धांच्या तोंडींच काय तें शोभतें, इतरांच्या तोंडीं शोभत नाहीं,' असा स्पष्ट अभिप्राय व्यक्त केला आहे.

"Sentences become not every man; but only old men and such as be well-versed in business. For to hear a young man speak sentences is ridiculous; and to hear an ignorant man speak sentences is absurd."*

पण 'Ars Rhetorica' या ग्रंथांतील ॲरिस्टॉटलचें हे दंडक मुख्यत्वें-करून तोंडी प्रतिपादनाला अनुलक्षून आहेत. ॲरिस्टॉटलनंतरचा अधिकारी टीकाकार डिमिट्रियस् (खिस्तपूर्व ३००) हा शैलीसंबंधीं लिहितांना विषयानु-रोधानें कोणती शैली कोठें शोभून दिसते, यासंबंधीं सूक्ष्म विवेचन करतो. इतिहास–वाङ्मयांत कोणत्या प्रकारचें वाक्याशिल्प शोभतें, संवादांत कोणतें योजावें आणि वादविवादांत कोणतें योजावें, यासंबंधींही त्यानें दंडक घालून दिले आहेत. गद्यशैलीच्या परमोच्च विकासाला, व्यक्तिमत्त्व आणि वाचक या घटकांप्रमाणेंच विषय या घटकाचेंही महत्त्व असतें. आणि म्हणूनच दोन गद्यप्रभूंच्या शैलीची तुलना करणें योग्य असलें, तरी तेवढ्यावरून त्या

---

* ॲरिस्टॉटल 'Sentence' ची व्याख्या मात्र पुढीलप्रमाणें करतो :

"A sentence is an universal proposition concerning those things which are to be desired or avoided in the actions and passions of the common life."

Aristotle : Ars Rhetorica.

लेखकांची श्रेष्ठकनिष्ठता ठरवतां येत नाहीं. लोकमान्य टिळकांच्या प्रासंगिक लेखांतील भाषेहून गीतारहस्यांतील भाषा संथ, शान्त आणि गंभीर आहे. आणि सामान्यतः आत्मविषयक उल्लेख टाळणारे टिळक, गीतारहस्याच्या प्रस्तावनेंत जेथें आत्मपर होऊन प्रिय व्यक्ती आणि प्रिय विषय यांच्या सहवासाला अन्तरल्याबद्दल हळहळतात, तेथें त्यांच्या भाषेला कांहीं वेगळेंच रूप आलेलें आहे. आणि म्हणूनच 'सर्वगुणसम्पन्न गद्य' (Perfect prose) म्हणून निवडून काढणें ही गोष्ट थोडी मुष्किलीची होऊन बसते. तरीही गद्याचा 'सुवर्णकाळ,' 'गद्यप्रभु' असे शब्द आपणाला विशिष्ट काळासंबंधीं आणि व्यक्तींसंबंधीं वापरण्याचा मोह होतोच. विचारांची परिपक्वता, अभिव्यक्तींतील संयमयुक्त डौल, आणि शब्दयोजनेंतील औचित्य-युक्त माधुर्य या गुणांनीं मंडित अशा गद्याला उत्कृष्ट गद्य म्हटलें, तर प्रि. गोळे यांचें गद्य, तरुण अभ्यासकांपुढें आदर्श म्हणून ठेवतां येईल.

या पुस्तकांत एका वेगळ्या जातीच्या गद्याचाही अन्तर्भाव करावा लागला आहे. तें म्हणजे ज्याची जन्मभाषा मराठी नाहीं, अशा एका प्रतिभावन्त परिव्राजकानें मूळ इंग्रजींत दिलेल्या व्याख्यानांचें भाषान्तर होय. आधिकृत आणि आदर्श गद्याच्या पुस्तकांत अन्तर्भूत करण्यासारखें भाषान्तरित वाङ्मय क्वचितच आढळतें. तथापि स्वामी विवेकानंदांच्या ग्रंथांची गोष्ट वाङ्मयाच्या इतिहासांत थोडी अभूतपूर्वच गणली जाईल. स्वामीजींनीं जणूं मराठींतच मूळ व्याख्यानें दिलीं, असें वाटण्याइतक्या सुंदर मराठींत त्यांचें वाङ्मय भाषान्तरित झालें आहे! त्यांच्या समग्र प्रकाशित वाङ्मयाचे तेरा खंड सुंदर भाषान्तर करूनही, भाषान्तरकर्त्यानें आपल्या नांवाचा एका शब्दानेंही उल्लेख केलेला नाहीं,–तो होऊं नये अशी काळजी घेतली–ही गोष्टही मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत तरी अपूर्व आहे. या अनासक्त वेदान्ती भाषान्तरकर्त्याचें समग्र नांव, गणेश वामन गोगटे असें होतें. ते पोटाकरितां गिरगांव (मुंबई) येथील आर्यन् वॉच् कंपनीच्या दुकानांत रोजमजुरीनें घड्याळें दुरुस्त करण्याचें काम करीत. आणि केवळ एक धर्मसाधना म्हणून आधुनिक भारताच्या या देशभक्त धर्मोद्धारकाच्या वाङ्मयाचें मराठी रूपान्तर करीत. त्यांनीं लिहिलेले अगर तोंडी सांगितलेले आणखीही कांहीं ग्रंथ भारतगौरव-ग्रंथमालेच्या प्रकाशनांत आढळतात.

त्यांवरही त्यांनीं आपलें नांव घातलेलें नाहीं.[1] ‘स्वामी विवेकानंदांच्या वाङ्मयाचा परिणाम महाराष्ट्राच्या एका पिढीवर फारच मोठा झालेला आहे. आजही त्यांचे विचार, कर्तव्यमूढ मनाला स्फूर्ति देणारे आहेत. व्यापक समाजावलोकन, स्वसमाजासंबंधीं अलोट आत्मविश्वास व त्याबरोबरच कठोर आत्मपरीक्षण, या गुणांमुळें स्वामीजींच्या सामाजिक विचारांना समाजसुधारणाविषयक वाङ्मयांतही फार मोठें स्थान आहे. स्फूर्तिमान् वक्त्याच्या गद्यांत जे गुण प्रकट होतात, ते अपूर्व गुण स्वामीजींच्या गद्यांत आहेत. या संग्रहांत त्यांच्या भाषणांतील उताऱ्याबरोबरच त्यांच्या लिखित वाङ्मयांतीलही उतारा आहे. त्या दोहोंतही इतर कोणाच्याही गद्याहून वेगळेच गुण प्रकट झालेले दिसतील. अमेरिकेंतील व इंग्लंडमधील श्रोत्यांनीं जन्मसिद्ध वक्ते म्हणून त्यांचा गौरव केलेला होता. प्रख्यात अमेरिकन तत्त्ववेत्ता व मानसशास्त्रज्ञ विल्यम् जेम्स्, ऑक्स्फर्ड युनिव्हर्सिटींतील प्रख्यात संस्कृत पंडित प्रो. मॅक्सम्यूलर, यांसारखे लोक त्यांच्या वैयक्तिक चाहत्यांत होते. अशा लोकोत्तर धर्मप्रचारकाच्या वक्तृत्वपूर्ण गद्यांतील तरल तेज, मराठी भाषान्तरांत जसेंच्या तसें परावर्तित करण्याची बिकट करामत कै. गोगटे यांनीं करून दाखविली आहे. व या दृष्टीनें गोगटे यांच्या भाषेचें महत्त्व थोडें असाधारणच म्हटलें पाहिजे.

मराठी गद्याचा गेल्या शंभर वर्षांचा आलेख असा स्फूर्तिदायक आहे. या स्फूर्तिदायक शतकांतील वाग्वैभवाचे कित्येक वारसदार आजही विद्यमान आहेत. पाश्चात्य वाङ्मयाच्या संपर्कानें आणि आधुनिक मानसशास्त्रादिकांच्या अध्ययनानें, विचारांतील व विकारांतील सूक्ष्मता वाढत आहे. पूर्वसूरींच्या पुण्याईनें या सूक्ष्मतेलाही पुरी पडेल, अशी शैली आज विकसित होत आहे. तथापि मराठी गद्याच्या चित्राची ही फक्त एक बाजू झाली. दुर्दैवानें या चित्राची दुसरीही एक बाजू आहे. आणि तिचें अवलोकन केल्याखेरीज आजच्या मराठी गद्याचें सर्वांगीण अवलोकन होणार नाहीं. लेखनविषय, लेखनप्रकार आणि शैलीसंप्रदाय या तिन्ही बाजूंनीं गेल्या पंचवीस वर्षांत मराठी गद्याची अमर्याद वाढ झाली आहे. एकट्या विचारप्रधान स्फुट गद्याचाच प्रान्त घेतला, तरी त्यामध्यें चिपळूणकर, टिळक, राजवाडे यांचेच

१. प्रो. शेजवलकर; प्रगतींतील लेख.

अनुयायी आढळतील असें नाहीं. ज्यांच्या शैलीची व शब्दसंग्रहाची जातकुळी आतांपर्यंत वर्णिलेल्या घरंदाज घराण्यांत सांपडत नाहीं, असे अनेक लेखक आज विपुल लिखाण करीत आहेत. त्यांनीं आपली म्हणून एखादी शैली निर्माण केली आहे असेंही नाहीं. त्यांच्या शैलीचें एकमेव लक्षण सांगायचें, तर नवे शब्द व नवे वाक्प्रचार तयार करणें अथवा अन्य प्रान्तिक भाषांतून घेऊन ते रूढ करणें, हें होय. या प्रवृत्तीला फार तर प्रयोग म्हणतां येईल; पण शैली म्हणतां येण्याइतकें अर्थपूर्ण एकजीवित्व तिजमध्यें आलेलें नाहीं. कित्येकदां तर तिजमध्यें भाषाशैलीचाच काय पण व्याकरण-शुद्धतेचाही घात करण्याइतका तऱ्हेवाईकपणा आढळतो. आणि अखेर तिचे प्रवर्तक, 'एक नवा प्रयोग' एवढेंच तिचें समर्थन करूं शकतात.

'नेत्रदीपक,' 'भावुक,' 'वक्तव्य,' 'औद्योगीकरण,' 'निर्लष्करीकरण,' 'अद्यावत्' यांसारखे गेल्या दहापांच वर्षांत रूढ झालेले शब्द अभ्यसनीय गद्यापर्यंत येऊन पोहोंचल्यास, त्यांतील चुका दाखविणें अपरिहार्य होईल. भाषेंत अनेक सदोष शब्दोच्चार आणि रूपेंही रूढ होतात हें खरें. पण अडाणी लोकांनीं सौकर्याकरितां केलेले व्याकरणदोष आणि सुशिक्षितांनीं टूम म्हणून केलेले दोष, यांत फरक आहे. यांतील दुसऱ्या प्रकारच्या दोषांना सौकर्य हेंही समर्थन नसतें, शिवाय अशा दोषांत कांहींच एकजातीयता अगर निश्चय दिसून येत नाहीं. सारांश, तें एक अराजक असतें. असें अराजक आजच्या गद्यांत फार मोठ्या प्रमाणावर वाढत आहे.

अद्याप तरी सर्वमान्य (Standard) मराठी भाषा म्हणून एक दाखवितां येते. गेल्या दहापंधरा वर्षांत जे अनेक सदोष आणि बोजड शब्द मराठी गद्यांत शिरले आहेत, त्यांना या सर्वमान्य भाषेंत स्थान द्यायचें किंवा नाहीं, हा प्रश्न साहित्यसंस्था आणि शिक्षणसंस्था यांना लवकरच सोडवावा लागेल. आज मोठ्या वेगानें बाहेर पडणाऱ्या गद्यांत अशा आक्षेपार्ह शब्दांचा (व वाक्य-प्रयोगांचाही) भरणा बराच मोठा आहे. आदर्श गद्याच्या अभिमान्यांनीं वेळींच सावधगिरी न दाखविल्यास, आजपर्यंत टिकलेला आणि वाढलेला मराठी गद्याचा डौल नष्ट होण्याच्या मार्गाला लागेल अशी भीति आहे.

लेखनांतही कधीं केवळ दुर्लक्षामुळें, तर कधीं छपाईच्या सोयीखातर, तर कधीं हिंदीच्या अनुकरणानें, अनेक दोष पतकरले जात आहेत. 'हृदय'

( हृदय ), ' क्रुति ' ( कृति ) ' सन्सद् ' ( संसद ) ' निऱ्यात ' ( निर्यात ) या शब्दांच्या लेखनांत रूढ होत असलेल्या चुका, छपाईच्या सोयी म्हणून— किंबहुना लिपिसुधारणा म्हणून स्वीकारल्या जात आहेत ! ' शरश्चंद्र ' ( शरच्चंद्र ), ' घनःश्याम ' ( घनश्याम ), ' राजनीतिक ' ( राजनैतिक ) यांसारख्या शब्दांतील चुका हिंदीच्या अनुकरणानें रूढ होत आहेत. या सर्व प्रकारांचे प्रवर्तक कोणीही असोत, त्यांचे हेतु कोणतेही असोत, त्यांतील भाषादोष पाहतां, मराठी गद्याच्या भवितव्याला या प्रवृत्तीपासून मोठाच धोका आहे हें नाकबूल करतां येणार नाहीं.

एखाद्या समाजाचें हृदय त्याच्या काव्यावरून समजत असलें, तरी त्याच्या विचारांची व्यवस्थिति आणि उंची, त्याच्या गद्यशैलीच्या विकासावरून कळते. इंग्लंडमधील सर्वसामान्य वृत्तपत्रांतील शैलीही इतकी संपन्न आणि आकर्षक असते, कीं तीवरून सर्व राष्ट्राच्या राष्ट्र एका सुव्यवस्थित वैचारिक पातळीवर जगत असलें पाहिजे, असें वाटल्यावांचून राहात नाहीं. लोकहितवादीपासून तें आजच्या प्रतिष्ठित गद्यलेखकापर्यंत, मराठी लेखकांच्या गद्यांतही अभिमानास्पद विचारव्यवस्थितीचा पुरावा आढळत असे. पण आज झपाट्यानें वाढत असलेल्या गद्याच्या फारच थोड्या भागासंबंधीं, हे अभिमानाचे उद्गार काढतां येतीलसें वाटतें.

आजच्या तरुण पिढीनें परिपक्व विचारांचा आणि प्रगल्भ गद्यशैलीचा अभ्यास करण्याची आवश्यकता वरील चिन्ताजनक परिस्थितीमुळें तर अधिकच वाढते. ' **समाजविकास** ' या पुस्तकाच्या रूपानें अशा प्रकारचें अभ्यसनीय गद्य उपलब्ध व्हावें हाच हेतु आहे. तो थोडाफार सफल झाला आहे, असें शिक्षक व विद्यार्थी यांना वाटलें, तर आम्हांला आमच्या श्रमाचें साथक झालेंसें वाटेल.

४ डिसेंबर १९५१
महाराष्ट्र एज्युकेशन् सोसाएटीचें
कॉलेज, भांडारकर रोड, पुणें ४.

श्रीकृष्ण के० क्षीरसागर

वरील विवेचनाला पूरक म्हणून आणि याच विषयाकडे पाहण्याचे अन्य दृष्टिकोन माहीत व्हावे म्हणून, विद्यार्थ्यांनी डॉ. शं. गो. तुळपुळे, प्रो. श्री. रा. पारसनीस आणि प्रो. रा. शं. वाळिंबे यांनीं संपादिलेल्या गद्यसंग्रहाच्या प्रस्तावना अवश्य वाचाव्या. या प्रस्तावनांत व इतरत्र सांपडणाऱ्या तपशिलाची येथें पुनरुक्ति केलेली नाहीं. या पुस्तकांत अन्तर्भूत केलेल्या लेखकांसंबंधींची त्रोटक माहिती शेवटीं जोडलेल्या टीपांत सांपडेल.

या पुस्तकाला जोडलेल्या संदर्भविषयक टीपा तयार करण्यांत आणि छपाईच्या शुद्धतेबाबत फर्ग्युसन कॉलेजमधील मराठीचे प्रोफेसर व माझे मित्र प्रो. गं. भा. निरंतर यांनीं जे परिश्रम घेतले, त्याबद्दल मी व प्रकाशक त्यांचे ऋणी आहों. 'कॉंटिनेंटल प्रकाशन'चे श्री. अ. अं. कुलकर्णी यांनीं निकड लावली नसती, तर हें काम बहुधा हातीं घेतलेंही गेलें नसतें. या दृष्टीनें त्यांचे आभार मानणें जरूर आहे.

पुणें २.
४-१२-५१.

श्री० के० क्षी०

## दुसरी आवृत्ति

समाजविकास हें आमचें गद्य वेंच्यांचें पुस्तक विद्वानांच्या पसंतीस उतरून लवकरच त्याची नवी आवृत्ति काढण्याचा योग येत आहे.

ही आवृत्ति म्हणजे प्रायः पहिल्या आवृत्तीचें पुनर्मुद्रण आहे. फक्त एका वेंचाच्या आरंभींचें एक वाक्य संदर्भाच्या दृष्टीनें अनावश्यक वाटल्यानें गाळलें आहे.

विद्यापीठांतील ज्या विद्वानांनीं समक्ष अगर पत्रद्वारें पुस्तकासंबंधीं अभिज्ञता दाखविली त्यांचे मी कृतज्ञपणें आभार मानतों. पुस्तक शिकवितांना आढळणारे गुणदोषही असेच मनमोकळेपणानें कळविल्यास पुढील कार्यास त्याचा उपयोग होईल.

६-६-५३ पुणें.

श्री० के० क्षी०

# अनुक्रम

अनुक्रम

लोकहितवादी ( १८२३-१८९२ )

## १. विधिनिषेधरूप धर्माचें मूळ

धर्मशास्त्राचें व नीतिशास्त्राचें मूळ काय आहे, याचा विचार करतां दिसतें की, प्रथमतः ईश्वराने पृथ्वी निर्माण केली व सर्व सृष्टींतील पदार्थ सूर्य, चंद्र इत्यादि केले आणि नंतर मनुष्य उत्पन्न केला. तेव्हा प्रथम जो मनुष्य होता, तो सुखी असेल; कारण त्याचें कुटुंब एकटेंच. सर्व सृष्टीचा धनी तोच. नद्या, जमीन, झाडें या सर्वांचा अधिकारी तो एकच. तेव्हा तो पाहिजे तेथे राहात असेल. जेथे पाहिजे तेथे बसत असेल. पाहिजे तेथे पेरीत असेल. त्या काळीं त्यास कोणी मुजाईम नव्हता. याजमुळे तो अर्थात् सुखी असेल.

असे कांही दिवस चालल्यानंतर त्याचें कुटुंब वाढलें आणि एका घरांत रहात होते, तेच लोक फार होऊन त्यांचा गाव झाला. तेव्हा एकाने जमीन लागवडीस आणली. ती चांगली पाहून त्याचे भावास लोभ उत्पन्न झाला; कारण लोभ, क्रोध, मोह हे मनुष्याचे मनांत आहेतच; परंतु त्यांस प्रसंग आल्याशिवाय ते दृष्टोत्पत्तीस येत नाहीत. सांप्रत हीं मनुष्यें किती एक चोर व किती एक लबाड असे गुप्त रूपाने आहेत. जे चोर आहेत ते श्रीमंत असले म्हणजे त्यांस चोरी करावयाचें अगत्य असत नाही, हें पुष्कळांचे पहाण्यांत आहे. एका मनुष्याने स्त्री केली म्हणजे तिचा स्वभाव भिन्न असल्यामुळे तिचा भ्रतार वारंवार क्रोधाविष्ट होतो आणि तिचें व त्याचें पटत नाही. पुढे ती स्त्री मेली म्हणजे दुसरी करतो. आणि ती सहनशील व नम्र असली म्हणजे तिचा भ्रतार पहिल्याने भांडत होता, तोच सुखाने तीजवळ राहातो. याचें कारण काय की, क्रोध येण्याचें कारण कमी होतें. आणि असेंच जर सर्व मनुष्यास जसें पाहिजे तसें प्राप्त होईल, तर कोणी कोणास उपद्रव करणार नाही.

परंतु ईश्वरी संकेत असा आहे की, जसजसे पदार्थ मनुष्यास पाहिजेत, तसतसे त्याने ते निर्माण केले पाहिजेत. ते जर फुकट मिळतील तर कोणी

दुराचरण करणार नाही. परंतु या लोकीं भ्रांति व अज्ञान फार आहे. तेणेंकरून ईश्वराने मनुष्यास जे पदार्थ उद्योगाने शोधून काढण्यास सांगितले आहेत, त्यांतून किती एक सापडावयाचे आहेत, त्यांचा अन्त नाही. परंतु जर सर्व सापडतील तर सव लोक सुखी होतील; परंतु असा काळ कधी येईल हें तर्कानेही समजणें अशक्य आहे. यास्तव मनुष्यमात्राचा धर्म असा असावा की, हे पदार्थ शोधण्याचा उद्योग सर्वदा करावा. कवीने म्हटलें आहे की—

अनर्थमक्षरं नास्ति नास्तिमूलमनौषधम् ।
अयोग्यः पुरुषो नास्ति योजकस्तत्र दुर्लभः ॥

असा सर्वज्ञ मनुष्य कोठे आहे की, योग्यायोग्य जाणून विचार करील आणि असा वैद्य कोठे आहे की, जास सर्व वनस्पतींचा निर्णय कळेल, आणि असा शब्दाचा अर्थ जाणणारा कोठे आहे की, प्रत्येक शब्दाचा अर्थ कोणत्या भाषेंत, कसा होतो हें समजेल ! ही गोष्ट घडत नाही; तत्रापि **मनुष्याने असा उद्योग करावा की, जितकें समजेल तितकें शिकत जावें.** असें करतां करतां मरणानंतर तरी ईश्वर सर्व आपला खजिना त्यास दाखवील व मग त्यास अत्यंत सुख होईल आणि सर्वज्ञ मनुष्य झाला तर मग त्याचे हातून कांही विपरीत घडावयाचें नाही. आणि इतकाच भेद स्वर्गास व मृत्युलोकास आहे. येथे भ्रांति आहे म्हणून दुःख आणि तेथे भ्रांति नाही व ज्ञान आहे, म्हणून सुख. असो.

परंतु ईश्वरी संकेताने झालें तें कोणाच्याने फिरवत नाही. याजकरिता ईश्वराने अक्कल दिली आहे. त्या अकलेचा जोराने मनुष्याने एकामेकांचा बुद्धिबळें करून ज्ञानाचा पाठलाग करावा. म्हणजे त्याचे पोटीं सुख आहे, ही गोष्ट सिद्ध आहे. परंतु पूर्वी सांगितलें की, मनुष्यास प्रसंग आल्याखेरीज त्याचे गुण दृष्टीस पडत नाहीत आणि प्रसंग दैववशात् कोणास मिळतात व कोणास मिळत नाहीत. तेव्हा जगाचे आरंभीं जेव्हा लोकांची वृद्धि होत चालली होती, तेव्हा हे प्रसंग वाढत चालले. एकाची संपत्ति पाहून दुसऱ्यास लोभ झाला व त्याने ती दिली नाही, म्हणजे त्यास राग यावा. एकाने एक जमिनीचा तुकडा घेतला व तो नीट केला. त्याजवर दुसरा उगाच दावा करूं लागला, म्हणजे त्या उभयतांचें भांडण व्हावें. तसेंच एक सुंदर स्त्री झाली, तिचें

एकाने परिग्रहण केलें व तिच्यावर दुसऱ्याने नजर ठेवली. तेव्हा एक म्हणूं लागला की, ही माझी स्त्री. हिचें मी परिपालन केलें आणि आता हिला हा कोण नेणार ! तेव्हा अर्थातच कज्जा झाला. अशाच स्थितींत कांही काळपर्यंत लोक समाईक होते.

पाहिजे ती जमीन घ्यावी. पाहिजे त्याने स्त्री घ्यावी. धर्म मुळी कांही नसेल. आणि असण्याची त्या काळीं गरज नव्हती. कारण जोंपर्यंत दुसऱ्यास दुःख होत नाही, तोंपर्यंत पाप नाही. आणि स्वर्गास इच्छित पदार्थ प्राप्त आहेत तेथे कोणी माझी अप्सरा म्हणत नाही, पाहिजे तेथे राहतात व पाहिजे त्याचा स्वइच्छ उपभोग करितात; परंतु अज्ञान आणि भ्रांति मृत्युलोकांत फार. येथे चालेना व लोकांत कलह फार उत्पन्न होऊं लागले.

तेव्हा जे लोक होते, त्यांतील जो प्रमुख बळवान् होता, त्याने नेम करून दिले की, जी जमीन ज्याने घेतली, तीच त्याने वहिवाटावी. दुसऱ्याची घेऊं नये. तसेंच ज्याने जी स्त्री वरिली ती त्याची झाली. तिजवर कोणी दावा करील, तर त्यास शासन होईल. तसें स्त्री ज्याणे वरिली, त्याने परस्त्रीचा लोभ करूं नये. कारण तेणेंकरून त्याचे स्वस्त्रीस दुःख होतें. आणि असें ठरलें की, ज्याने स्त्री केली, त्याने तिचें पालन करावें आणि तिला पुत्र होतील ते त्याचे वारीस समजावे. असे परस्परांचें दुःख टाळण्याकरिता अनेक नियम केले.

तेव्हा लोकांत पद्धति पडली आणि जो बळकट होता, तोच त्यांचा राजा झाला. त्याचे आज्ञेंत इतर लोक राहूं लागले; परंतु पहिल्याने लोक भाषा बोलूं लागले, त्या वेळेसच ते अक्षरें लिहूं लागले नसतील; कारण भाषेचा मागील हें प्रकरण आहे. पहिल्याने लोक एकमेकांस निरोप सांगून पाठवीत असतील. व जेव्हा लोक दूर दूर गेले आणि दोन कोश वस्ती होती ती पन्नास कोश झाली, तेव्हा सांगून पाठविणें अवघड पडूं लागलें. तेव्हा मग लोकांनी लेखनविद्या काढली असेल; परंतु लेखनविद्या निघण्यापूर्वी बहुत काळ गेला असेल. आणि लेखनाचे पूर्वी हें शास्त्र व राजाने सांगितलेले नियम साधारण भाषेंत व कविता-प्रबंधांत स्मरण रहाण्याकरिता पाठ करून ठेवीत असतील आणि जागोजाग नाना प्रकारचे नियम चालत असतील.

असें होतांना कांही दिवस गुदरल्यावर मागील नियम रद्द करून दुसरे राजे झाले. त्यांनी दुसरे त्यांस जे नीट दिसले ते नियम केले असतील. असें

होतां होतां बहुत नियम झाल्यानंतर जाति झाल्या असतील. पहिला धंदा शेतकीखेरीज दुसरा नसेल. कारण पिकविणें व खाणें हें मनुष्यास मुख्य कर्म जगण्याकरिता जरूर पाहिजे. हें जर लोक न करतील, तर जीव जगणार नाहीत व पिकवावया उद्योग हाच ईश्वराने लोकांस लावून दिला असेल कारण त्या-एवढा धंदा दुसरा कोणताहि नाही. परंतु पुढे असें झालें की, दोनशे चारशे लोक शेत करणार झाले, तेव्हा चारशे नांगर तयार करणें, हें एका मनुष्याचें काम झालें. तेव्हा सुतारकाम ज्याचे त्याने घरोघर करावें, त्यांत सुख नाही, याजकरिता एकाने तें पत्करिलें. मग तो लोकांपासून चरितार्थास दाणे घेऊन नांगर पुरवावे, असें काम करूं लागला, तेव्हा तो सुतार झाला.

पुढे इतकीं पुष्कळ लाकडं रानांतून आणावयास व नांगर करावयास त्यास फावेना, म्हणून दुसरा एक मनुष्य लक्कडवाला झाला. तसेंच इतके लोक घरें बांधून राहूं लागले, तेव्हा गवंडी झाला, व नेम व शास्त्रार्थ पुष्कळ झाले. तेव्हा ते पढून इतर लोकांस सांगावयास जरूर पडली, तेव्हा ब्राह्मण झाले. त्यांनी सर्व नेम व धर्म शिकून लोकांचे दाण्यावर उपजीविका करावी, असें ठरलें. कोणी कज्या करील, तर त्याने ब्राह्मणास पुसावें व त्याने शास्त्रार्थ सांगावा असें झालें. असें होतां होतां लोक देशोदेशीं राहिले, तेव्हा एका देशांत लोक चांगले सुखी आहेत, असें पाहून दुसरे देशांतले लोक गरीब होते ते इकडे येऊन त्यास लुटावयास त्यांनी आरंभ केला. तेव्हा या देशांतील लोक किती एक क्षत्रिय झाले. म्हणजे त्यांनी सर्व दुसरे उद्योग सोडून शिपाईगिरी पत्करली आणि कबूल केलें की, सर्व लोकांचें आम्ही परराष्ट्रापासून पालन करूं. कोणास उपद्रव लागूं देणार नाही. आम्हांस घरीं खावयास द्यावें. तें लोकांनी कबूल केलें. पुढे जो शेतकरी त्याने दाणे घेऊन बाजारांत जावें ही गैरसोय पडूं लागली. तेव्हा एकाने व्यापार आरंभिला. म्हणजे तो दाणे घेऊन इतरांस देऊं लागला व अशाच व्यापारावर आपलें पोट भरूं लागला.

असे एकमेकांचे सोईकरिता ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे चार वर्ण प्राचीन काळीं उत्पन्न झाले; तेव्हा प्रत्येक लबाडी करूं लागले. म्हणून प्रत्येक वर्णाने कसें वागावें, याचा निर्बंध होण्याकरिता कोणी शास्त्र लिहिलें, त्याजवरून त्याचा बंदोबस्त करूं लागले; परंतु शास्त्रासही लोक मानीनात. तेव्हा राजास नेमणें जरूर झालें. आणि राजाचानेही कारभार नीट चालेना

म्हणून राजाने कसें चालावें इत्यादिसंबंधी राजनीति झाली. व क्रमाक्रमाने राजाचे अमलदार, मंत्री, प्रधान आणि सैन्य हे त्याचे ताब्यांत लोकांचे सुखाकरिता आले.

पुढे दाणे घरोघर पोचवावयाची अडचण पडूं लागली, म्हणून सुवर्ण व रुपें या धातु बहुत मेहनतीने तयार होतात, त्यांचे तुकडे करून तें द्रव्य चालूं लागलें. येणेंकरून अशी सोय झाली की, जा ठिकाणीं आपल्यास कांही खरेदी करावयाचें असेल, तेथे ते तुकडे घेऊन गेलें म्हणजे त्याचे बदला जो पाहिजे तो जिन्नस मिळावा. घरोघर गाड्यावर घालून दाणे नेणें जरूर नाही. पुढे हे सोन्याचे तुकडे लोक खोटे करून आणूं लागले. तेव्हा राजाने वरती शिक्का करावा असें ठरलें; तेव्हा रुपये व मोहरा चालू झाल्या. याप्रमाणे धर्मशास्त्राचें व नीतिशास्त्राचें मूळ आहे.

ईश्वराने विचार दिला आहे, तेणेंकरून जें वाईट दिसलें, तें सर्वसंमतीने काढून टाकलें व जें चांगलें होतें, तें ग्रहण केलें. शास्त्र लोकांचे सुखाकरिता केलें आहे. शास्त्राचा मुख्य हेतु हाच आहे की, लोकांमध्ये व्यवस्था व्हावी. जाचें त्यांस मिळावें, कोणाची जबरी कोणावर होऊं नये. मालकी कायम राहावी. प्रजेने नीट वागावें. राजाने प्रजेचे सुखावर नजर देऊन वसूल घ्यावा. जास्ती घेऊं नये व खर्च बेताने करावा. कारण लोकांचे मेहनतीचा पैसा घेऊन राजाने आपले सुखाकरिता, हिताकरिता व डामडौलाकरिता निरर्थक शिपाई व अमलदार बाळगणें यांजकडे खर्च करणें उचित नाही; व अयोग्य मनुष्यास कामावर न ठेवणें हाही राजाचा मुख्य धर्म होय; तर धर्म म्हणजे जे नियम लोकांकरिता केले आहेत, ते व जी आपली योग्यता त्या योग्यतेप्रमाणे व्यापार करणें म्हणजे ब्राह्मण असल्यास विद्या व शूद्र असल्यास कृषिकर्म करणें हाच धर्म आहे. याप्रमाणे बरोबर चालून प्रतारण न करणें व कोणास दुःख न देणें हा मुख्यार्थ आहे. आणि धर्माचें मूळ व शास्त्राचें मूळ विचाराने हेंच कळतें.

• • •

# २. आर्जवीपणा व डौलीपणा

सांप्रत काळीं दोन दुर्गुण हिंदु लोकांत फार उत्पन्न झाले आहेत. एकाचें नांव दिवाळखोरी व दुसऱ्याचें नांव गुलामगिरी; अशीं आम्ही त्यांस नांवें ठेवितों. याहून दुसरे शब्द आम्हांस सुचत नाहीत. जे या दुर्गुणानुगामी आहेत त्यांनी कीर्ति किंवा धन संपादन केलें, असें लोकांस वाटून त्यांचा आचार अधिकाधिक वृद्धिंगत होत चालला आहे.

आम्हांस मोठा चमत्कार वाटतो कीं, जा पुरुषास एक महिन्याचे वीस रुपये मिळत आहेत त्याने थोरांचे नादीं लागून तीस रुपयांचा खर्च करावा, यांत त्यास काय कीर्ति आहे ? परंतु असें करणाराचे मनांत येतें की, "साखरेचा खाणार, त्याला देव देणार," अशी म्हण लोकांत चालत आली आहे. परंतु मला तिचा खरेपणा कांही वाटत नाही. गरिबाचे मनांत येतें की, मी थोरासारखा वागून त्यांचे मंडळींत मिरवेन; आणि तेणेंकरून माझी मान्यता वाढेल. परंतु अशा डौलाने योग्यता चढत नाही, इतकेंच होतें की, तोंडावर कोणी मूर्ख म्हणत नाहीत. निष्पक्षपाती असेल, तो तोंडावरही म्हणतो. बाकी सामान्यतः पाठीमागे म्हणतात.

आता बहुत लोक असेंही पहाण्यांत येतात की, पांच रुपये महिन्याची मिळकत आणि पंधरा रुपयांचें त्यांच्या डोकीस पागोटें. एक म्हण आहे की, "मिजाज बादशहाची आणि अवलाद भडभुंजाची" अशी ते वहिवाट करितात आणि पैसा नाहीसा झाला म्हणजे कांही कामकाज वगैरे असेल तर लाच वगैरे घेऊन किंवा कोणास फसवून, बाता मारून, लबाड्या करून चार रुपये उपटतात. त्याजवर पोट भरावें व तें नाही तर बापआई यांजवळ कांही संपदा असली तर घरांत उचकाउचक करावी; व तेंही नाही तर शेवटीं बाहेर चोऱ्या कराव्या; मग अब्रू जाईल ती जाईल; राहील ती राहील.

परंतु त्यांचे लक्षांत असें वागत नाही की, वस्त्रप्रावरण, डौल आणि ढोंग यांत थोरपणा कांही नाही. आपले मिळकतीप्रमाणे आपण खर्च करावा. थोरांचे गुण घ्यावे. पण त्यांचा खर्च आपल्यास काय होय ! थोरांनी विहिरींत उडी टाकली तर आपण कशास टाकावी ! हें त्यांस कळत नाही. ते थोरांची

बरोबरी करण्यास जातात व थोरांनी एके ठिकाणीं पांच रुपये खर्च केला, तर आपणही करितात. आणि असें मनांत आणितात की, यांचे बरोबरीने खर्च केला, आता आम्हांस यांची योग्यता आली, असें लोक समजतील. परंतु जाणणारे आहेत, ते आपल्या मनांत यास मूर्ख म्हणून समजून उगेच बसतात. इतकें हें दिवाळखोरीचें वर्णन झालें.

आता गुलामगिरी हा तर दुर्गुण सर्व हिंदु लोकांचा आहे, असें मला वाटतें. यांतून एकही मुक्त नाही. याजवर किती एक मूर्ख आपल्यास गोष्टी सांगणारे आर्जवी इत्यादि दुर्लौकिकाचे हुद्द्यावर मुकरर करितात. आणि त्यांचा बहुधा मतलब असा असतो की, थोरांस दुर्गुण व नाना प्रकारच्या खोडी लावाव्या आणि अखेरीस त्यांस बुडवावें. जोंपर्यंत त्यांजवळ अर्थ आहे, तोंपर्यंत त्यांस भुलवून पैसा घ्यावा व त्यांजकडे कामकाज असलें तर त्यांजवळ लोकांची मध्यस्थी करून लाच देववावी व आपणही कांही खावी व नेहमी स्तुति करावी व ते जें म्हणतील त्यास रुकार द्यावा. नेहमी बरोबर फिरावें. असे लोक बहुत झाले आहेत व बहुधा द्रव्याचीं ठिकाणें अशा लोकांनीच वेष्टिलीं आहेत.

त्यांतच भटभिक्षुक यांस मानलें पाहिजे, कारण ते फारच आर्जवी लोक आहेत. ते कांही धर्मरक्षक नव्हत. परंतु त्यांचा व्यापार इतकाच की, यजमानाने चोरी व लबाड्या इत्यादि गुन्हे करून द्रव्य आणिलें तरी चिंता नाही, भटास खावयास घातलें म्हणजे झालें. इतकाच त्यांचा हेतु. आणि द्रव्यवानाने कसेंही कर्म केलें तरी त्यास शास्त्रार्थ काढून द्यावा; असे लबाड लोक बहुत धर्म म्हणून बाळगतात. परंतु ते उभयलोकीं अकल्याणकारक आहेत. कोणताही श्रीमंत पहा, त्याचे घरीं पंक्तीबारगीर फार असतात. परंतु त्यांची निवड केली तर शेकडा दोनचार उपयोगी निघतील. बाकी सर्व गुलामगिरी करणारे होत; असे विचारी आहेत त्यांचे मनांत येईल. अस्तु.

ही चाल या लोकांत बहुत आहे. आणि जे केवळ गरीब आहेत, जांस खावयास नाही, तेच असें करितात असें नाही. जांस स्वार्थ आहे त्यांसही ही निर्लज्जपणाची गुलामगिरी करावी असें वाटतें. आणि आपल्याहून थोर म्हटलेले असतात त्यांचे आर्जव करितात. बहुत स्तुति करितात आणि आपले घरून त्यांचे घरीं जाऊन पायमळणी करितात. तेणेंकरून त्यांस असें वाटतें की आम्ही त्याच्यासारखे होऊं आणि आमची प्रतिष्ठा अधिक होईल. परन्तु लोक

त्यास मूर्ख मात्र म्हणतात. आणखी कांही होत नाही. पहिला थोरपणा आणि स्वतंत्रपणा असतो, तोही जातो.

आम्ही किती एक लोक असे पाहिले आहेत की, जोंपर्यंत शिरस्तेदारी, नाझरी किंवा असा दुसरा कोणता मोठा हुद्दा कोणा माणसाकडे आहे तोंपर्यंत त्याजकडे हरवक्त लोक येतात व मेजवान्यांचीं बोलावणीं येतात. जसें कोणी म्हणेल की, याचा व त्यांचा परमस्नेह हरएक प्रकारें "जीवश्च कंठश्च" आहे; परंतु त्याजकडील काम गेलें म्हणजे तो जर मरावयास भूमीवर काढला असेल तर तो जिवंत आहे काय, असा समाचारही घेत नाहीत. व पूर्वी ज्यांचे बंधु असे म्हणवीत होते, त्यांचा मुलगा भीक मागूं लागला तरी त्यास एक दिवस देखील बोलावीत नाहीत. कामावरून दूर झाला म्हणजे बोलवण्याचे यादींतून त्याचें नांव निघतें. असे ते स्नेही. या प्रकारें करून आर्जवी लोक वेष घेऊन लोकांस बुडवितात. त्यांचा सर्व काळ हाच उद्योग. हे लोक "असतील शितें तर मिळतील भुतें" याप्रमाणे आहेत आणि इतकेंही करून नफा काय! पोट मात्र भरतें आणि मेले तर पाठीमागे व जिवंत असतांना दुष्कीर्ति लोकांत होते. असें आयुष्य घालविण्यापेक्षा गरीब राहून मेहनत करावी व स्वतंत्रपणानें भाकर मिळाली तर ती आगंतुकीपेक्षा बरी. परंतु हा स्वतंत्रपणाचा लाभ कोणास कळत नाही. मुळापासून हिंदुस्थानांत एकतन्त्री राज्य. याजमुळ लोक इतकी गुलामगिरी करावयास शिकले. दुसरें कारण दिसत नाही.

नाना फडणीस याची गोष्ट सांगतात की, मराठे लोकांत नाना फडणीस शहाणा प्रधान होता. तो बाजीराव आल्यावर बडतर्फ झाला व त्यास कांही कामकाजही नाहीसें झालें. तेव्हा कोणी त्याचे मित्रानें सुचविलें की, आता तुमचा वृद्धापकाळ झाला, व बाजीरावाचें तुमचें नीट नाही. त्यापेक्षा सरकारांत विनंती करून कांही पोटापुरती नेमणूक करून घेऊन काशीस जावयाचा बेत करावा. त्यांजवर त्यांनी उत्तर दिलें की, स्वामींची सेवा मरणपर्यंत करावयाची; आपले कामावर मरावें असें सांगितलें आणि त्याप्रमाणे केलें. तात्पर्य, मराठे लोकांची चाल याप्रमाणे आहे की, जन्मपर्यंत चाकरी करावी, चाकरीसारखें दुसरें सुख मानीत नाहीत. हाही गुलामपणाच आहे.

चाकरी हें निंद्यकर्म होय. हें कामापुरतें करावें आणि सामार्थ्यानुसार लवकर सोडावें. परंतु जे लबाड लोक आहेत ते नेहमी नीटपणें चाकरी करीत नाहीत. यास्तव बहुत दिवस ते चाकरी करतात. सरकारी चाकरी हें लोकांचें धर्माप्रमाणेच काम आहे. व हें नीट करण्याहून दुसरा सद्धर्म कोणता नाही. असें मनांत न आणितां ते असें समजतात की, सरकार चाकरी चांगली मिळाली म्हणजे आपणांस भूमींतील द्रव्य सापडलें; मग पाहिजे तसें करावें, लोकांस बुडवावें आणि आपलें घर भरावें. द्रव्य मिळविण्याचा हाच हंगाम आहे, असें जाणून त्याप्रमाणें ते जुलमाची वहिवाट करितात. म्हणूनच अशी लबाडी करावयाचे ठिकाण सोडून त्यांच्याने जाववत नाही. इतकाच नेटिव लोकांचे स्वभावाचा अर्थ दिसतो आणि जो शोधून पाहील त्यास असेंच वाटेल की, हे लोक फार अप्रामाणिक व लोकांस बुडविण्याविषयी धुरंधर आहेत. यांची म्हण अशी आहे की, "सरकारचें खाऊं नये तर कोणाचें खावें ?"

जर मनुष्यास स्वस्थतेचें सुख व व्यापार–शेतकी वगैरे धंदे यांतील थोरपणा समजेल तर ते चाकरी तुच्छ मानतील, परंतु तें कळत नाही. त्याजमुळे अशी दुराशा धरून लोक दुष्टपणा करितात. याजमुळे आपले लोक आपल्या राज्यास मुकले आहेत. कारण स्वदेशीय राजाचा जुलूम लोकांस सोसवत नाहीं. इंग्रज व परकी दुसरे बरे वाटतात. अस्तु. नेटीव लोकांनी आपला लुटारूपणाचा स्वभाव व गुलामगिरी आणि दिवाळखोरी हीं सोडून स्वदेशीय लोकांचे हिताविषयी विचार केला पाहिजे. गुलामगिरीपासून दिवाळखोरी होते. जर मनुष्य आपला स्वतन्त्रपणा राखील तर त्यास दुसऱ्यासारखें करण्याची जरूर नाही. गुलामगिरी आणि दिवाळखोरीपासून लुटारूपणा वगैरे अनर्थ होतात.



## २. हिंदु लोकांनी उद्योग करण्याची आवश्यकता

प्राचीन काळचे हिंदु लोक हे आपले देशांत स्वस्थ होते. परकी लोक या देशांत फार येत नव्हते व प्रजा थोडी होती, हें प्राचीन काळचे इतिहासावरून कळतें. कारण दक्षिणभागीं हिंदुस्थानांत पहिली वस्ती थोडी

व अरण्यें फार होतीं. हिंदुस्थानांत उत्तरभागीं मात्र लोक रहात होते व तेही फार थोडे असतील. याजवरून हें दिसतें की, त्या वेळचे राजांचा राजधान्या फार जवळ जवळ होत्या; म्हणजे अयोध्या, मथुरा, कानपुर, हस्तिनापुर इत्यादि; याजवरून त्या राजांचें राज्य संक्षेपित होतें, यांत संशय नाही; व लोकही विरळा असतील आणि पीकपाणी फार, यामुळें शिल्लक रहात असेल.

कारण जितके लोक खाणार होते तितक्यांचे उद्योगानें जें पिकत होतें, तें फाजील रहात होतें. याजमुळे आळसाच्या प्रवृत्ती निघाल्या. आतां तसें नाहीं; आता लोक फार वृद्धिंगत जहाले व त्यांस खावयास मिळत नाही; कारण सर्व उद्योग करीत नाहीत. जितके लोक उद्योग करितात तितक्यांचे उद्योगाचे उत्पन्नावर आळसी लोक फार जाले, त्यांचा निर्वाह होत नाही. तत्रापि उद्योग करण्याचें या लोकांस अजून समजत नाही.

मुख्यत्वेंकरून ब्राह्मण लोक उद्योगाचे शत्रूच आहेत. ते पहिल्याप्रमाणे पहातात; परंतु त्यांचे शापाचें ढोंग होतें, तें अगदी गेलें. त्यांस जेवावयास दिल्हें म्हणजे ईश्वर तृप्त जहाला; त्यांचें सुख तेंच देवाचें सुख; त्यांचा हात तोच देवाचा हात; हें ढोंग लोकांस कळून आलें. हे फुकट खाणारे असें लोक समजतात. परदेशचे लोक या देशांत आले, त्यांनीं तर या ढोंगाची परिस्फुटता फारच केली. सर्व आळशी लोकांस पुरेल अशी सामग्रीही या देशांत नाहीं. जसें एका घरांत दहा मनुष्यांचें अन्न असतें, तेथें पंचवीस पाहुणे आले म्हणजे घरचा माणसांनी उपाशी रहावें तरच पाहुण्यांचा कांही निर्वाह होईल. तशी या देशाची हल्ली स्थिति आहे. पहिल्याने मुसलमान लोक या देशांत आले. बाहेरचे लोक जे येतात ते कांही मेहनत करण्यास येत नाहीत; ते आयते खावयास येतात. तेव्हा हजारो मोगल लोक, नबाब, अमीर, सरदार हे या लोकांचे उद्योगावर खाऊं लागले मग अर्थातच या लोकांस कमती पडूं लागली.

नंतर अलीकडे इंग्रज इकडे आले. तेही कांही इकडे शेतभात मळाटळा करण्यास आले नाहीत ते इकडे श्रीमंत होऊन चार पैसे इकडून घेऊन घरीं जावें, यास्तव येतात. व ते शहाणे आहेत तेव्हां ते गरीब लोकांप्रमाणे कां खपतील बरें ? त्यांनी सुखाचा जागा, मोठालीं कामेंकाजें उपटलीं. हजारो इंग्रज लोक अमीरांप्रमाणे इकडे येऊन रहातात. व हजारो इंग्रज शिपाई

इकडे येतात. इतक्या या लोकांचें पोषण हिंदु लोकांचे मेहनतीने जें उत्पन्न व्हावयाचें त्यांतच होतें. वास्तविक म्हटलें तर फार पाहुणे आले म्हणजे त्यांनी उपाशी रहावें. परंतु हे साधारण पाहुणे नव्हत, तर ते शूर, विद्वान्, गुणी व जबरदस्त आहेत. तेव्हा आपले लोकांपुढे ठेवलेल्या पत्रावळी त्यांनी ओढल्या आणि हे लोक त्यांचे तोंडाकडे पहात बसले. याजमुळे या लोकांस पाऊस पडूनही दुर्भिक्ष आहे. कोणत्याही देशांत तेथील लोकांचा सुखेंकरून निर्वाह व्हावा, इतकें पीक होतें; परन्तु जर बाहेरचे लोक त्यांत पुष्कळ आले तर जमिनीने अन्न सर्वांस कोठून पिकवावें व पुरवावें ! याजमुळे हे लोक भिकारी झाले आहेत. अमीरपणा, शिपाईगिरी, राज्यकारभार या लोकांकडे होता, तेव्हा कोणतेंही प्रकारचें दुर्भिक्ष नव्हतें. कारण देशांत जें उत्पन्न होत होतें तें खाऊन ते स्वस्थ होते. ही गोष्ट स्पष्ट रीतीने कळण्याकरिता मी थोडा अजमास करून हिशेब लिहितों.

सरासरी हिंदुस्थानांत एकंदर पांच लक्ष कोस औरस चौरस आहेत. त्यांपैकी अडीच लक्ष कोस रानें, डोंगर, नद्या, खडक, झाडें, घरें, शहरें इत्यादिकांमुळे नापीक आहेत. ते वजा देऊन बाकी अडीच लक्ष कोस चांगले पिकाचे आहेत. आणि एकंदर या देशांत माणसें दहा कोट आहेत. तितक्यांना अन्न पाहिजे. तेव्हा याची वाटणी बसविली तर एक कोसास चारशें माणसें पडलीं. त्यांत चारशें माणसांपैकी निम्मे स्त्रिया. बाकी दोनशांपैकीं शंभर माणसें उद्योगावाचून म्हणजे आजारी, वृद्ध, बाळें, आंधळे, वगैरे व्यंग व व्यापारी, अंमलदार, तमासगीर, श्रीमंत हे सरासरी शंभर. बाकी शंभर राहिले, ते काम करणारे. इतक्यांनी मेहनत करून चारशे लोकांचा निर्वाह करावा. तेव्हा शंभर माणसें एक कोस जमिनींत खपलीं तर चारशांचें पोट भरण्याइतकें उत्पन्न करतील, किंबहुना जास्ती करतील.

परंतु काळेंकरून लोकांमध्ये श्रीमंती वाढत चालली, तों आळशी लोक वाढत चालले. म्हणजे जो एकटा श्रीमंत आहे तो आपणच काम केल्याशिवाय खातो असें नाही. त्यास चाकर पाहिजेत घोडे पाहिजेत, परीट धुवावयास पाहिजेत, शिंपी शिवावयास पाहिजेत, ऊन लागेल म्हणून अब्दागिरी पाहिजेत. रस्ता दिसत नाहीं म्हणून मशालजी, चोपदार इत्यादि मिळून तो एकटा पंचवीस माणसें घेऊन बसला. आगखी जों जों श्रीमंती वाढली तों तों

गाणार पाहिजेत, वाद्यें वाजविणारे पाहिजेत, देवपूजा करावयास भट पाहिजे व पंक्तीस दहा पानें पाहिजेत, हे अनर्थ झाले तत्रापि सर्वांचा भार शंभर माणसांनी सोसला आणि सुखेंकरून राहिले. परन्तु आता काय झाले की, या लोकांचा ताटांत इंग्रज लोक, मुसलमान लोक आले, ते कांही बरोबर घेऊन आले नाहीत. आमच्यापैकी खावयास आले, आणि तेही एकटे खाणारे नव्हत. एक एक असा श्रीमंत की, त्यांचे मागे पन्नास रिकामे माणूस; कोणी घोडा खाजविणारा, कोणी रथ हाकणारा, कोणी हिशेब लिहिणारा, कोणी कारकून, कोणी कपडे नेसविणारा, कोणी शिजविणारा, कोणी पोराला दूध पाजणारा, असे होते. कारण ते स्वता कांही काम करावयाचे नाहीत याजमुळे हा समुदाय चारशांमध्ये येऊन पोचला. व आपले लोक जे श्रीमंत होते हे कांही आपली खोड टाकीत ना ते श्रीमंती असावी अशी इच्छा करणार. व इंग्रज तशीच इच्छा करणार. तेव्हा दोघांचा निर्वाह चालेना आणि आपले लोक भिकारी होत चालले.

ब्राह्मण म्हणतात की, आजपर्यंत आम्ही काम कधी केलें नाही व पुढे करणार नाही. स्त्रिया काम करावयाच्या नाहीत. तेव्हा इतक्या सर्वांचा निर्वाह कसा होईल ? याजमुळे जरूरी येऊन पडली की, आपले लोकांनी श्रीमन्ती सोडावी आणि ती सर्व इंग्रजांकडे द्यावी, तरच निर्वाह होईल. व कांही काळ असेंच चाललें तर आपले लोकांत एकही श्रीमंत वाचणार नाही. कारण श्रीमंती राहणें अवघड पडेल. इतक्यांचा निर्वाह होत नाही. याजमुळे हे लोक अर्थातच भिकारी झाले. त्यांत आणखी या देशांतील कामें व व्यापार इंग्रजांनी घेतले. जड्ज तेच; माजिस्त्रेट तेच; वस्त्रें विकणारे तेच; माल आणणारे तेच; टंकसाळ घालणारे तेच; व शिपायी तेच. इतक्या लोकांचीं कामें पूर्वी आमचे लोकांमध्ये होतीं तेव्हा ठीक होतें. परन्तु तीं सर्व त्यांचे हातीं गेलीं, तेव्हा जा जा लोकांचीं कामें त्यांनी घेतलीं ते ते लोक रिकामे झाले आणि उपाशी मरूं लागले. यांत त्यांनी इतक्या सर्वांस अन्न कोठून पुरवावें ?

तेव्हा परिणाम असा होईल की, आपले लोक सगळे शेतभात करणारे होतील. आणि श्रीमन्त, सावकार व अमलदार इंग्रज होतील. जितकी मेहनत करून पिकवावयाचें काम, तितकें आपले लोकांकडे राहील. जितकें सुखाने खाऊन रहावयाचें काम, तितकें ते लोक बळकावतील. तेव्हा अर्थातच हे

लोक भिकारी झाले. परन्तु इतकी मजल येऊन पोचली नाही. कारण अद्याप कोठे कांही संस्थानें आहेत, व तीं जरी धुंदींत आहेत तरी द्रव्यवान आहेत. याजमुळें चार माणसांचा निभाव होतो व हिंदु लोक चार सुखी आहेत, असें नजरेस पडतात. परन्तु हें फार दिवस चालणार नाही. कारण जीं संस्थानें आहेत, तीं मृतप्राय होऊन राहिलीं आहेत. कोणामध्ये शहाणपण नाही. तीं एका पाठीमागून एक जाणार. अस्तु.

असा प्रसंग आला, तेव्हा आपले लोकांस सुखी होण्याची युक्ति कोणती म्हणाल, तर अशी आहे की, जितके इंग्रज लोकांचे व्यापार व रोजगार इकडे कमी होतील तितके या लोकांस ज्यास्ती सुख आहे. याजकरिता या लोकांनी विद्या व ज्ञान यांचे प्राप्तीस झटावें व इंग्रजांप्रमाणे शहाणे व्हावें. आणि जे व्यापार ते करितात ते आपण करावे. कोणी म्हणतील की, त्यांस द्रव्य अनुकूळ आहे आणि या लोकांजवळ द्रव्याची अनुकूलता नाही, तर ही गोष्ट खरी; परन्तु त्याचा निर्णय आज लिहिणें जरूर नाही; जेव्हा सर्व लोक पुढे सरावे अशी इच्छा करतील व रानटीपणाचा समजुती सोडून देतील, तेव्हा अनुकूळता सहज होईल.



म. गो. रानडे ( १८४२–१९०१ )

# ४. महाराष्ट्रांतील साधुसंत

शिवाजीचे धर्मगुरु प्रसिद्ध रामदास यांनीं एके प्रसंगीं संभाजीस आपल्या बापाचें अनुकरण करण्यासाठीं फार मार्मिक उपदेश केलेला आहे. ह्या उपदेशामृताचें सार अवघ्या दोनच वाक्यांत त्यांनीं दिलें आहे. संभाजीस स्वामी रामदास सांगतात.

'मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्र धर्म वाढवावा ॥'

ही कल्पना शिवाजीनें पूर्णत्वास आणून निर्विघ्नपणें सिद्धीस नेली. फार काय, प्रायः हीच कल्पना शिवाजीच्या सर्व राजकीय चळवळीचा पाया होय. 'महाराष्ट्रधर्म वाढवावा' या दुसऱ्या वाक्यांत रामदासांनीं आपल्या वेळीं महाराष्ट्रांत चोहींकडे जी धर्मजागृति होत गेली किंबहुना तत्कालीन राजकीय चळवळमुद्धां ज्या धर्मजागृतीचें केवळ प्रतिबिंबच होतें त्या धर्मजागृतीचें हुबेहूब चित्र आहे. वरील उपदेशांत वैदिक, पौराणिक अगर हिंदुधर्माचा प्रसार करण्यास ते सांगत नाहींत. 'महाराष्ट्रधर्म' वाढवावा असा ते उपदेश करतात. तेव्हां यांतील इंगित काय असावें असा प्रथमदर्शनीं प्रश्न उत्पन्न होतो. वैदिक, पौराणिक वगैरे धर्माहून महाराष्ट्र धर्माचीच स्वामींनीं महती कां गायिली, महाराष्ट्रीयांच्या धर्मकल्पनेंत असा विशेष गुण काय होता, संभाजीनें चालविलेल्या जुलुमापासून महाराष्ट्रीयांस मुक्त करण्यास महाराष्ट्रधर्म-जागृति करणें एवढाच काय तो तरणोपाय, असा रामदासांचा समज कां झाला वगैरे विचार एकामागून एक मनांत येऊं लागतात. महाराष्ट्राच्या इतिहासांत राजकीय व धार्मिक उन्नतीची एक बेमालूम सांगड बनली आहे. ह्या सांगडीचें महत्त्व बरोबर कळलें नाहीं, तर मराठ्यांचा अभ्युदय हें एक मोठेंच गूढ होऊन बसेल. मराठी साम्राज्याचा पाया उदात्त नैतिक तत्त्वावर उभारला नसून मराठ्यांचे राजकीय प्रयत्न म्हणजे लुटारू लोकांची एक धामधुमीची गडबड असें वाटूं लागेल. वर सांगितलेला हा राजकीय व

धार्मिक सुधारणेंतील परस्परसंबंध आजपर्यंत कोणाही इतिहासकाराच्या लक्ष्यांत आला नाहीं. या सर्व इतिहासकारांनीं, मराठ्यांनीं स्वातंत्र्यप्राप्तीकरितां चालविलेल्या प्रयत्नांचा एकाच बाजूनें विचार केला आहे. राजकीय प्रगतीबरोबर मराठ्यांची धार्मिक उन्नति कशी होत गेली याचें त्यांनीं बिलकुल विवेचन केलें नाहीं. अशा रीतीनें ही धार्मिक आणि राजकीय सुधारणेची सांगड फुटली गेल्यानें मराठ्यांबद्दल बराच गैरसमज उत्पन्न झाला आहे.

हा गैरसमज दूर करावा म्हणून मराठ्यांच्या धार्मिक जागृतीचा इतिहास त्रोटक रीतीनें देण्याचें आम्हीं योजिलें आहे. ही माहिती मिळण्याचें मुख्य ठिकाण म्हणजे, गेल्या शतकाच्या शेवटीं या भागास ब्रिटिश सत्तेचें वारेंसुद्धां लागलें नव्हतें, अशा वेळीं आमच्याच कविमालिकेपैकीं कविवर्य महिपतीनें महाराष्ट्रांतील साधुसंतांचीं लिहून ठेवलेलीं विस्तृत चरित्रेंच होत. महाराष्ट्रियांस राजकीय स्वातंत्र्य जसें एका मनुष्याचे हातून किंवा एका शतकांत प्राप्त झालेलें नाहीं, तसेंच मराठ्यांची धर्मोन्नति होण्यास बराच काळ लागून पुष्कळ साधुसंतांचे उपदेश खर्ची पडले आहेत. मुसलमानांनीं दक्षिण जिंकण्यापूर्वीच ह्या धर्मसुधारणेस सुरुवात झालेली आहे. देवगिरीस यादव राजे राज्य करीत होते, तेव्हांच साधु ज्ञानेश्वरानें भगवद्गीतेवरील आपली प्रसिद्ध ‘ ज्ञानेश्वरी ’ टीका मराठींत लिहिली. बल्लाळराजांचे वेळीं मुकुंदराज प्रसिद्धीस आला. त्याच वेळीं त्यानें आपला प्रसिद्ध ग्रंथ ‘ विवेकसिंधु ’ लिहिला. बाराव्या शतकांत मराठींत जे जे ग्रंथ प्रसिद्ध झाले, त्यांत ह्या मुकुंदराजाचे ग्रंथांस अग्रस्थान दिलें पाहिजे. पुढें मुसलमानांच्या स्वाऱ्यांस सुरुवात झाली, तेव्हां हा प्रगतिप्रवाह थोडासा मंदावला, पण कांहीं काळानें महाराष्ट्रियांच्या बुद्धिचातुर्यानें पुनः उचल खाल्ली. मराठी सत्तेच्या उदयकाळीं तर एक साधुसंत-परंपराच महाराष्ट्रांत चोहींकडे पसरली होती. अशा प्रमाणें हा प्रगतिप्रवाह सरासरी २०० वर्षें मोठ्या जोरानें फोफावत चालला होता, पण पुढें त्यास हळू हळू ओहटी लागली, व त्याच्या अंताबरोबर मराठ्यांचें राजकीय स्वातंत्र्यही नष्ट झालें. साधारणपणें हें धर्मजागृतीचें काम ५०० वर्षेंपर्यंत चाललें होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. इतक्या मुदतींत सुमारें ५० साधुपुरुष निर्माण झाले, व त्यांनीं सर्व महाराष्ट्रभर आपली छाप पूर्णपणें बसवून सोडली. असा ज्या साधुसंतांचा प्रभाव त्यांचीं चरित्रें लिहिण्यास महिपतीस स्फूर्ति झाली यांत

नवल काय ! या साधुसंतमेळ्यांत कांहीं स्त्रिया, कांहीं हिंदुधर्म स्वीकारलेले मुसलमान, कांहीं मराठे, कुणबी, शिंपी, माळी, कासार, सोनार, पश्चात्तापानें शुद्ध जाहलेल्या वेश्या, दासी व अतिशूद्र, महार व निम्मेशिम्मे ब्राह्मण अशी मंडळी होती. यावरून असें आढळून येईल कीं, आध्यात्मिक उन्नतीचा केवळ परिणाम एकाच जातीवर घडला नसून लहानापासून थोरापर्यंत सर्व समाज तिनें अगदीं वेडा करून टाकिला होता. उच्चनीच, अज्ञ-सुजाण, स्त्री-पुरुष, हिंदु-मुसलमान, एकसह सर्व लोक धर्मानंदांत नाचूं लागले होते. अशा प्रकारची धर्मजागृति इतर देशांचे इतिहासांत क्वचित् सांपडेल. याच सुमारास उत्तर व पूर्व हिंदुस्थानांतही धर्मजागृति होण्यास सुरुवात झाली होती. नानकानें सर्व पंजाब हलवून हिंदु-मुसलमान धर्मांचें ऐक्य करण्याचा प्रयत्न केला. पूर्वेकडे चैतन्यानें शाक्तधर्माचें बंड मोडून भागवत धर्माचा प्रसार करण्याचा प्रारंभ केला. रामानंद, कबीर, तुळसीदास, सुरदास, जयदेव, रोहिदास, वगैरे आपआपल्यापरी लोकांस आध्यात्मिक ज्ञानामृत पाजण्याचें कार्य करीत होते. याचा परिणाम मोठा झाला व तो चिरस्थायीही झाला; परंतु महाराष्ट्रांतील साधुसंतांच्या कार्याच्या पासंगालाही तो येणार नाहीं. चांगदेव व ज्ञानदेव, निवृत्ति व सोपान, मुक्ताबाई व जनी, अकाबाई व वेणुबाई, नामदेव व एकनाथ, रामदास व तुकाराम, शेख महंमद व शांति बहामनी, दामाजी व उद्धव, भानुदास व कूर्मदास, बोधलेबाबा व संतोबा पवार, केशवस्वामी, जयरामस्वामी, नरसिंहसरस्वती व रघुनाथस्वामी, चोखा-मेळा व दोघेही कुंभार, नरहरि सोनार व सावत्या माळी, बहिरामभट व गणेशनाथ, जनार्दनपंत व युधोपंत; हीं नांवें आणि अशीं किती तरी घ्यावींत ! हा सर्व तांडा पुढें आला म्हणजे महाराष्ट्रांतील चळवळीच्या विशेष कर्तबगारी-विषयीं बालंबाल खात्री होऊन जाते. इकडच्या भागांत साधुसंतांच्या वर्गांत ब्राह्मणांचा भरणा विशेष आहे. तेच हिंदुस्थानच्या इतर भागांत ब्राह्मण साधूंच्या संख्येपेक्षां क्षत्रिय व वैश्य साधूंचीच संख्या अधिक आहे.

संतांचीं सर्व चरित्रें पाहिलीं तर असें दिसतें कीं, त्यांच्या अंगीं मेलेल्यास जिवंत करणें, आजारी मनुष्यास बरें करणें, क्षुधार्तास अन्न देऊन संतुष्ट करणें, इत्यादि अघटित कृत्यें करण्याचें आद्वितीय व अद्‌भुत सामर्थ्य असतें, अशी लोकांची कल्पना आहे. त्याप्रमाणें महाराष्ट्रांतील संतचरित्रांविषयींही गोष्ट

आहे. परोपकार हें जें त्यांचें व्रत तें पाळण्यांत त्यांना अमानुष किंवा दैविक शक्तीपासून साहाय्य मिळतें, अशा ज्या गोष्टी सांगतात, त्या सध्यांच्या काळीं म्हणजे, तर्कशास्त्राच्या कसोटीस उतरल्याशिवाय कोणत्याही गोष्टीवर भरंवसा ठेवावयाचा नाहीं, अशा प्रवृत्तीच्या कालांत कोणास संमत असोत वा नसोत; लेकीसाहेबांनीं म्हटल्याप्रमाणें ज्या वेळेस लोक कोणत्याही गोष्टीवर विश्वास ठेवण्यास सहज तत्पर असतात त्या वेळेस असे अद्भुत चमत्कार नेहमीं होतात असें म्हणण्याकडे व प्रतिपादण्याकडे लोकांची प्रवृत्ति होण्यास अनुकूल असें एक लोकमताचें वातावरण तयार होत असतें. साधुसंतांकडे खुद्द पाहिलें तर आपल्या अंगांत अद्भुत शक्ति आहेत असा ते कधीं बाणा बाळगीत नाहींत. ते म्हणजे अगदीं लीन, सहनशील व ईश्वरावर सर्वस्वीं भरंवसा ठेवून राहिलेले पुरुष होत. त्यांचा दृढविश्वास खरोखर अस्थानीं नसून सर्वथा यथार्थ आहे असें पुष्कळ वेळां त्यांचे प्रत्ययास आलें. ह्या परमेश्वरश्रद्धेच्या फलद्रूपतेबद्दल त्यांचा त्यांसही अचंबा वाटे. नैतिकदृष्ट्या या सर्व संतचारित्रांचें महत्त्व त्यांच्या या अचाट कृत्यांवर नाहीं, तर नीतितत्त्वांचा खरेपणा व मनुष्याच्या उदात्त पारमार्थिक जीविताची सत्यता सिद्ध करून देण्यास त्यांच्या चरित्रांचा जो उपयोग झाला त्यांवर आहे. त्यांच्या चरित्राच्या या स्मरणीय स्वरूपाशींच पुढील इतिहासभागाचा संबंध आहे, आणि त्यांनीं जें कार्य केलें तें केवळ अमूल्य व सर्वतोपरि उदात्त होतें तें आम्ही दाखविणार आहों.

युरोप खंडांतील धर्मसंशोधनाची चळवळ आणि तत्कालीन आमच्या या महाराष्ट्रांत झालेल्या साधुसंतांचे लेख व शिक्षणपद्धति यांनीं प्रतिबिंबित झालेला झगडा या दोहोंत एक प्रकारचें विशेष साम्य दिसून येतें. सोळाव्या शतकांतील युरोपस्थ सुधारणेच्छु लोक पाद्री व त्यांचा मुख्य गुरु जो रोमचा धर्माध्यक्ष ( पोप ) यांचा अधिकार तुच्छ करूं लागले. या पाद्र्यांस व त्यांच्या पोपास जो अधिकार प्राप्त झाला होता तो केवळ प्राचीन कालापासून चालत आला आहे; आणि या अधिकारापासून रोमन देशाची धुळधाण करणाऱ्या रानटी लोकांच्या समूहाची सुधारणा होऊन त्यांना माणूसपणा आला असें ते पाद्री म्हणत. कालांतरानें आपण चाकर आहोंत हें विसरून, धनी आपण, राज्यकर्ते आपण, ऐहिक, पारमार्थिक सर्व शक्ति आपल्या ठायीं आहेत, आणि ईश्वर व मनुष्य यांच्यामधील मध्यस्थही आपणच असें ते म्हणूं लागले. या मध्यस्थ-

पणास त्यांनीं अनेक धर्मविधि व संस्कारांचें कुपण घातलें. त्याचा परिणाम असा झाला कीं, कालांतरानें पुष्कळ दुष्ट आचार प्रचारांत येऊन त्यायोगें लोकांचें त्यांचेवरील प्रेम नाहींसें झालें. कपटपटु पोप व त्याचे व्यसनासक्त कार्डिनल्स ( मार्गोपदेशक ) यांची ऐहिक सत्ता राखण्याकरितां कराच्या रूपानें धर्मादाय म्हणून नव्हे, 'पीटर्सपेन्स' नांवाचा कर करड्या अधिकारी वर्गांनीं सुरू केला व 'इंडलजन्सीस' प्रसिद्ध केले; त्या अधिकारीवर्गाविरुद्ध ल्यूथर जेव्हां भांडूं लागला त्या वेळेस या दुष्ट आचारांचा कळस झाला होता. पश्चिम हिंदुस्थानांतील धर्मसुधारणेचें साम्य याच गोष्टींत दिसून येतें. प्राचीन अधिकार व प्राचीन सांप्रदाय हिंदुस्थानांत, महत्त्वाकांक्षी बिशप व क्लर्जी यांच्या ठिकाणीं नव्हे, तर ब्राह्मण जातीमध्यें दृढतर खिळून गेले होते व ह्या ब्राह्मण जातीच्या प्रभुत्वाविरुद्ध साधुसंत मोठ्या धैर्यानें झगडत होते. मनुष्याच्या आत्म्याचें उच्चत्व, त्याचा जन्म अगर त्याची समाजांतील स्थिति यांजवर अवलंबून नाहीं असे ते प्रतिपादन करीत. असा सिद्धान्त काढण्यास धर्मोप-देशकांस त्यांचा आयुष्यक्रम व त्यांचें शिक्षण सहज कारणीभूत झालें.

वर म्हटल्याप्रमाणें त्यांच्यापैकीं जवळ जवळ निम्मेशिम्मे ब्राह्मणांशिवाय इतर जातींतील होते. कांहीं कांहीं तर खरोखरच हलक्या जातींतील होते. ब्राह्मणसुधारकांपैकीं पुष्कळांच्या वंशपरंपरागत शुद्धत्वास कलंक लागून त्यायोगें ते कोणताही कृत्रिम निर्बंध नको असें म्हणण्यास तयार झाले. ज्ञानदेव, त्यांचे बंधु व बहीण मुक्ताबाई यांचा जन्म त्यांचा बाप विरक्त होऊन संन्यासी झाल्यावर झाला. त्याचा धर्मगुरु रामानंद यास जेव्हां समजलें कीं, संन्यास आश्रम घेण्यास त्याच्या बायकोची परवानगी नव्हती, तेव्हां त्यानें ज्ञानदेवाच्या बापास आपल्या गांवीं जाऊन बायकोजवळ राहण्यास आज्ञा केली. अशा प्रकारें त्या संन्याशास झालेल्या मुलांस त्या जातींतील सर्व लोक अगदीं हलक्या जातींतील समजून त्याचा तिरस्कार करीत व ब्राह्मणांनीं तर योग्य कालीं त्यांचें मौंजीबंधनसुद्धां करण्याचें नाकारिलें. अशा अज्ञात स्थितींत तीं मुलें जन्मभर राहिलीं; पण लोक त्यांच्या ज्ञातिहीनत्वाकडे लक्ष न देतां उलट त्यांचा मानच करूं लागले. दुसरा साधु मालोपंत याचा एका नीच जातींतील मुलीशीं विवाह झाला होता. तिची जात लग्न होईपर्यंत कोणासही कळली नाहीं. पण नवऱ्यानें तिचा त्याग न करितां फक्त तिच्याशीं व्यवहार करण्याचें वर्ज्य केलें आणि ती

मेल्यानंतर जनरूढीस अनुसरून तिची उत्तरक्रिया करूं लागला. त्या वेळीं एक अद्भुत चमत्कार दृष्टीस पडला. त्यायोगें त्याचे जे कट्टे शत्रु होते त्यांची सुद्धां खात्री झाली कीं, हे दोघेही जन्मतःच परमपवित्र होते. त्याचप्रमाणें जयरामस्वामीचा गुरु कृष्णदास याचा एका नापितकन्येशीं विवाह झाला व नंतर तिचें हीनजातित्व कळून आलें; तथापि त्या मनुष्याच्या पवित्र आचरणाचा असा परिणाम झाला कीं, त्याचा पुष्कळ छळ होऊनही त्या वेळच्या श्रीजगद्‌गुरु शंकराचार्यांनींही त्यांच्याविरुद्ध ब्र देखील काढला नाहीं. एकनाथ जातिभेदास अगदीं कमी महत्त्व देत होता ही गोष्ट महशूर आहेच. त्यानें एका बुभुक्षित महारास भोजन घातलें आणि नंतर जेव्हां त्यास वाळींत टाकलें आणि प्रायश्चित्त घेण्याकरितां म्हणून तो नदीवर गेला, तोंच एक चमत्कार झाला. त्याच्या योगानें असें सिद्ध झालें कीं, एका बुभुक्षित महारास अन्न देण्याचें पुण्य सहस्र ब्राह्मणांस भोजन घालून मिळणाऱ्या पुण्यापेक्षां जास्त आहे. कारण कीं, पहिल्या पुण्यानें एका महारोग्याचा रोग बरा झाला व दुसऱ्यानें कांहींच परिणाम झाला नाहीं. त्याच प्रकारचा एक चमत्कार पुष्कळ साधुसंतांनीं केलेला विशेषेंकरून ज्ञानदेव, एकनाथ ह्यांनीं केलेला सर्वांस महशूर आहेच. तो असा : ज्ञातिनियम मोडल्याबद्दल आम्ही तुमच्या घरीं श्राद्धास बसत नाहीं असें ज्या वेळेस ब्राह्मणांनीं म्हटलें, त्या वेळेस या साधूंनीं त्या हट्टी ब्राह्मणांच्या मृत वाडवडिलांस स्वर्गांतून पृथ्वीवर आणलें व तुमचा पोकळ जात्यभिमान अगदीं निरुपयोगी आहे अशी त्यांच्या धर्मलंड पुत्रांची खात्री करून त्यांस लाजविलें. नामदेवाच्या चरित्रांत त्याच्या पंढरपूरच्या देवानें ब्राह्मणांस भोजनास बोलावण्यास नामदेवास सांगितलें व स्वतः त्या साधूबरोबर त्यानें भोजन केलें. तेव्हां त्यास लोकांनीं वाळींत टाकिलें. त्या वेळेस ज्ञानदेव साक्षात् हजर नसून त्यानें त्या दुष्ट ब्राह्मणांस खालील उपदेश केला.

तो म्हणाला, “ देवाला कोणी उच्च व नीच असा नाही. त्याला सर्व सारखेच आहेत. मी उच्च कुळांतील, माझा शेजारीं नीच कुळांतील, असा विचार कधींही मनांत आणूं नका. नीच व उच्च हे दोघेही गंगेंत स्नान करतात म्हणून गंगानदी कधीं अपवित्र होत नाहीं; किंवा श्वासोच्छ्वास करतात म्हणून हवा बिघडत नाहीं; किंवा दोघेही पृथ्वीवर हिंडतात म्हणून पृथ्वी कांही स्पर्श करण्यास अयोग्य होत नाहीं. ”

तथापि आतिशय हृदयद्रावक उदाहरण म्हटलें म्हणजे पंढरपूर येथील देवळांत शिरल्याबद्दल चोखामेळा महार याचा झालेला छळ होय. असें अविचाराचें कृत्य कां केलेंस म्हणून त्यास लोकांनीं विचारलें असतां तो म्हणाला कीं, "मला देवानेंच देवळांत ढकलीत आणलें. मी आपण होऊन कांहीं आलों नाहीं." नंतर तो देवळांतील पुजाऱ्यांस उद्देशून बोलला, "भक्ति किंवा विश्वास जर नाहीं तर उच्च जातींमध्यें जन्म होऊन काय उपयोग ? किंवा धर्मविधि आणि विद्वत्ता यांचा काय उपयोग ? मनुष्य नीच जातींतील असेना, त्याचें अंतःकरण जर खरें आहे, ईश्वरावर प्रीति आहे, सर्व प्राण्यांस आत्मवत् मानितो, आपल्या व दुसऱ्याच्या मुलांमध्यें भेद करीत नाहीं आणि खरें बोलतो, तरच त्याची जाति पवित्र होय. ईश्वर त्यावर नेहमीं संतुष्ट असतो. मनुष्याचा ईश्वराचे ठायीं जर विश्वास आहे व मनुष्यमात्राविषयीं जर प्रीति आहे, तर त्याच्या जातीविषयीं विचार करूं नका. आपल्या ठायीं प्रीति व भक्ति असावी अशी देवाची इच्छा आहे व म्हणून तो त्यांच्या जातीविषयीं काळजी करीत नाहीं." या उदात्त ज्ञानोपदेशानें त्या हटवादी ब्राह्मणांवर कांहींच परिणाम झाला नाहीं. उलट त्यांनीं तेथील मुसलमान-कामगारांकडे फिर्याद दिली व त्यानें बायबलांतील "पायलेट" प्रमाणें चोखामेळयास त्याच्या मुसक्या आंवळून बैलांकडून ओढीत न्यावें व अशा रीतीनें त्याचे हालहाल करून मारून टाकावें अशी शिक्षा दिली. पण देवानें मोठ्या चमत्कारिक रीतीनें त्यास संकटांतून सोडविलें व जुलमी लोकांची निराशा केली. कारण ते बैल जाग्यावरून अगदीं हालेनात. ह्याचसंबंधानें बहिरामभटाची गोष्ट सुद्धां मजेशीर आहे. शास्त्री असून ब्राह्मणधर्मांत त्यास शांति मिळेना, म्हणून त्यानें मुसलमानी धर्म स्वीकारला, कीं एकेश्वरी मतानें तरी आपल्या अंतःकरणाचें समाधान होईल. पण इच्छिलेली शांति मिळत नाहीं म्हणून पुन्हा ब्राह्मणधर्मांत आला. तेव्हां ब्राह्मण व मुसलमान दोघेही या धर्मपालटाबद्दल त्यास दोष देऊं लागले, परंतु आपण हिंदूही नाहीं अथवा मुसलमानही नाहीं असें तो म्हणूं लागला. बहिरामभटानें ब्राह्मणांस असा सवाल केला कीं, मी मुसलमान झालों आहें. मला ब्राह्मण म्हणावयाचें असेल तर खुशाल म्हणा; व मुसलमानांस म्हणाला, माझ्या कानांत भोकें आहेत तीं बुजवा. ( म्हणजे आपण हिंदु आहोंत, मुसलमान नव्हे असें तो म्हणाला. )

हिंदुधर्म स्वीकारलेले महंमदी लोक, शेखमहंमद याचे अनुयायी या नांवानें प्रसिद्ध असलेले, रमजानउपोषणव्रतें व एकादशीउपोषणव्रतें अद्यापपावेतों पाळीत आहेत व मक्केस तसेंच पंढरपुरास यात्रेकरितां जात आहेत. कबीर, नानक व माणिकप्रभु यांच्यासारखे महाप्रसिद्ध साधु लोक आहेत, त्यांस हिंदु लोक आपले व मुसलमान लोक आपले असें मानतात व दोघेही त्या साधूंना भजतात. या साधूंच्या चरित्रावरून मनुष्याच्या पारमार्थिक स्वभावाची कल्पना फार उदात्त झाली आहे. तसेंच जातिभेदाची गांठही फार सैल झालेली आहे, हें स्पष्टपणें दाखविण्यास वरील उदाहरणें बस्स आहेत.

या उदात्त शिक्षणाचा परिणाम पाहूं गेलें तर असा दिसून येतो कीं, त्यायोगानें धर्मसंबंधीं बाबतींत ज्ञातिमहत्त्वास मुळींच थारा मिळाला नाहीं. फक्त सामाजिक गोष्टींत मात्र तिचें महत्त्व राहिलें आहे व तेंही फारच कमी आहे. दक्षिण हिंदुस्थानांतील ब्राह्मण, त्यांचे जातीसंबंधानें चमत्कारिक गैरसमज— ब्राह्मण जाणाऱ्या मार्गावरून चांडाळ गेला तर, त्याची सावली पडली तरी देखील तो रस्ता अपवित्र होतो म्हणून त्याच्या सावलीचा देखील कंटाळा करणें—याची व दक्षिणमहाराष्ट्रांतील लोकांचा या सर्व गोष्टींत दिसून येत असलेला उदासीनपणा याची तुलना करून पाहिली तर हें सहज दिसून येतें. हें औदासीन्य, प्रतिवार्षिक वारकऱ्यांच्या मेळ्यांत आणि शेवटल्या दिवशीं होणाऱ्या गोपाळकाल्याचे वेळीं जो सर्वांस एकसारखा आनंद होतो त्यांत विशेष दिसून येतें. पुजारी म्हणजे ईश्वर व मनुष्य त्यांच्यामधील मोक्षप्राप्ति करून देणारें अवश्य साधन आहे, ब्राह्मणजातीचें वरिष्ठत्व ईश्वरनिर्मितच आहे, त्यांची बाकीच्या जातींनीं सेवा व पूजा केली पाहिजे, इत्यादि विचार युरोपांतल्याप्रमाणेंच हिंदुस्थानाच्या या भागांत सुद्धां बाजूस पडले आणि सर्व दर्जाच्या स्त्री—पुरुषांस असें वाटूं लागलें कीं, हीन कुलांत जन्म झाला तरी ईश्वरावर दृढभक्ति व प्रीति असली म्हणजे मोक्ष मिळण्यास कांहींही अडचण नाहीं.

दुसरें, युरोपांतील सुधारकांस, मठस्थापना न आवडून पाद्री लोकांनीं अविवाहित राहणें, सृष्टिनियमांविरुद्ध स्त्रियांनीं संसारापासून अलिप्त राहून संन्यास-वेष घेऊन विरक्त होणें, हें पसंत नव्हतें. त्याचप्रमाणें आमच्या इकडेही सर्व साधुसंतांनाही उपवास करून देह कष्टविणें, निरर्थक तप करणें व आजन्म यात्रा करीत राहणें पसंत नव्हतें. तसेंच योगसाधन केल्यापासून योगी लोकांस

अद्भुत चमत्कार करण्याची शक्ति येते असें समजून ती शक्ति येण्याकरितां अति कडक नियम व व्रत करून शरीर झिजविणें हें सुद्धां त्यांना रुचेना.

× × ×

एकनाथ तर सर्व जन्मभर आपल्या कुटुंबांतच राहिला. त्याचप्रमाणें तुकाराम व नामदेव यांनींही केलें. त्यांच्या कमनशिबानें त्यांना त्यांच्या स्वभावास स्वभाव मिळणाऱ्या बायका मिळाल्या नाहींत ही गोष्ट निराळी. तसेंच बोधलेबुवा, चोखामेळा, दामाजीपंत, भानुदास, दोन्ही साधु कुंभार, आणखी पुष्कळ इतर साधु लोक आपल्या कुटुंबांतच रहात होते. ज्ञानदेवाच्या बापानें आपल्या पत्नीच्या संमतीशिवाय संन्यास घेतला, म्हणून त्याचा गुरु रामानंद यानें त्यांस घरीं जाऊन पत्नीशीं आयुष्य घालविण्याची आज्ञा केली, व त्यानें तसें केलेंही. या सर्व गोष्टींवरून त्या वेळच्या साधुसंतांस गृहस्थाश्रमाची पवित्रता फार उत्तम तऱ्हेनें अवगत होती असें सिद्ध होतें. संसारत्याग केला म्हणजे मग जगांत काळजी किंवा दुःख कांहीं नाहीं असा जो सर्व लोकांचा गैरसमज होऊन गेला होता, त्यास चांगलें वळण लावण्यास या संतमंडळींनीं आपल्या हातून होतील तितके प्रयत्न केले. (साध्वी स्त्रियांचीं) संतिणींचीं चरित्रें तर याहूनही मनोरंजक आहेत. देवाच्या ठिकाणीं त्यांची निष्ठा व दृढविश्वास असल्यामुळें देव त्यांना त्यांच्या दैनिक गृहकृत्यांतही हातभार लावी व त्यांच्या शंकेखोर भ्रतारास त्या बाहेर गेल्या तर कांहीं अंदेशा येईल म्हणून निरनिराळे वेष घेऊन देव त्यांच्याकडून त्यांच्या घरींच इच्छेप्रमाणें सेवा करून घेई. अशा पुष्कळ गोष्टी या स्त्रियांच्या चरित्रांत सांगितल्या आहेत. आतां या गोष्टींत सांगितल्याप्रमाणें देवाचें येणें जाणें इतकें सवंगसुकाळ होणें चांगलें नाहीं हें खरें; पण त्या गोष्टींच्या मुळाशीं जें उच्च नीतितत्त्व आहे, त्यानें वरील दोषांचें चांगलेंच परिमार्जन होतें. विवाहित गृहस्थाश्रमाचें पावित्र्य, या साधुसंतांनीं लोकांच्या नजरेस उत्तम तऱ्हेनें आणून दिलें. पुरातन काळापासून चालत आलेल्या वैराग्यावर नीतितत्त्वांचा झालेला हा विजय कांहीं साधारण नव्हे.

प्राचीन काळीं युरोपांत सर्व पुस्तकें लाटिन भाषेंत लिहीत असत, म्हणून त्या भाषेस वर्चस्व प्राप्त होऊन लोकांना बरेंच त्रासदायक झालें होतें. तसेंच प्राचीन पांडित्याच्या गुलामगिरीसही लोक कंटाळून गेले होते.

युरोपांतील सुधारकांनीं या त्रासदायक वर्चस्वापासून व दास्यापासून राष्ट्रीय बुद्धीची सुटका केली. हा या सुधारकांनीं मिळविलेला शाश्वत जय सर्व युरोपचा इतिहास वाचणाऱ्यांस माहीत आहेच. या सुधारकांच्या साहाय्यानें उच्चनीच लोकांस बायबल अगदीं सुगम झालें; तसें आजपर्यंत विद्यादानाचा अधिकार जो एकट्या धर्माधिकाऱ्याकडेच होता, त्या अधिकारास अजी धक्का बसला. त्याप्रमाणेंच हिंदुस्थानांतही स्थिति झाली. साधुसंतांनीं जेव्हां आपल्या प्राकृत भाषेंत, लेखनद्वारें व कीर्तनद्वारें लोकांस उपदेश करण्यास सुरुवात केली व सरसकट पुरुष व स्त्रिया, ब्राह्मण व शूद्र सर्व लोकांच्यापुढें आजपर्यंत गुप्त असलेलें ज्ञानभांडार जेव्हां धिटाईनें उघडें करून दाखविलें, तेव्हां प्राचीन संस्कृतभाषेंत निष्णात असलेल्या पंडितांना परमावधीचें आश्चर्य वाटलें. परंतु पूर्ण जय मिळविण्यास या साधुसंतांना बराच त्रास व पुष्कळ दुःखें भोगावीं लागलीं. मज्जाव केलेल्या या प्रांतांतून हिंडण्याचें प्रथम साहस ज्ञानदेवानें केलें व लवकरच एकनाथ, रामदास, नामदेव, तुकाराम, वामन पंडित, मुक्तेश्वर, श्रीधर, मोरोपंत इत्यादिकांनीं त्यांचें अनुकरण केलें. शेवटले चार गृहस्थ धर्मगुरूपेक्षां ग्रंथकर्ते व कवि या नात्यानेंच प्रसिद्ध आहेत, तरी पण त्यांच्या कवितास्फूर्तीचें मूल एकच.

× × ×

युरोपामध्यें प्रॉटेस्टंट सुधारकांनीं दुसरा एक अति महत्त्वाचा फेरफार अमलांत आणिला. रोमनक्याथोलिक धर्मसंस्थांमध्यें मूर्तिपूजा व संतपूजा यांचा जो बडेजाव माजून राहिला होता, त्याविरुद्ध मोठा गवगवा केला. आमच्या इकडेही तसाच गवगवा झाला होता; परंतु प्रॉटेस्टंट सुधारकांमध्यें विशेषेंकरून त्यांच्यापैकीं अति आग्रही लोकांमध्यें, मूर्तिभंजक पंथ जसा निघाला तसा इकडे निघाला नाहीं. महाराष्ट्रांतील साधुसंतांस व्यावहारिक व तात्विक दृष्ट्यासुद्धां अनेक देवांची पूजा आवडत नसे. प्रत्येकजण ईश्वरी अवताराच्या एका विवक्षित रूपास भजत असे. आणि त्यामुळें बाकीच्या देवांविषयीं त्याची भक्ति नसे. उदाहरणार्थ, रामदास, राम या नांवानें ईश्वरास भजे. एकनाथ व जयरामस्वामी, कृष्ण म्हणून त्याची पूजा करीत. तुकाराम, चोखामेळा, नामदेव हे विठोबा म्हणून, नरहरी सोनार आणि नागनाथ शिव म्हणून, जनार्दनस्वामी व नरसिंहसरस्वती दत्तात्रय म्हणून, मोरया गोसावी व गणेश नागनाथ गणपति

म्हणून, ईश्वराची आराधना करीत. त्याचप्रमाणें इतरत्र साधु लोकांची गोष्ट आहे. हे साधुसंत जेव्हां दुसऱ्या देवालयांत जात, तेव्हां ते ज्या मूर्तीची पूजा करीत नसत, ती मूर्ति ते पहात नसत, म्हणून ती मूर्ति त्यांचें आवडतें रूप धारण करून त्यांस दर्शन देई. अशा अनेक चमत्कारिक गोष्टी या साधुसंतांच्या चरित्रांत लिहिल्या आहेत. या साधुसंतांपैकीं प्रत्येकजण, सत्ताधीश ईश्वर एक आहे, दुसरा कोणीही नाहीं असें मानीत असे व कोणासही ह्या सिद्धान्ताविषयीं शंका घेऊं देत नसत व वादविवादही करूं देत नसत. पण वर सांगितल्याप्रमाणें या देशांत मूर्तिभंग कधींही झाला नाहीं; तर आपण पूजीत असलेली ईश्वराचीं नानाविध रूपें हीं जाऊन शेवटीं एकच देवाधिदेव किंवा ब्रह्म आहे, असें ते मानीत. सर्व लोकांच्या मनाची अशी प्रवृत्ति फार जुनाट आहे. वेदकालामध्येंसुद्धां जरी इंद्र, वरुण, मरुत् आणि रुद्र यांच्याकरितां केलेल्या यज्ञयागांमध्यें ते त्यांची वेगवेगळी आराधना करीत, तरी ते सर्व एका श्रेष्ठ सृष्टिकर्त्याचीं निरनिराळीं रूपें आहेत असें मानीत असत. याच प्रवृत्तीवरून साधुसंतांस मूर्तिपूजेचें विशेष महत्त्व कां वाटत नसे तें सहज समजण्यासारखें आहे. हे साधुसंत लोक (मूर्तिपूजक, या शब्दाचा एक अर्थ आक्षेप घेण्याजोगा आहे व त्या अर्थानें ते) मूर्तिपूजक होते असें म्हणणें म्हणजे त्यांचे विचार व कल्पना यांचा पूर्ण विपर्यास करण्यासारखेंच होय. वैदिक कालांत तर मूर्ति किंवा पुतळा यांची कधींही पूजा करीत नसत. अवताराची कल्पना जेव्हां निघाली, तेव्हांच ही चाल प्रचारांत आली आणि जैन व बौद्ध हे आपल्या साधुसंतांची पूजा करीत, त्यायोगें या चालीस विशेष जोर आला. शेवटीं शेवटीं येथील मूळचे रानटी लोक आर्यसमाजांत मिसळून त्यांची दगडधोंड्यांची पूजासुद्धां इकडे सुरू झाली; व या रानटी लोकांच्या देवांची गणना आर्य देवांच्या अवतारांत होऊं लागली. साधुसंत मात्र अशा अडाणी क्षुद्र कल्पनेस कधींही थारा देत नसत. मूर्तींचे ठिकाणीं ईश्वरी गुण दिसेनात, तेव्हां ते मूर्तिपूजेचा निषेध करूं लागले. तुकाराम, रामदासांनीं तर या अडाणी मूळच्या लोकांच्या देवांची व त्यांच्या भयंकर पूजाहोमांची अगदीं निर्भर्त्सना केली.

× × ×

तथापि आमच्या देशांतील सुधारणेच्छु साधुसंत व युरोपांतील तत्कालीन प्रॉटेस्टंट सुधारक यांच्यामध्यें एका गोष्टींत भेद दिसून येतो. वेदकालापासून

अलीकडे पाहिलें तर आर्य लोकांचे देव म्हणजे त्यांच्या अंगीं प्रीति, तेज, माधुर्य, प्रकाश इत्यादि गुण कल्पित असत. वरुणरुद्रांसारखे दरारा उत्पन्न करणारे व मन गांगरून सोडणारेही देव होते, नव्हते असें नाहीं. परंतु साधारणपणें ईश्वराच्या अंगच्या उत्तम गुणांचें ध्यान व चिंतन करण्याकडेच लोकांची प्रवृत्ति असे. सेमिटिक (Semitic) लोकांची कल्पना मात्र निराळी. ईश्वर अतिशय दूर आहे. त्याचें रूप फार उग्र आहे. त्याचें वैभव पाहणें झाल्यास तें एकाएकी दिसावयाचें नाहीं. दिसलें तरी अंधुक दिसावयाचें. मनुष्यांनीं पाप केल्यास त्यास कडक शिक्षा करणारा, शाबासकीपेक्षां शिक्षा देण्याकडेच त्याचा जास्त कल. एखादे वेळेस शाबासकी दिलीच तर भक्तास नेहमीं घाबरून सोडून थरथर कांपावयास लावणारा– अशी कल्पना सर्व सेमिटिक धर्मांच्या मूळांत होतीच. परंतु खिस्ती धर्मानें ही कल्पना बाजूस सारण्याचा प्रयत्न करून या मोठ्या खाडीस पूल बांधण्याचें थोडें तरी श्रेय घेतलें. त्या धर्माप्रमाणें ईश्वरानें मनुष्याच्या मांसमय देहांत प्रवेश करून जीझस खाइस्टचें रूप घेतलें आणि सर्व मानवी जातीच्या हिताकरितां आपण हाल सोसून त्यांच्या पापाचें प्रायश्चित्त आपणच घेतलें. ग्रीस, रोम किंवा हिंदुस्थानांतील आर्यधर्मास असला प्रकार करणें कधींच अवश्य वाटलें नाहीं. आमचा देव म्हणजे आम्ही त्यास मायबाप, बंधुराय, जिवाचा सखा असें मानीत आहोंत. न्यायाधीश, शास्ता किंवा सत्ताधीश असें केव्हांही मानीत नाहीं. तो न्याय करीत नाहीं, किंवा त्याची सत्ता नाहीं म्हणून नव्हे, तर न्याय देतांना, अधिकार गाजवितांना, शिक्षा देतांना त्याच्या ठिकाणीं आईबापांचें प्रेम असतें. मुलानें अपराध करून त्यास पश्चात्ताप झाला तर आईबाप जसे त्यास पोटाशीं धरण्यास नेहमीं तत्पर असतात, तसा ईश्वर आहे म्हणून, साधुसंतांच्या उपदेशांत व चरित्रांत दयाळू परमेश्वराचें हें स्वरूप जसें ठळक रीतीनें रेखिलें आहे, तितकें एककल्ली धर्मनिष्ठ ब्राह्मणांच्या कल्पनेवरून दिसत नाहीं. आपणांस ईश्वर दिसतो, त्याचें बोलणें आम्हीं ऐकिलें. त्याच्याशीं आपण बोललों, त्याची आपली नेहमीं भेट होते, असें हे साधुसंत खात्रीपूर्वक सांगतात. ईश्वर कोणाशीं बोलला नाहीं असें ते केव्हां केव्हां त्याचें वर्णन करितात हें खरें; परंतु साधारणपणें पाहिलें तर आम्हांस जसें दृश्य वस्तूंच्या अस्तित्वाचें ज्ञान झालें म्हणजे आनंद होतो तसें ईश्वराच्या भेटीपासून त्यांना आनंद होई असें दिसे.

योगी व वेदान्ती लोक, समाधि लावली म्हणजे ईश्वराशीं आपलें तादात्म्य होतें असें म्हणतात; परंतु नामदेव, तुकाराम, एकनाथ, ज्ञानदेव यांना ही ईश्वराची महत्प्रयासानें झालेली क्षणिक भेट पसंत न पडून ईश्वर आपणांजवळ सदासर्वदा असावा असें त्यांना वाटे. अशा दररोजच्या भेटींत त्यांना जो आनंद होई, तो आनंद योग्याच्या व वेदान्त्याच्या ब्रह्मानंदापेक्षां जास्त आहे असें ते म्हणत. या संतांनीं जे चमत्कार केले त्यावर आमचा विश्वास असो वा नसो; पण वरील बाबतींत त्यांनीं केलेल्या विधानांवर मात्र आम्हीं विश्वास ठेविला पाहिजे. खिस्त धर्माच्या देशांत जीझस खाइस्टच्या जन्म–मृत्यूबद्दल जितका प्रेमभाव व आनंद वाटत आहे, तितकाच किंबहुना जास्त आनंद व प्रेमभाव अंतःकरणांत साक्षात् ईश्वराचें दररोज दर्शन झाल्यापासून होत आहे. आमच्या संतमंडळींचें वैभव काय तें हेंच, व सर्व उच्चनीच लोक, स्त्रिया व पुरुष, आजन्म शांति देणारी ही अमूल्य वस्तु आपल्याजवळ सांठवीत आहेत.

ईश्वराशीं मनुष्याच्या संबंधाच्या या कल्पनेचा असा परिणाम झाला कीं, ईश्वर व ईश्वराविषयीं ज्ञान संपादन करण्यास भक्तीसारखें दुसरें साधन नाहीं असें सिद्ध होऊन, वैष्णव पंथांतील लोकांची, भक्ति हीच धर्माची मुख्य बाब होऊन बसली. महिपतीनें लिहिलेलीं सर्व चरित्रें पाहिलीं तर बाह्यपूजा व त्यांतील सर्व विधि, उपचार, यात्रा, तीर्थस्नान, नम्रपणा धरणें, उपास करणें, विद्यार्जन, चिंतन, या सर्व साधनांपेक्षां भक्ति व भाव या साधनांचें महत्त्व जास्त आहे असें सांगितलें नाहीं, असें एकही चरित्र सांपडावयाचें नाहीं. वरील साधनांचा संबंध शरीर किंवा मन यांशींच फक्त असतो; पण आत्म्यानें आपली सेवा करावी अशी ईश्वराची इच्छा असते. भोजन करणें, पाणी पिणें, झोंप घेणें इत्यादि गोष्टी जशा आम्ही त्यांविषयीं श्रम न घेतां व काळजी न बाळगतां करतों, तसेंच हे सर्व विधि, उपचार इत्यादि बाह्य प्रकार आपणांस सहज करितां येतात. त्यांचा आत्म्याशीं कांहीं संबंध नाहीं. आपल्या सर्वांगास आंत-बाहेर व्यापून टाकणाऱ्या ईश्वराच्या अस्तित्वरूपी समुद्रांत जेव्हां आपलीं सर्व इंद्रियें स्नान करितात, तेंच श्रेष्ठ तीर्थस्नान. ईश्वराच्या इच्छेचे आम्ही बंदे चाकर; आम्ही सर्वस्वीं ईश्वराचे स्वाधीन; आमचें स्वतःचें कांहीं नाहीं; असा जो आमचा स्वार्थत्याग, हाच आमचा यज्ञयाग व हीच आमची दान-देणगी. ईश्वरापुढें आत्मा नम्र करणें हाच नम्रपणा व त्याच्या वैभवाचें होईल

तितकें कीर्तन करणें हेंच त्याचें चिंतन. ज्ञानार्जन, योगशक्ति, शारीरिक संपत्ति, धनदौलत, मुलेंबाळें, जमीनजुमला, यांची ( जन्म मरणापासून मुक्तीचीसुद्धां ) इतकी मातब्बरी नाहीं. ईश्वरावर व मनुष्यप्राण्यादिकरून सव सृष्टवस्तूंवर दृढ प्रेम असणें हेंच इष्ट आहे. नामदेव एकदां एका झाडाची साल काढीत असतां कुऱ्हाडीचा घाव जेथें झाला होता त्या जाग्यांतून रक्त आलें असें त्यास वाटून तो मोठ्यानें ओरडला आणि घाव मारला तेव्हां झाडास कसें वाटलें असावें तें समजावें, म्हणून, त्यानें आपल्याच अंगावर कुऱ्हाड मारून घेतली. शेख-महंमदास त्याच्या बापान खाटिकाचा धंदा सुरू करण्यास पाठविलें, तेव्हां जनावरांस मारतांना किती वेदना होतात हें समजावें म्हणून त्यानें सुरीनें आपलें बोट कापलें. तेव्हां त्यास तें दुःख कळून त्यानें खाटिकाचा धदा सोडून दिला, व पोटाची खळगी भरण्याकरितां ज्या जगांत दुसऱ्यास इतकें दुःख द्यावें लागतें, त्या जगापासून अलिप्त राहिला. तुकारामास शेतांत पांखरें राखण्यास पाठविलें, तेव्हां त्यास पाहून पांखरें उडून गेलीं. तुकारामास वाटलें कीं, आपणांस पाहून पांखरें ज्या अर्थी उडून गेलीं, त्या अर्थी आपल्याच अंगांत कांहीं दोष असावा. या संतांच्या वेळेस जे लोक नव्हते त्यांना हा मनाचा थोरपणा व सर्वांशीं स्वार्थत्याग खरासुद्धां वाटणार नाहीं. पण ही गोष्ट खरी आहे याबद्दल कांहींच शंका नाहीं व या नमुन्यावरूनच पारमार्थिक श्रेष्ठत्वाची राष्ट्रीय उदात्त कल्पना बनून गेली होती याबद्दलही शंका नाहीं. आमच्या सध्यांच्या कालांत, इतका नम्रपणा, इतका स्वार्थत्याग उपयोगी नाहीं, इतकी कंबर ढिली होणें, इतकें सोशीक होणें इष्ट नाहीं—हें कदाचित् खरें असूं शकेल; पण साधुसंतांस होऊन आज दोनशें वर्षांवर अधिक वर्षें होऊन गेलीं, तेव्हां त्यांची हकीकत लिहितांना आमच्या गरजांचें व आमच्या इच्छित वस्तूंचें घोडें पुढें ढकलणें प्रशस्त नाहीं.

आमच्या साधुसंतांचे आचारविचार व संभाषण यांची दिशा काय असे व मुसलमानी धर्मासारख्या युद्धप्रवृत्त धर्माशीं गांठ पडून आलेल्या संकटांशीं त्यांनीं कशी टक्कर दिली व अखेरीस कसे विजयी झाले हें मोठें चित्तवेधक आहे. नामदेव, एकनाथ, रामदास इत्यादिकांच्या चरित्रांत तर अशा गोष्टींची रेलचेल आहे. विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, पुष्कळ मुसलमान लोकांनीं हिंदुधर्म स्वीकारिला व त्यायोगें ते इतके प्रसिद्धीस आले कीं, त्या

वेळच्या ग्रंथकर्त्यांनीं हिंदुसंतांच्याप्रमाणें या महंमदीय संतांचेंसुद्धां साहाय्य घेतलें आहे. महंमदीय संतमंडळींचा सन्मान करून त्या वेळच्या आमच्या हिंदु लोकांनीं जो मनाचा थोरपणा दर्शविला, त्याचीं उदाहरणें शेखमहंमद व कबीर हीं होत. त्याचप्रमाणें तुकाराम व एकनाथ यांच्यावर मुसलमानांशीं संघट्टनाचा इतका परिणाम झाला, कीं या संतांनीं उर्दू भाषेंत कविता केल्या. त्या कवितेतील थोर तत्त्वें अगदीं कट्टया मुसलमानांनासुद्धां अग्राह्य नाहींत. रामदासाचा शिष्य उद्धव, बेदर मुक्कामीं संकटांत सांपडला, तेव्हां समर्थांनींही तसेंच केलें. बेदरच्या बादशहाचा नोकर दामाजीपंत याची सर्वांस माहिती आहेच. दुष्काळ पडला तेव्हां सरकारचें धान्य त्यानें गरीब लोकांस वांटून टाकिलें. या अपराधाबद्दल त्यास शिक्षा करण्याची वेळ आली, तेव्हां त्या धान्याची एकंदर किंमत राजाच्या खजिन्यांत चमत्कारिक रीतीनें जमा होऊन बिचाऱ्या दामाजीची सुटका झाली. परधर्मी राजांशीं चाललेल्या झगड्यांत साधुसंतांसच अखेर जय मिळाला व त्यांची सरशी, युद्धानें किंवा विरोधानें नव्हे, तर ईश्वरावर सर्वस्वीं हवाला ठेविल्यानें झाली. मुसलमानांचा अल्ला काय व हिंदु लोकांचा राम काय; दोन्ही एकच. कोणी दुसऱ्या देवाचा द्वेष करूं नये, अशा तऱ्हेनें समेट होण्याकडे प्रवृत्ति होऊं लागून, शिवाजी रंगभूमीवर आला, तेव्हां तर हे समेट बहुतेक पूर्ण झालेच होते. तरी पण मुसलमानी धर्मवेड अगदींच शांत नसून त्यास मधून मधून उकळी फुटत असे.

याप्रमाणें धर्मसंबंधीं चळवळीच्या मुख्य भागाचें विवेचन आम्हीं केलें आहे. ही चळवळ पंधराव्या शतकांत ज्ञानदेवाचा जन्म झाल्यापासून तों गेल्या शतकाच्या अखेरपर्यंत सारखी चालू राहून पारमार्थिक सद्गुणांची हळू हळू वाढ झाली. या देशाच्या प्राकृत भाषेंत एक बहुमोल वाङ्मय या चळवळीमुळेंच आम्हांस उपलब्ध झालें. ज्ञातिजन्य श्रेष्ठत्वाच्या वेडगळ कल्पनेचा जोरही या चळवळीनेंच कमी झाला. शूद्रवर्गाला पारमार्थिक शिक्षण देऊन, त्यांचें समाजामध्यें महत्त्व वाढवून ब्राह्मणांच्या तोडीस या चळवळीनेंच आणून बसविलें. कुटुंबसंबंधानें पावित्र्य प्राप्त होऊन स्त्रियांची योग्यता वाढली. राष्ट्राची बंधुप्रीति वाढवून, परस्परांनीं सहनशील होऊन जूट कायम राखण्यास लोकांना शिकविलें. या चळवळीनेंच मुसलमानांशीं समेट करण्याच्या कल्पनेचा उपक्रम करून कांहीं अंशीं ती कल्पना अमलांतही आणली. बिधि

व उपचार, ज्ञानार्जन व चिंतन, यात्रा, उपोषणें यापेक्षां ईश्वरावर दृढ प्रेम व विश्वास ठेवून त्याचें भजन करण्याचें महत्त्व जास्त असें सिद्ध केलें. अनेक देवमतापासून होणाऱ्या अत्याचाराचा ओघ कमी केला. या सर्व तऱ्हांनीं राष्ट्रास आचारशक्ति व विचारशक्ति यांमध्यें श्रेष्ठत्व आणून देण्यास या चळवळीचाच उपयोग झाला, व परधर्मी सत्तेच्या ठिकाणीं एकजुटीची एतद्देशीय सत्ता पुनः प्रस्थापित करण्याच्या महत् कृत्यांत पुढारीपणा घेण्यास महाराष्ट्र देशाची तयारी करून दिली. तशी तयारी हिंदुस्थानांतील दुसऱ्या कोणत्याही देशाची झाली नाहीं. महाराष्ट्र धर्माचीं मुख्य तत्त्वें आम्हांस हींच दिसतात.

* * *

गो. ग. आगरकर ( १८५६-१८९५ )

# ५. सामाजिक सुधारणा आणि कायदा

सुधारणेचा शब्दांतःपुराच्या बाहेर संचार होऊं नये म्हणून डोळ्यांत तेल घालून खडा पहारा करणाऱ्या नानाविध धर्मकल्पनांशीं तुमुल संग्राम करण्यास ज्यास स्फुरण यावें, त्याच्या भोंवतालीं उभारलेल्या प्रचंड लोकमततटास ढांसळून पाडण्यास ज्ञानतोफांस ज्यांनीं सरबत्ती द्यावी, व त्यास गराडा घालणाऱ्या रूढिखंदकावर क्रियासेतु बांधण्यास ज्यांनीं प्रवृत्त व्हावें अशा विचारसंपन्न लोकांनीं दुराग्रहाच्या भरी भरून व शुष्क बाबतींत दुही माजवून आपल्या मुख्य कर्तव्याची हेळसांड होऊं द्यावी ही मोठ्या दुर्दैवाची गोष्ट होय.

'नवखंड पृथ्वी व दहावें खंड काशी' यापुढें ज्यांच्या भूगोलविषयक कल्पनांची धांव जात नाहीं, वेदाचा अर्थ कालत्रयीं होणें नाहीं अशी दृढ समजूत असूनही त्यांतच मनुष्यास आवश्यक अशा सर्व ज्ञानाचा गड्डा आहे असा ज्यांचा पक्का ग्रह झाला आहे व प्राचीन ऋषिप्रणीत आचारांहून सुखकर असे आचार असूं शकतील अशा नुसत्या कल्पनेचाही विटाळ न होऊं देण्याविषयीं जे अत्यंत दक्ष आहेत; तात्पर्य 'पुराणमित्येव हि साधु सर्वम्' या महामंत्राच्या प्रभावापुढें पदोपदीं येणाऱ्या असंख्य नडी ज्यांस साह्य झाल्या आहेत अशा लोकांनीं नुसतें कायद्याचें नांव ऐकलें नाहीं तोंच वेडावून जाऊन माधवबागेंतील सत्तेचाळीसतरांवर ताण करून सोडावी हें अगदीं साहजिक आहे. परंतु ही सीमा ओलांडून पुढें गेलेल्या ज्ञानविशिष्ट म्हणविणाऱ्या लोकांनीं कायद्याच्याविरुद्ध इतकें काहूर कां माजवावें याचा मात्र आम्हांस उमज पडत नाहीं. सामाजिक सुधारणा आणि कायदा यांच्यामध्यें अपरिहार्य एकनाड असल्यामुळें त्यांचें जुग कधींही जमावयाचें नाहीं असें जें कित्येक सामुद्रिकांनीं गणित केलें आहे त्यांत आमच्या मतें कांहीं चूक झाली आहे, व ती दाखविण्याचा प्रयत्न केला असतां तिकडे शांतपणानें नजर फेंकण्याची जर ते तस्दी घेतील तर हा वाद मिटून उभय पक्षांत समेट होणें केवळ दुरापास्त आहे असें आम्हांस वाटत नाहीं. सामाजिक सुधारणेंत कायद्याची मदत घेणें अनर्थावह आहे असें प्रतिपादणाऱ्या मंडळींच्या आज-

पर्यंतच्या वाटाघाटींत आम्हांस जितका दुराग्रहाचा भाग दिसून येतो तितका योग्यायोग्य विचार दिसून येत नाहीं असें म्हटल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. सकृत्दर्शनीं ज्यांत कांहीं अर्थ आहे असें भासतें असें काय तें एकच कारण पुढें आलें आहे. बाकी सर्व शब्दजाल, हट्टवाद व पुराणप्रियतेच्या संस्काराची अवशिष्ट झांक यांचेंच अकांडतांडव आहे व तें कारण हेंच कीं, आमचें सरकार परकें, त्यांचा धर्म वेगळा, त्यांचे रीतिरिवाज भिन्न, तेव्हां अशा सरकारास आपल्या समाजव्यवस्थेंत हात घालूं देणें अत्यंत भयावह आहे; याचे परिणाम फारच अनिष्टकारक झाल्यावांचून राहणार नाहींत; व याबद्दल मागाहून पस्ताव्यांत मात्र पडावें लागेल. आतां हा कोटिक्रम करणाऱ्यांस आमचा इतकाच प्रश्न आहे कीं, सामाजिक गोष्टींत आजपर्यंत सरकारनें जें औदासीन्य पत्करलें आहे त्याचें कारण तसें करण्यास आम्ही त्यांस परवानगी देत नाहीं इतकेंच आहे काय ? मुसलमान लोकांनीं एका हातांत तलवार व दुसऱ्या हातांत कुराण घेऊन आम्हांपैकीं कित्येकांस बाटाविलें त्या वेळीं तसें करण्याविषयीं आम्हीं त्यांस परवाना दिला होता काय ? किंवा आमच्या समाजव्यवस्थेंत ढवळाढवळ करण्यास सरकारनें मनांत आणलें तर तें आज असमर्थ आहे असें तरी मानतां येईल काय ? तात्पर्य, सरकार सामाजिक बाबतींत उदासीन असण्याचें कारण तसें करण्यास आम्ही त्यास संधि देत नाहीं इतकेंच काय तें. बाकी आम्हीं त्यास आमच्या घरगुती गोष्टींत हात घालण्यास केव्हां विनंति करूं म्हणून तें अगदीं चातकाप्रमाणें वाट पहात आहे व एकदां का त्यास आपणांकडून जराशी फूस मिळाली कीं, कायद्यामागून कायदे करून आमच्या सर्व सामाजिक व्यवस्थांचा भंडवडा करून आम्हांस ते त्राहि करून सोडतील, वगैरे विचारांत जर कांहीं तथ्य असेल तर मग ' आपण कोंबडी झाकली कीं उजाडावयाचें राहिलेंच ' असें मानणाऱ्या म्हातारीच्या समजुतींतही तथ्य नाहीं असें कोण म्हणेल ?

दुसरें, सती जाण्याची चाल जी सरकारनें बंद केली त्यापासून आमच्या धर्मांतही प्रसंगानुसार हात घालण्यास सरकार डगमगणारें नाहीं असें सिद्ध झालें नाहीं काय ? किंवा जो पुनर्विवाह हिंदुधर्मशास्त्र्यानें बेकायदेशीर ठरविला होता तोच कायदेशीर ठरविण्याविषयीं कित्येकांनीं आपण होऊन विनंति केल्यावरून तो कायदेशीर ठरविल्यास आज ३४ वर्षें झालीं असून त्या वेळीं मिळालेल्या फुशीचा त्यांनीं अद्यापपावेतों फायदा घेतला नाहीं हे कसें !...

तात्पर्य, सामाजिक गोष्टींत आधींच सरकारनें हात घातला आहे, असें असतां आणखी अमुक एक गोष्टींत असा कायदा करा अशी सरकारास विनंति केल्यानें त्यास आमच्या सामाजिक गोष्टींत आयतीच ढवळाढवळ करण्यास फूस सांपडेल अशा समजुतीवर कायद्याचा निषेध करीत बसणें म्हणजे वास्तविक पाहतां आम्हांस पुढें जावयाचें नाहीं हेंच जगास जाहीर करणें होय.

आतां आजमितीस जितक्या म्हणून सुधारणा आम्हांस इष्ट किंवा आवश्यक वाटतात त्या सर्व कायद्याच्या मदतीनें सुसाध्य आहेत असें आमचें म्हणणें नाहीं किंवा त्यांपैकीं कांहीं कायद्यानें सुसाध्य असल्या तथापि त्या सर्वांवर कायद्याची अंमलबजावणी करावी असेंही आम्ही इच्छित नाहीं. परंतु याचें कारण आमचें सरकार परकें आहे हें नव्हे; किंवा सामाजिक गोष्टींत सरकारनें हात घालणें गैरशिस्त आहे अशा सामान्य सिद्धान्ताचा आम्ही अंगीकार करतों असेंही नव्हे. व्यक्तीच्या ज्या आचरणापासून समाजाचें प्रत्यक्ष अपरिमित नुकसान होत नसेल, तें आचरण त्या व्यक्तीस घातक असलें, तरी त्यानें तें करूं नये अशी समाजानें सक्ति करण्याचा समाजास अधिकार नाहीं. व्यक्तिस्वातंत्र्य आणि समाजबंधन या दोहोंसही मर्यादा आहेत. त्या मर्यादांचा अतिक्रम होईल तर त्यापासून एकंदर समाजाचेंच नुकसान होणारें आहे. व्यभिचार हा एक पुण्यमार्ग आहे असें कोणत्याही धर्माचा मनुष्य प्रतिपादणार नाहीं. परंतु एवढ्यावरून व्यभिचार करणाऱ्यांस कायद्यानें शिक्षा ठरवावी किंवा नाहीं असा प्रश्न पुढें आला असतां सर्व विचारी लोक एकदम हो म्हणण्यास तयार होणार नाहींत. त्या व्यभिचारापासून समाजाचें प्रत्यक्ष नुकसान होत आहे कीं काय, या प्रश्नाचा प्रथम विचार केला पाहिजे. तसेंच दारू पिणें हें जरी वाईट आहे तथापि ती पिणाऱ्या व्यक्तीपासून समाजास त्रास पोहोंचल्यावांचून त्याच्यावर कायदा लागू करणें न्याय्य होणार नाहीं. तात्पर्य, एखादी गोष्ट आपणांस कितीही चांगली वाटली तथापि दुसऱ्यांनीं तिचा स्वीकार केलाच पाहिजे अशी सक्ती करण्याचा आपणांस अधिकार नाहीं. आपण पाहिजे तर त्याचें मन वळविण्याचा प्रयत्न करावा; परंतु यापुढें मात्र आपणांस जातां येणार नाहीं. वरील विचारावरून हेंही ध्यानांत येण्यासारखें आहे कीं, ज्याप्रमाणें एखाद्या व्यक्तीच्या आचारविचारापासून समाजाचें नुकसान नसतां तो आचारविचार बदलण्याची समाजास सक्ती करतां येत नाहीं. त्याच-

शाश्वतीस जपतो तो दर पिढीस थोड्या तरी उन्नतीस चढतो. व्यक्तींच्या सुखस्वातंत्र्याच्या सुधारणा आरंभून परम बुद्धिमान्, विचारी व शूर असे ग्रीक व रोमन लोक विलयास गेले. त्यांच्या विचारप्रागल्भ्यामुळें त्यांच्या नैतिक व धार्मिक मनोवृत्तींची अनिवार्यपणें हानि झाली. तोच प्रकार हल्लीं एतद्देशीय वरिष्ठ जातींत कांहीं अंशीं दृष्टीस पडत आहे. त्यामुळें आम्हीही विनाशमार्गास लागलों आहों असें स्पष्ट दिसतें.

× × × ×

केवळ धर्मवेड नाहींसें केल्यानें समाज सुखी होत नाहीं; उलट त्याचीं सुखसाधनें कमी होतात व हीन मनोवृत्तींवरचा दाब नाहींसा होऊन हानि होते. धर्मवेड अजिबात घालवावयाचें आणि तटस्थ राहावयाचें म्हटलें तर हा प्रयत्न व्यक्तीस कोणत्या थरास नेऊन पोहोंचवील त्याचा पत्ताच लागणार नाहीं. याकरितां जें एखादें धर्मवेड नाहींसें करायाचें म्हणून बुद्धीस आवश्यक दिसेल त्या धर्मवेडानें कोणत्या हितकर मनोवृत्तींस आधार मिळाला आहे, कोणते आनंदोत्सवाचे प्रसंग येतात, कोणत्या आवेशाच्या कर्तव्यास त्यांची मदत होणें शक्य आहे—इत्यादि गोष्टींचा प्रथम पूर्ण विचार करून, व नंतर त्या सर्व मनोवृत्तींस दुसरा अधिक योग्य आधार देऊन, आणि तदनुसार आनंदावेशाचे प्रसंग योजून—मग त्या धर्मवेडास धक्का लाविला पाहिजे. मनोवृत्तींस दिलेला हा दुसरा आधार ग्राह्य झाला पाहिजे व तो रूढ होण्यास अवकाश दिला पाहिजे. अशा रीतीनें एक एक धर्मवेड नाहींसें झालें तर समाजाचा फायदा होतो. या मार्गानें सुधारणा सावकाशच होणार.

परंतु जे सुधारक हा दूरदृष्टीचा मार्ग स्वीकारीत नाहींत व बुद्धिप्रेरित उदात्त विचारांमुळें कां होईना, उचंबळून जाऊन देहभान विसरतात, व अप्रासंगिक सुधारणेकरितां जळफळून समाजाच्या मर्मी घाव देतात, ते समाजाचे शत्रु होत. समाजास त्यांचा राग यावयाचाच व ते कंटक दूर करण्याचा प्रयत्न करणें अवश्य आहे. त्यायोगें समाजाचें आयुष्य वाढतें. परंतु वरिष्ठ जातींत एकपक्षीय शिक्षणानें, विस्तृत परंतु उथळ विचारशैलीनें व समाजास नुसते टोचूनच कुत्सित सुख होतें त्याच्या लोभानें, अनेक अविचारी तरुण गृहस्थ धर्महीन सुधारक बनत आहेत, वास्तविकपणें समाज-कंटक होत आहेत. हा असा चालू शिक्षणाचा परिणाम सर्वच वरिष्ठ जातींच्या

पुरुषांतर होण्याचा संभव पाहिला म्हणजे वरिष्ठ जातींची भावी स्थिति भयंकर दिसते.

आजपर्यंत ज्या धर्मक्रांत्या किंवा धर्मसुधारणा झाल्या त्या करणारांची धर्मश्रद्धा प्रज्वलित होती असें त्यांच्या शत्रूंनाही कबूल करावें लागे. त्यांनीं जे प्रयत्न केले ते अश्रद्ध बुद्धीनें पाहिले, तर एवढेंच दिसतें कीं, एक धर्मवेड काढून त्याचे जागीं दुसरें त्यांनीं स्थापिलें, किंवा मूळचें जेवढें धर्मवेड होतें तें कमी केलें. परंतु त्यांचे ते प्रयत्न सिद्धीस जाण्यास त्यांचा कोणता गुण कारण झाला याचा विचार अधिक महत्त्वाचा आहे. तो गुण श्रद्धा हा होय. ल्यूथर, काल्व्हिन, बुद्ध, शंकराचार्य, रामदास, तुकाराम, कबीर वगैरे या सर्वांमध्यें उत्तम धर्मश्रद्धा होती; व तिजविषयीं अनुयायांस व प्रतिपक्षास शंका येण्यास अल्पमात्र कारण त्यांच्या सर्व आचरणांत सांपडण्यासारखें नव्हतें. त्यांनीं व्यभिचारी पुरुषास, असत्य बोलणारास, धर्मनिंदकास आपल्या शेजारीं उभें केलें नसतें; मग त्याचे अन्य गुण ,कोणतेही असोत. अशी बळकट श्रद्धा ज्यांच्या अंगीं नाहीं, त्यांनीं सुधारणेचे दंभ माजविण्यांत व समाजास द्वेष्य होण्यांत काय फायदा आहे ? त्यांस जें स्वहित साधायाचें असेल तें अन्य मार्गांनीं साधावें; इतरांस कां उपद्रव द्यावा ?

ज्याची धर्मश्रद्धा संदेहात्मक त्यानें धर्मसुधारणेचा प्रवर्तक होणें म्हणजे धर्मनिंदा आरंभण्यासारखें आहे. विद्याशिक्षण आणि धर्मनीति यांचें शिक्षण, या दोहोंमध्यें जो मोठा भेद आहे तो हाच कीं या दुसऱ्या कार्यांत सर्व उत्कृष्ट मनोवृत्तींचें व विशेषतः श्रद्धेचें व सदाचरणाचें काम लागतें. अमुक नात्यानें मी उपदेश करीत आहें, तेवढ्या नात्यानें मजकडे पहा, असें कोणी म्हणेल तर तें कोणासही पसंत पडेल काय ? एका धर्माचा उपदेशक दुसऱ्या धर्माच्या उपदेशांस कां योग्य गणिला जात नाहीं ? ख्रिस्ती धर्मोपदेशाचें काम कोणी स्वतः हिंदु राहून आरंभिल्यास तें ख्रिस्ती लोकांस मान्य किंवा गुणावह होईल काय ? तें तसें होतें, तर यंत्रानेंही धर्माचा व नीतीचा उपदेश करितां आला असता ! उपदेशास श्रद्धा पाहिजे. परंतु वरिष्ठ जातींत काय प्रकार दिसतो ? श्रद्धावान् पुरुष, म्हणजे भटभिक्षुक, शास्त्रीपंडित, वृद्ध गृहस्थ, इत्यादींची धर्मवेड्यामध्यें गणना करण्याचा उपदेश सुरू आहे; धर्मसंशोधनाच्या कामीं त्यांस द्रव्यानें किंवा बहुमानानें उत्तेजन मिळत नाहीं; व

अश्रद्ध पुरुष धर्माच्या व नीतीच्या सुधारणांचे प्रवर्तक झाले आहेत. विद्वान् असून श्रद्धावान् असे पुरुष उत्पन्न होण्यास शिक्षणाची तऱ्हा फार बदलली पाहिजे; तीवांचून ह्या उतारास लागलेल्या समाजास स्थैर्य किंवा शाश्वती येणें अशक्य आहे.

सर्वांनीं एवढें एक तत्त्व लक्षांत ठेवावें कीं, बुद्धीस अप्रयोजक परंतु मनोदेवतेस प्रशस्त दिसणारें कोणतेंही काम करण्याचें किंवा न करण्याचें समाजाच्या खुषीवर ठेवल्यास समाज निश्चयानें मनोदेवतेस अनुसरेल. दानधर्माच्या कामीं, पशुहत्येच्या कामीं व कित्येक आपत्प्रसंगीं या तत्त्वाचा अनुभव येतो. मनोदेवतेविरुद्ध आचरण करण्याची संवय फार घातक आहे. मनोदेवतेच्या समाधानासाठीं सुविचारांचा मोड झालेला दिसला किंवा व्यक्तिसुखाचा नाश झालेला दिसला, तथापि तो पत्करतो; त्याचे अखेरचे परिणाम समाजास इष्ट तेच होतात. हरतऱ्हेच्या पूर्वसंस्कारांनीं मनोदेवतेस बळ आलेलें असतें. दूरवर कार्य करणाऱ्या कारणांचा प्रत्यय भिन्न भिन्न स्थितींत येत गेल्यानें मनोदेवता तयार होते, म्हणून ती समाजाची खरी दूरदृष्टि होय. तीस दुखविण्याचा प्रयत्न पाहून तिऱ्हाइतासही वाईट वाटतें; तीस समाधान देण्याचा प्रयत्न पाहून तिऱ्हाइतासही मनाची श्रेष्ठता ओळखतां येते.

रूढ मनोदेवतेविरुद्ध एकदम वर्तन करूं लागणारे लोक कितीही सुविचारी असले तरी ते सुखसंतोषापेक्षां अधिक प्रमाणानें सामाजिक दुःख उत्पन्न करितात. हें त्यांचें कृत्य उचित नव्हे. कारण, पुढच्या मोठ्या आशेनें आज कांहीं दुःख भोगणें, ही व्यक्तीच्या बुद्धीनें योग्य दूरदृष्टि होईल. अल्पकाळांत व्यक्तीचें मोठें स्थित्यंतर होऊं शकतें, व त्यामुळें पुढील सुख मागील दुःखाचा विसर पाडूं शकतें. परंतु एखाद्या व्यक्तीस दूरदृष्टीनें जें कोणतेंही नवीन आचरण सुखपर्यवसायी होतें असें दिसून आलें, तेंच आचरण सर्वांस, म्हणजे समाजास तसेंच सुखदायक होईल असें त्यानें सुचविणें व त्या सुधारणेबद्दल आग्रह धरणें हें योग्य नाहीं. कारण समाजाचें स्थित्यंतर व्यक्तीप्रमाणें अल्पकाळांत होण्याचा बिलकुलच संभव नसतो. त्यामुळें नवीन वर्तनाचे आधींचे दुःखदायक परिणाम कित्येक पिढ्यांपर्यंत समाजास भोगावे लागणार; इतक्या अवकाशांत परिस्थिति किती बदलेल याचा अंदाज करितां

येत नाहीं; त्यामुळें नवीन आचरण सामाजिक दुःखास मात्र कारण होतें; व त्यास तोलून धरणारें सुख केव्हां येणार व येईल किंवा नाहीं त्याचा संदेहच राहतो. म्हणून व्यक्तीच्या आयुष्यमर्यादेंत जी दूरदृष्टि तीच समाजाच्या आयुष्यांतही दूरदृष्टि असें म्हणतां येत नाहीं. अलीकडील तीस वर्षांच्या सुधारणेचा इतिहासच या गोष्टीची साक्ष देतो. रूढ मनोदेवता ही समाजाची खरी दूरदृष्टि होय. व्यक्तीच्यासंबंधानें जी दूरदृष्टि ती समाजास लागू केली तर ती अल्पदृष्टि होय. मनोदेवतेचें सामाजिक अनुभवांनीं हळू हळू रूपांतर होत असतें; समाजाच्या शाश्वतीस तें मात्र कारण होतें. व्यक्तीचें उद्दाम स्वैर वर्तन व त्यांचें अनुकरण करणारांचा अविचार यांपासून समाजावर होणारा परिणाम कधींच इष्ट नसतो.

× × ×

समाजहिताचा विचार करितांना फार खोल व दूरवर दृष्टि पोंचविली पाहिजे. वरकरणी विचार बिलकूल कामाचा नाहीं. दुष्टांच्या पारिपत्याचें काम कायदा करितो; शिष्टांस नायकत्व व थोरवी देण्याचें काम नीति किंवा शिष्टाचार करितो; सर्व गुणचतुष्टयाचें स्वतंत्रपणें संरक्षण करून त्यांस मनुष्यस्वभावांत उपजतबुद्धीचें स्वरूप देण्याचें काम धर्म आणि रूढि हीं करितात. कायद्याचा अंमल चुकवितां येतो; शिष्टसमागम सर्वकाळ सुलभ नसतो; ज्ञानसंपादनास व स्वतंत्र सदसद्विवेकास योग्य साधनें मिळत नाहींत अशा स्थितींत बहुसमाज आहे. त्या बहुसमाजास बऱ्यावाईटाचा बोध व उत्कृष्ट प्रेरणा करण्याकरितां धर्म आणि रूढि ठेवण्याचें कारण हेंच कीं, कृतज्ञतादि तत्त्वांनीं योग्य झालेल्या कर्तव्यांची सहजगत्या स्फूर्ति व्हावी. हरएक प्रसंगीं जें योग्य तें त्वरित लक्षांत येऊन लागलीच तें करण्याचा निश्चय व्हावा, विलंब लागूं नये. भिन्न मनोवृत्तींची मनांत झटापट सुरू होऊन मनुष्याचें धैर्य व कर्तृत्व कमी होऊं नये; व एकंदरीनें उचित तें करण्यांत मनुष्यानें आनंदच मानावा, दुःख मानूं नये. या सर्व गोष्टी धर्मानें आणि रूढीनें मात्र साध्य आणि शक्य आहेत, म्हणून समाजांत धर्माचें व रूढीचें अत्यंत माहात्म्य आहे. धर्मपरायण मनुष्याच्या हातून एखाद्या विलक्षण घडामोडीच्या प्रसंगीं मात्र चूक व्हावयाची, म्हणजे समाजास अनिष्ट असें वर्तन कदाचित् त्याकडून घडावयाचें; परंतु असे प्रसंग फार थोडे, बाकीच्या सामान्य प्रसंगीं त्याचें वर्तन समाजास हितकारक असेंच असावयाचें.

कायदा, शिष्टाचार आणि धर्म, या सर्वांचें दर पिढीस थोडेथोडें रूपांतर होत जातें. तें ग्रंथांत दिसावयाचें नाहीं, परंतु लोकांच्या समजुतींत स्पष्टपणें दिसून येतें. हें रूपांतर म्हणजेच सुधारणा. ती अल्प आहे तोंपर्यंत रूढीच्या पोटांत येतें. शास्त्राशीं त्यायोगें रूढि विसंगत होत जाते. परंतु रूढीच्या पोटांत सुधारणा असल्याकारणानें तिचा अंमल अधिक असतो. म्हणूनच 'शास्त्राद्रूढिर्बलीयसी' हा सिद्धान्त ठरतो. पुढें जेव्हां कायदा आणि धर्म हे रूढीहून फारच भिन्न होतात, तेव्हां त्यांस चालना देणें जरूर होतें. कायदा बदलण्याचें काम परमश्रेष्ठ सत्पुरुषाच्या हातून मात्र होतें. त्यास आपण धर्मसंस्थापना करणारा असें म्हणतों. तो ईश्वरी अंश समजून, किंवा फार असाधारण पुरुष असें जाणून बहुजनसमाज त्याचा अधिकार मान्य करितो. 'धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे!' रूढींत सुधारणा पुष्कळशी सांचली म्हणजे मात्र धर्मसंस्थापनेचा प्रसंग येतो, व तो समाजांत कांहीं पिढ्या गेल्या म्हणजे पुनः पुनः यावयाचाच. एका धर्मसंस्थापनेचें स्वरूप दुसरीशीं जुळत नाहीं. धर्मांत क्रांति किंवा उत्क्रांति अवश्य होते. समाजांत कोणत्या रूढि मागें पडत आहेत, कोणत्या नव्या उत्पन्न होत आहेत, हें पाहून त्यांत किती सुधारणा होत आहे हें ध्यानांत आणावें. केवळ धर्मग्रंथांतील वचनें पाहून कोणत्याही समाजाची सुस्थिति किंवा सुधारणा मोजणें फारच चुकीचें होईल. धर्मक्रांति होत असतां जीं तत्त्वें कायम राहतात व सर्व धर्मांच्या मुळाशीं असतात तीं कृतज्ञता, सत्य, प्रेम आणि दया हीं होत.

कायदा, शिष्टाचार आणि धर्म यांचें जें अवश्य रूपांतर होत जातें म्हणून आतां सांगितलें, त्याचें कारण पहातां समाजाच्या परिस्थितीचा फरक हें होय. प्रत्येक पिढीच्या आवश्यकता वाढत असतात. त्या पुरविल्याखेरीज चालत नाहीं. त्या पुरविण्याचे जुने कर्तृत्वाचे मार्ग अवलंबून भागत नाहीं. कर्तृत्वास नवी दिशा देणें भाग होतें. या रीतीनें कर्तृत्वाचा ओघ थोडासा बदलतो. त्याप्रमाणें समाजाची सांपत्तिक स्थिति थोडीबहुत बदलते. परोपकाराचे किंवा ऐषआरामाचे प्रकार टाकावे लागतात. कांहीं नवें अंगीकारावे लागतात. शिक्षण, ज्ञान आणि यांत्रिक योजना यांनींही परिस्थिति थोडीशी बदलते, कारण जें पूर्वीं आवडत असतें तें अभिरुचि बदलल्यानें आवडेनासें होतें.

न्याय, अन्याय, यांविषयीं ज्या पूर्वीच्या कल्पना असतात, त्यांमध्येंही फरक पडतो; तात्पर्य हें कीं मनोवृत्तींच्या संबंधानें पूर्वीची जी अंतःकरणाची रचना असते ती बदलून जाते. समाजाच्या शाश्वतीम जीं कर्तव्यें मागील पिढींत आवश्यक असतात, त्याहून कांहीं निराळीं कर्तव्यें आतां आवश्यक होतात; व पूर्वीच्या कर्तव्यांतील कांहींस अधिक उत्तेजन व कांहींचा त्याग आवश्यक होतो. एकाच पिढींत ज्ञान, कर्तृत्व आणि संपत्ति यामध्यें फार थोडा फरक पडतो; म्हणून रूढीचें फार थोडें रूपांतर होतें; म्हणजे फार थोडी सुधारणा आवश्यक असते व होऊं शकते. ज्या ज्या बाबतींत व ज्या ज्या दिशांनीं परिस्थितींत अंतर पडतें त्या त्या बाबतींत व दिशांत मात्र योग्य सुधारणा व्हावयाची; इतर बाबतींत होण्याचें कारण नाहीं.

याप्रमाणें सुधारणेचा वेग नियमित करणारीं कारणें कोणतीं त्यांचा विचार करूं लागलें म्हणजे, समाजाची परिस्थिति किती व कोणत्या दिशेनें बदलत आहे हें प्रथम पहावें लागतें. एका अर्ध्या पिढींत तींत कितीसा बदल होणार ? जेवढा होणार व ज्या दिशेनें होणार तेवढीच सुधारणा त्या दिशेनें होणार. ही गोष्ट ध्यानांत आणिली म्हणजे सुधारणा खूप जोरानें आणि वेगानें व्हावी म्हणून तळमळणारांचा अविचार उत्कृष्टपणें नजरेस येतो. समाजाचें स्थित्यंतर हें कारण, सुधारणा हें कार्य; कारणाशीं सप्रमाण कार्य घडायाचेंच. त्याकरितां फारसा प्रयत्न नको आहे. जो प्रयत्न हवा आहे तो कृतज्ञतादि गुणांस पूर्णत्व आणण्याचा. मुळाशींच गेलें म्हणजे स्थित्यंतरा-नुरूप उचित सुधारणा अवश्य घडणार. समाज प्रत्यक्ष अनुभवानें चालतो, शुद्ध काल्पनिक ज्ञानानें तो हलत नाहीं. उपदेश करणारे पुष्कळ, परंतु त्या-प्रमाणें स्वतः आचरण केल्यामुळें अधिक सुखी व कर्तृत्वशील झालेले फार थोडे दिसतात, याचें कारण हेंच होय. म्हणून माझें सांगणें असें कीं, देशाचें काम फाजील चालविलें आहे तें सुधारकांनीं कमी करावें. काल्पनिक कर्तव्यास काल्पनिक पुरावा देण्याचें तें काम आहे. प्रत्यक्षास पुरावाच नको असतो. माझें तुम्हांस असें सांगणें आहे कीं, अज्ञानी व आपन्न लोकांच्या धर्मश्रद्धेस किंवा शिष्टाचारास धक्का बसेल, असें वर्तन तुम्हीं करूं नये किंवा असा उपदेशही करूं नये. त्यामुळें समाजांत अविचार माजतो; मनोवृत्ति हीन होतात; कोणी कोणास बहुमान देईनासा होतो; सामाजिक बंधनें तुटतात व सर्व प्रकारें हानि

होते. इमारत पाडण्यास वेळ लागत नाहीं; बांधण्यास वेळ लागतो. तसेंच समाजाची हानि करण्यास थोडे श्रम लागतात, त्यांचें श्रेय कशास घेतां! समाजाच्या उत्तम मनोवृत्ति कायम ठेवण्यास व त्यांस पूर्णावस्था आणण्यास जे मोठे श्रम लागतात, ते केल्याचें श्रेय कां घेत नाहीं! लोकसंग्रह करणारानें या दुसऱ्या मार्गानें जावें, असा आपल्या पूर्वजांचा उपदेश आहे.

न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् ।
जोषयेत् सर्वकर्माणि विद्वान् युक्तः समाचरन् ॥

या उक्तींतला भावार्थ आतां मीं म्हटलें त्या प्रकारचा आहे.



धोंडो केशव कर्वे ( १८५८ )

# ८. माझ्या जीवनाचें तात्त्विक अधिष्ठान

' परोपकारः पुण्याय पापाय परपीडनम् । ' हा माझा धर्म. सार्वजनिक कार्यांची हौस ही माझी प्रेरक शक्ति.

मनसि वचसि काये पुण्यपीयूषपूर्णाः
त्रिभुवनमुपकारश्रेणिभिः प्रीणयन्तः ।
परगुणपरमाणून् पर्वतीकृत्य नित्यम्
निजहृदि विकसन्तः सन्ति सन्तः कियन्तः ॥

असे सत्पुरुष आणि

जो सर्वां भूतांचे ठायीं । द्वेषातें नेणेचि कांहीं ।
आपपर जया नाहीं । चैतन्या जैसें ॥
कीं गाईची तृषा हरूं । व्याघ्रा विष होऊनि मारूं ।
ऐसें नेणेंचि गा करूं । तोय जैसें ॥

असे स्थितप्रज्ञ हे होकायंत्राप्रमाणें आचरणाची दिशा दाखविणारे. " आकाशावर नेम धर म्हणजे तुझा बाण झाडापर्यंत तरी जाईल, " ह्या उपदेशाप्रमाणेंच वरील ध्येयवचनें मीं मार्गदर्शक ठरविलीं होतीं.

माझी बुद्धि बऱ्यापैकीं पण ती खोल पाहणारी, मूलग्राही नाहीं. माझें वाचन बेताबाताचें. श्रवण फारच थोडें. मननही फारसें नाहीं. निदिध्यास हातीं असलेल्या सार्वजनिक कार्याचें पाऊल पुढें कसें पडेल ह्याबद्दल. माझा आयुष्यक्रम इतरांहून थोडासा भिन्न. बाराव्या वर्षी माझा मराठी शाळेंतील अभ्यासक्रम संपला. त्याच्या आधीं एक वर्ष सोमण मास्तर ट्रेनिंग कॉलेजांतील पहिल्या प्रतीची परीक्षा देऊन प्रथमच आमच्या शाळेंत हेडमास्तर होऊन आले. वर्तमानपत्राच्या वाचनानें त्यांनीं नवीन विचार आत्मसात् केले होते. त्यांच्याकडे मी अभ्यासाला जात असें व त्याचें इतरांशीं अनेक विषयांवर संभाषण होई, तें मी ऐकत असें. मी पांचसहा वर्षे आमच्या मुरुड गांवीं

रिकामाच होतों. ह्या मुदतींत सोमण मास्तरांनीं मला सार्वजनिक कार्याचें बाळकडूं पाजलें व आपल्या देखरेखीखालीं दोन धडे शिकविले. गांवांतील मुख्य देवळांत लोक दर्शनासाठीं जात, त्या वेळीं त्यांना वर्तमानपत्रें वाचून दाखविण्याचें काम त्यांनीं मजकडून करून घेतलें; व गांवांतील लोकांकडून पांच रुपयांचा एक भाग ( share )–याप्रमाणें पांच-सहाशें रुपयांच्या भांडवलाच्या दुकानाचा बिनपगारी दुकानदार म्हणून मजकडून काम करवून घेतलें. मी १८ व्या वर्षी इंग्रजी शिकूं लागलों, २४ व्या वर्षी मॅट्रिक्युलेशन व २७ व्या वर्षी बी. ए. झालों.

बाराव्या वर्षींच मुंबईत झालेल्या पुनर्विवाहाची इंदुप्रकाशांत आलेली चटकदार हकीकत वाचल्यानें मजमध्यें विधवांविषयीं सहानुभूति उत्पन्न झाली. माझे मित्र, सहाध्यायी व हल्लींचे मेहुणे नरहरपंत जोशी यांना मिल, हर्बर्ट स्पेन्सर यांच्या ग्रंथांची गोडी लागली व त्यांच्या सहवासानें माझे विचार बुद्धिवादी बनूं लागले. ह्या विचारांना आगरकरांचा सहवास लाभल्यानें, पुष्टि मिळाली.

माझें शिक्षण प्रौढपणींच झाल्यानें विचारांना कृतीचें स्वरूप देण्याचे प्रयत्न विद्यार्थिदशेंतच सुरू झाले. हायस्कुलांत स्कॉलरशिप मिळाली किंवा त्या वेळीं शिकवणीचे पैसे हातीं आले, तर दर रुपयास एक पैसा याप्रमाणें मीं वेगळे काढून ठेवण्यास सुरुवात केली. ह्या पैशाचा उपयोग एखाद्या सत्कार्याकडे करावयाचा, हा हेतु होता. आमच्या मुरुड गांवाच्या हितासाठीं 'मुरुड-फंड' ही संस्था काढण्याचा विचार, मी मॅट्रिक्युलेशनच्या वर्गांत असतांनाच, माझ्या मनांत आला. एका मित्राच्या व माझ्या सहीचीं पत्रें आधीं दूर ठिकाणीं नोकरी करीत असलेल्या अनेक ग्रामस्थांस पाठविलीं. पण कोणीच उत्तेजन न दिल्यामुळें तें काम तसेंच राहिलें. पुढें बी. ए. झाल्यावर दोन वर्षांनीं तें काम पुन्हा हातीं घेतलें व त्या कामीं चांगलें यश आलें. या फंडाचा निधि सुमारें वीस हजार झाला असून त्या फंडाचा हीरकमहोत्सव गेल्या मे महिन्यांत झाला. त्यासाठीं मी मुद्दाम मुरुडगांवीं गेलों होतों.

मुरुड–फंडाचें काम करीत असतांनाच आपल्या दापोली तालुक्यासाठीं कांहीं करावें, असें मनांत आलें व मी तालुक्यांतील सुशिक्षित लोकांशीं व तालुक्यांतील नोकरीसाठीं दूर गेलेल्या लोकांशीं पत्रव्यवहार करून स्नेहसंवर्धक

मंडळ स्थापन केलें. नोकरीवर असलेले बरेच लोक मे महिन्याच्या सुटींत आपापल्या गांवीं येत. अशा लोकांनीं तालुक्यांतील एका गांवीं एक रात्र व एक दिवस एकत्र घालवावा व परस्परांत दळणवळण उत्पन्न होऊन विचार-विनिमय व्हावा, असा ह्या मंडळाचा हेतु होता. तीन वर्षें मंडळाच्या सभा तीन गांवीं चांगल्या पार पडल्या. चवथ्या वर्षी माझा पुनर्विवाह झाल्यानंतर मी त्या सभेला गेलों. मला भोजनगृहांत येऊं न देतां शेजारच्या घरीं माझ्या जेवणाची सोय केली. मला सभेंत बसूं देण्यास थोडे लोक अनुकूल होते. पण अखेरीस सभा न होतांच सर्व लोक आपापल्या गांवीं गेले. पुढच्या वर्षी एक सभा माझ्यावांचून झाली व पुढें ती संस्था कोणी चालविण्यास न मिळाल्या-मुळें लयास गेली.

मला अमुक एक कार्य करावयाचें आहे, असा माझा निश्चय कधींच झाला नाहीं. परिस्थिति बदलली व नवीन अनुभव आले कीं, नवीं कार्यें माझ्या मनाची पकड घेत व नवीं नवीं कार्यें मी हातीं घेत असें; मात्र पूर्वींचीं कार्यें लयाला जाऊं नयेत म्हणून मी काळजी घेत आलों आहें. मीं हातीं घेतलेल्या कार्यांची कल्पना येण्याला माझ्या आयुष्यक्रमाचें धावतें सिंहावलोकनच केलें पाहिजे. मी मुंबईत स्थायिक झाल्यावर मला बरे पैसे मिळूं लागले व माझ्या काटकसरी वृत्तीमुळें उरलेल्या पैशाचा सदुपयोग करण्याचें मीं योजिलें. माझ्या गरिबीमुळें माझ्या शिक्षणांत अडचणी आल्या. त्यांची जाणीव असल्यामुळें कांहीं विद्यार्थ्यांना मदत करण्याचें मीं ठरविलें. एक मामेभाऊ ( पुढें रँग्लर परांजपे झाले ते ), एक पहिल्या संबंधाचा मेहुणा, एक भावाचा जांवई व एक शेजारच्या गांवचा ब्रन्यापैकीं मुलगा, असे चार विद्यार्थी आमच्या संयुक्त कुटुंबांत घेतले. नरहरपंत, त्यांची बायको व दोघे भाऊ, मी, माझी बायको व मुलगा असें आमचें संयुक्त कुटुंब होतें. ही परिस्थिति अशीच चालूं राहती, तर कदाचित् माझें मुंबईस राहणें झालें असतें व हीं मुलें मार्गाला लागल्या-वर दुसरीं घेतलीं असतीं. पण परिस्थिति एकदम बदलली.

बी. ए. झाल्यावर सात वर्षें मुंबईत काढलीं. शेवटल्या चार महिन्यांपूर्वीं माझी प्रथम पत्नी वारली. तरी संयुक्त कुटुंब चालूं होतें. माझी पत्नी वारल्यावर विधवा मेहुणी संयुक्त कुटुंबाच्या मदतीस आली. अशा स्थितींत अगदीं ध्यानींमनीं नसतां प्रो. गोखले यांनीं मला फर्ग्युसन कॉलेजांत गणित

विषयाच्या अध्यापकाचें काम करण्यास बोलाविलें व सर्व मुलांसह मी पुण्यास येऊन राहिलों व स्वत: विधवेशीं लग्न करून विधवा-विवाहाचें कार्य हातीं घेतलें. विधवाविवाहप्रतिबंधनिवारक मंडळी स्थापन केली व तिच्यासाठीं सारखा अडीच वर्षें झटलों. कॉलेजला सुटी झाली म्हणजे फिरतीवर जावें, व्याख्यानें द्यावीं, फंड जमवावा, असा क्रम चालत होता; पण शेवटीं असें दिसून आलें कीं, हा प्रश्न धार्मिक असल्यामुळें तो सुटणें कठीण आहे. सुशिक्षित विधुर त्या कामीं पाऊल टाकायला भितो; तेव्हां अशिक्षित विधवेला पुढें यायला धैर्य कसें यावें ! अशा स्थितींत आपलें सर्व सामर्थ्य ह्या कामीं खर्चण्यापेक्षां तें विधवाशिक्षणाच्या कामीं खर्च केलें, तर बरें होईल असें वाटून मी विधवा-शिक्षणाचा प्रश्न हातीं घेतला व अनाथबालिकाश्रमाच्या संस्थेवर विशेष भर दिला. विधवा-विवाहाची संस्था बंद न करितां मी तिचा सात वर्षें चिटणीस राहिलों व पुढें ती प्रो. भाटे ह्यांचे हवालीं केली. त्या संस्थेचें हल्लींचें नांव विधवाविवाहमंडळ असें आहे. ह्या संस्थेचा सुवर्णमहोत्सव दोन वर्षांपूर्वी साजरा झाला व आतां ह्या संस्थेच्या मालकीचें घर नातूंच्या बागेंत बांधलें असून संस्थेचें काम चांगलें चाललें आहे.

विधवाविवाहाचा प्रश्न सोडवीत असतां विधवाशिक्षणाच्या प्रश्नाकडे माझें मन वळलें व हिंगणें बुद्रुक येथें आश्रमाची स्थापना झाली. आश्रमाचें काम चांगल्या रीतीनें चालूं लागलें व संस्थेंत ५७ विधवा व १९ अविधवा अशा विद्यार्थिनी झाल्या. बहुतेक विधवा गरीब असून आश्रमावरच अवलंबून असत. अविधवा विद्यार्थिनी मात्र स्वतःचा खर्च देऊन येत. आश्रमाच्या व्यवस्थापक-मंडळीनें आग्रह धरला कीं, अविधवा विद्यार्थिनींची संख्या एकंदर विद्यार्थिनींच्या संख्येच्या चतुर्थांशापेक्षां अधिक असूं नये. कुमारिकांच्या शिक्षणाकडेही माझें मन ओढ घेऊं लागलें होतें. विशेषत: त्यांच्या लग्नाच्या वयाची मर्यादा पुढें ढकलल्याशिवाय त्यांच्या शिक्षणाला पुरेसा वाव मिळणार नाहीं, हे विचार मनांत येऊन, मी आपल्याच जबाबदारीवर पुणें शहरांत महिलाविद्यालयाची संस्था काढली. आश्रमाची जबाब्दारी मजवर होतीच. पण विद्यालयासाठींही मी निधि जमवूं लागलों. त्यांतच आणखी ब्रह्मचर्यफंड म्हणून काढला. जीं गरीब आईबापें, आपल्या मुली, त्यांचें वीस वर्षांचें वय होईपर्यंत त्यांचीं लग्नें करावयाचीं नाहींत, या अटीवर महिलाविद्यालयाच्या स्वाधीन करण्यास तयार

असतील, त्यांच्या मुली विद्यालयानें ताब्यांत घेऊन त्यांचा खर्च विद्यालयानें ह्या फंडांतून करावयाचा. अशी अट न पत्करितां खर्च देऊन येणाऱ्या मुलीही विद्यालयांत घेतल्या जात. विद्यालयांतील मुलींची संख्याही वाढूं लागली व आश्रमाशेजारीं जागा घेऊन इमारत बांधून तींत विद्यालय नेण्यांत आलें.

विद्यालय सुरू झाल्यानंतर वर्ष दीड वर्षानेंच 'निष्कामकर्ममठ' या नांवाची संस्था मीं सुरू केली. ह्या संस्थेचा हेतु आश्रम–विद्यालयासारख्या संस्था चालविण्यास योग्य अशीं माणसें तयार करणें, हा होता. आश्रमांत शिकणाऱ्या कांहीं विद्यार्थिनींचीं मनें मीं ह्या मठाचे घटक होण्यासाठीं वळविलीं. शिक्षण पुरें झाल्यावर काम करूं लागावयाचें, तेव्हां पगार न घेतां सर्वांनीं एका कुटुंबाप्रमाणें राहावयाचें व प्रत्येकीला थोडा किरकोळ खर्चासाठीं पॉकेटमनी म्हणून द्यावयाचा. मी स्वतः, विद्यालयांत काम करणारीं दोन पतिपत्नींचीं जोडपीं, व सहासात विद्यार्थिनी अशांचा हा मठ होता. आश्रम व विद्यालय या दोन संस्था शेजारीं पण अगदीं स्वतंत्रपणें दोन वर्षें काम करीत होत्या. दोन शाळा वेगळ्या, दोहोंचें शिक्षण वेगळें, असा प्रकार चालला होता. शेवटीं आश्रमाच्या व्यवस्थापक मंडळीनें आपला आग्रह सोडला व विद्यालयाचा अंतर्भाव आश्रमांत करून घेतला. मठाचें ध्येय साध्य होणें कठीण म्हणून मठाची कल्पना सोडून देऊन मठाचे घटक आश्रमांचे आजीव सेवक झाले. ह्या रीतीनें महिलाविद्यालय व निष्कामकर्ममठ ह्या संस्था आश्रमांत विलीन होऊन गेल्या आणि विधवांच्या शिक्षणाची संस्था असें आश्रमाचें स्वरूप होतें, तें सामान्यतः स्त्रियांच्या शिक्षणाची संस्था असें झालें.

गेल्या वर्षी संस्थेच्या सुवर्णमहोत्सवाच्या वेळीं त्या संस्थेचें 'हिंगणें स्त्रीशिक्षणसंस्था' असें नवें नामकरण झालें. हिंगण्याच्या माळावर एका लहान झोपडींत पांचसहा मुलींसह आश्रमाला सुरुवात झाली. तेथें आतां तीन लाखांच्या इमारती उभारल्या जाऊन पांचशें माणसांची वसाहत झाली आहे.

ह्या सुमाराला मी फर्ग्युसन कॉलेजांतून सेवानिवृत्त होऊन मोकळा झालों; व पुढील वीस वर्षें, माझें सर्व सामर्थ्य, मला महिलाविद्यापीठ–म्हणजे स्त्रियांची युनिव्हर्सिटी–ह्या संस्थेच्या कामीं लावितां आलें. जपानांतील स्त्रियांच्या युनिव्हर्सिटीचें १२ वर्षांचें इंग्रजी भाषेंतील इतिवृत्त वाचून आपल्या देशांत अशी संस्था असावी असें मनांत आलें व वयाच्या ५८ व्या वर्षी ह्या

मोठ्या जबाबदारीच्या कामाला हात घातला. मुंबई येथें १९१५ च्या अखेरीस भरलेल्या राष्ट्रीय सभेनंतर त्याच मंडपांत भरलेल्या राष्ट्रीय सामाजिक परिषदेच्या अध्यक्षीय भाषणांत जपानांतील स्त्रियांच्या युनिव्हर्सिटीच्या कार्याचा त्रोटक इतिहास देऊन लवकरच येथें महिलाविद्यापीठ स्थापन करण्याचा हेतु जाहीर केला व लागलींच त्या उद्योगाला मी लागलों. विधवाविवाहाची संस्था व हिंगण्याचा आश्रम, ह्या संस्थांच्या प्रचारासाठीं व द्रव्यसाहाय्य मिळविण्यासाठीं मी महाराष्ट्रभर हिंडलों. पण महिलाविद्यापीठासाठीं कन्याकुमारीपासून पेशावरपर्यंत व कराचीपासून कलकत्त्यापर्यंत सगळ्या देशभर हिंडलों. बंगाल्यांत फक्त कल-कत्त्यासच गेलों. पण बाकीचे इलाखे व संस्थानें ह्यांतील जिल्ह्यांच्या सर्व ठिकाणीं गेलों व प्रचार करून द्रव्यसाहाय्य मिळविलें. वयाच्या ७१ व्या वर्षी युरोप, अमेरिका, जपान, चीन, जावा, मलाया, सेलिबीज आणि फिलिपाइन वगैरे देशांना भेटी देऊन तेरा महिन्यांत पृथ्वीप्रदक्षिणा पुरी केली. ह्या वेळीं माझा कनिष्ठ चिरंजीव बरोबर होता; व त्याच्या मदतीनेंच हें सर्व पार पाडतां आलें. नंतर ७३ व्या वर्षी पूर्व व दक्षिण आफ्रिकेंत १४ महिन्यांचा प्रवास एकट्यानेंच केला. माझा एक मुलगा मुंबासा येथें डॉक्टर होता व अजून तेथेंच आहे. त्याच्या ठिकठिकाणीं ओळखी असल्यामुळें माझी सर्व ठिकाणीं चांगली सोय झाली.

मातृभाषेच्या अभ्यासाला प्रथम स्थान देऊन मातृभाषा हेंच शिक्षणाचें माध्यम असलें पाहिजे, हा महिलाविद्यापीठाचा कटाक्ष होता. उच्च शिक्षण देखील मातृभाषेंतून देण्याचा पहिला प्रयत्न हरिद्वारजवळील कांगडी येथील गुरुकुलानें केला. आपल्या देशांतील असा दुसरा प्रयत्न महिलाविद्यापीठानेंच केला. नंतर लवकरच दक्षिण हैद्राबादेंत उस्मानिया युनिव्हर्सिटींत उर्दू भाषा माध्यम करण्यांत आली. वास्तविक उर्दू ही तेथील राज्यकर्त्यांची भाषा. लोकांची भाषा नव्हे. त्यानंतर राजकीय चळवळींतून निघालेल्या पुण्यांतील टिळक युनिव्हर्सिटी व अहमदाबादचें गुजराथ विद्यापीठ ह्यांनीं मातृभाषेचें माध्यम सुरू केलें. महिलाविद्यापीठ सुरू झालें त्या वेळीं—म्हणजे १९१६ सालीं—सर्व सरकारमान्य युनिव्हर्सिट्यांतून व हायस्कुलांतूनसुद्धां इंग्रजी माध्यम सुरू होतें. आतां ही सुधारणा मान्यता पावली आहे. महिलाविद्यापीठानें केलेली दुसरी महत्त्वाची सुधारणा म्हणजे चित्रकला, गायनवादन व गृहशास्त्र—म्हणजे

प्रपंचशास्त्र, आरोग्यशास्त्र आणि बालसंगोपन–ह्यांचा अभ्यासक्रमांत परीक्षेचे विषय म्हणून अंतर्भाव करणें ही होय.

महाराष्ट्रांत स्त्रीशिक्षणाच्या प्रसाराचा खाजगी प्रयत्न पहिल्यानें हिंगण्याच्या संस्थेनें केला व त्याला महिलाविद्यापीठानें जोड दिली. भारतामध्यें स्त्रियांचें मुख्य कर्तव्य सुगृहिणी व सुमाता होणें ह्या दृष्टीनें शिक्षणाला निराळी दिशा लावण्याचा भारतामध्यें जोरदार प्रयत्न प्रथम महिलाविद्यापीठानें केला. मातृभाषेच्या द्वारें शिक्षण मिळत असल्यामुळें व शिक्षणांतील गणित विषयाचें महत्त्व कमी केल्यामुळें कितीतरी अधिक स्त्रियांना उच्च शिक्षण घेतां आलें. खाजगी रीतीनें अभ्यास करून परीक्षा देऊन पदवीधर होण्याची सोय महिलाविद्यापीठांत आहे. ४ कॉलेजें, शिवाय कॉलेजशिक्षणाचे खाजगी वर्ग आणि महिलाविद्यापीठाला जोडलेली २० हायस्कुलें, इतक्या संस्थांतून विद्यापीठाचा अभ्यासक्रम शिकविला जातो. आतांपर्यंत पदवीधर स्त्रिया एक हजार व मॅट्रिक्युलेशनच्या बरोबरीच्या प्रवेशपरीक्षा पास झालेल्या तीन हजार आहेत. बी. ए., एम्. ए. व बी. टी. ह्यांच्या बरोबरीच्या जी. ए. ( गृहीतागमा ) पी. ए. ( प्रदेयागमा ) व डी. टी. ह्या परीक्षांना सरकारी व निमसरकारी नोकरींत बरोबरीचें स्थान सरकारनें दिलें आहे. ह्या विद्यापीठाला सनदशीर मान्यता देण्याचा प्रश्नही विचारांत घेतला जात आहे.

विद्यापीठावर आलेलें गण्डांतर टळून सर्व स्थिरस्थावर झालें, त्या वेळीं मला ७८ वें वर्ष होतें. तेव्हां विद्यापीठाशीं जरूरीपुरता संबंध ठेवून मुख्य जबाबदारींतून मोकळें व्हावें, असें मीं ठरविलें. परंतु जबाबदारी तर फार नसावी तरी अगदींच रिकामें न बसतां मनाजोगें कांहीं काम काढावें असें योजून महाराष्ट्रग्रामप्राथमिकशिक्षणमंडळ ह्या नांवाची संस्था १९३६ च्या आरंभीं काढली. लहान लहान खेड्यांतून प्राथमिक शिक्षणाचा प्रसार व्हावा, हा या संस्थेचा हेतु होता. कोणत्याही प्रकारची शाळा नसलेल्या गांवांत खाजगी शाळा काढण्याचा कोणीं प्रयत्न केला, तर त्याला संस्था मदत करी. अशा रीतीच्या ४० शाळा हल्लीं ह्या संस्थेच्या देखरेखीखालीं चालल्या आहेत. संस्थेला द्रव्यबळ मिळविण्यासाठीं एखादा स्वयंसेवक बरोबर घेऊन शहराच्या निरनिराळ्या पेठांतून दररोज सकाळीं मी दोन तास हिंडत असें व आण्या अर्धा आण्यापासून मिळालेल्या मदतीचा स्वीकार करीत असें. कॉंग्रेस

सरकारचें राज्य सुरू झाल्याबरोबर संस्थेच्या शाळांना सरकारी मदत मिळूं लागली. आज संस्थेचा निधि सोळा सतरा हजार आहे.

" सोसायटी टु प्रमोट ह्यूमन इक्वालिटी " " मानवी समतेचें पुरस्कार-मंडळ "—ही संस्था लंडन येथें १९३४ सालीं स्थापन झाली. माझे परिचित एक इंग्रज गृहस्थ ह्या संस्थेच्या उत्पादकांपैकीं एक होते. ते मजकडे संस्थेचीं पत्रकें व त्रैमासिक पाठवीत असत. तीं मी नियमितपणें वाचीत असें. ग्रामशिक्षणसंस्थेचा जम चांगला बसला व भयंकर महागाईमुळें पुण्यांत घरोघर हिंडणें बंद करावें लागलें. तेव्हां ग्रामशिक्षणमंडळाचें काम मित्रांवर सोंपवून, ह्या लंडनच्या संस्थेच्या स्फूर्तीनें समतासंघ नांवाची संस्था वयाच्या ८६ व्या वर्षी १ जानेवारी १९४४ रोजीं सुरू केली. हल्लीं ह्या संस्थेचेंच काम मी करीत आहे. ह्या संस्थेच्या मुंबई व उपनगरें मिळून एक शाखा मुंबईस व महाविदर्भासाठीं दुसरी शाखा अकोला येथें, अशा दोन शाखा काम करीत आहेत. ' मानवी समता ' नांवाचें आठ पृष्ठांचें लहान मासिक संस्थेचें मुखपत्र म्हणून गेल्या जुलैपासून सुरू झालें आहे. सध्यां ह्या संस्थेच्या कामांतच माझें मन रमून जात आहे.

बाजारहाटासकट संसाराची सर्व जबाबदारी माझ्या पत्नीनें स्वीकारल्यामुळें मला सर्व वेळ सार्वजनिक कामांत घालवितां आला.

ज्या वेळीं जें जें कार्य हातीं असेल, त्या वेळीं सर्व लक्ष त्या कार्याकडे लावून तें चिकाटीनें करीत राहावें, असें मी करीत आलों आहें आणि माझे श्रम फुकट न जातां फलद्रूप झाले, हें पाहून मला समाधान वाटत आहे. माझे श्रम निमित्तमात्र आहेत हें मी जाणतों. यशाचीं कारणें माझ्या श्रमाव्यतिरिक्त आहेत. तीं म्हणजे परिस्थिति, इतरांची मदत वगैरे.

मी आशावादी ( optimist ) आहे. एकंदरींत समाजाची प्रगतीच होत आहे व स्त्रीशिक्षणाचे परिणाम चांगलेच झाले आहेत, असें मला वाटतें. तुरळक व्यक्तींचें अनिष्ट वर्तन हा स्त्रीशिक्षणाचा परिणाम म्हणतां येणार नाहीं. महाराष्ट्राला व भारताला चांगले दिवस येतील असें मला वाटतें.

मीं समाजकार्याला सर्वस्वीं वाहून घेतलें नाहीं. संसारी मनुष्य व संन्यासी म्हणजे त्यागी मनुष्य या दोघांच्या मधला मार्ग स्वीकारला. मीं संसार नेटका

केला नाहीं. कसाबसा करीत राहिलों व अजूनही करीत आहें. कुटुंबासाठीं घरदार किंवा द्रव्यसंचयही मीं केला नाहीं. डे. ए. सोसायटीची तीन हजारांची पॉलिसी होती तरी वेडावांकडा प्रसंग आला असतां उपयोगी पडावी म्हणून आणखी पांच हजारांची केली. पण ती लवकरच हिंगण्याच्या आश्रमाला स्थैर्य आणण्यासाठीं देऊन टाकली. अत्यंत जरूरीपुरतेंच वैयक्तिक व कौटुंबिक स्वार्थाकडे लक्ष देऊन बाकीचें सामर्थ्य व उर्वरित द्रव्य लोकहिताच्या कामीं खर्चणें, हा माझा स्वभाव बनून गेला आहे. आज माझ्याजवळ अडीअडचणीला उपयोगी पडावें म्हणून दोनशें रुपयेच आहेत व तेही एका मित्राला उमनवार दिले आहेत.

माझ्या ९० व्या वर्षी अत्यंत गूढ अशा प्रश्नांविषयीं माझ्या मनाचा कल कसा आहे, हें स्पष्टपणें नमूद करावें, असें मला वाटतें..आत्मा आणि परमेश्वर ह्या केवळ कल्पना असाव्यात. प्राणी जन्माला येतो, तो पूर्वजन्माच्या पापपुण्याचें गांठोडें बरोबर घेऊन येत नाहीं. तो आईबाप ह्यांच्या उभय कुलांतील पूर्वजांपासून आनुवंशिक संस्कार बरोबर घेऊन येतो. जन्म आणि मरण ह्यांच्यामधला काळ एवढेंच त्याचें आयुष्य. त्याला मागेंपुढें धागादोरा नाहीं. कार्यकारणभावावर आधारलेला सृष्टिक्रम घडाक्यानें चालू आहे. धरणीकंप, मोठाल्या आगबोटी समुद्रांत गडप करणारीं वादळें हे जसे जड सृष्टींतील प्रकार, तसेंच महायुद्धें, अणुबॉंब, बंगाल, बिहार, पंजाब, दिल्ली वगैरे ठिकाणचीं अंगावर शहारे उठविणारीं अमानुष कृत्यें हे अमूर्त सृष्टींतून मूर्त सृष्टींत स्वरूप धारण करणारे सृष्टिचमत्काराचेच आविष्कार आहेत. सृष्टीचे व्यवहार ज्या नियमांनीं चालले आहेत, त्यांत न्याय, नीति ह्यांना स्थळ नाहीं. मनुष्याचें शरीर ज्याप्रमाणें उत्क्रांत होत होत त्याला आजचें स्वरूप प्राप्त झालें, त्याप्रमाणें मन, बुद्धि, भावना ह्यांचें उत्क्रमण होत होत न्यायाच्या आणि नीतीच्या कल्पना बनल्या आहेत. १९१५ सालीं प्रसिद्ध झालेल्या आत्मवृत्तांत पुढील वाक्य आहे:—

" माझ्या कल्पनासृष्टींतील चित्र या जन्मींच जड सृष्टींत पाहण्याचें भाग्य जर मला लाभलें नाहीं, आणि पुनर्जन्माच्या कल्पनेंत जर सत्य असेल तर या वासनेनें युक्त अशा माझ्या जीवात्म्यानें पुनः नवशरीर धारण करून प्रारब्धकर्म संपूर्ण करावें व नंतर जड शरीराचा त्याग करून परमात्मस्वरूपीं लीन व्हावें एवढीच माझी इच्छा आहे. "

ह्या वाक्यांत ' पुनर्जन्माच्या कल्पनेंत जर सत्य असेल तर ' असे शब्द आहेत. ह्यावरून त्या वेळीं मन साशंक होतें, असें दिसतें. सृष्टीमध्यें जें घडून येत आहे, तें वज्रलेप आहे, ह्या आज घडणाऱ्या घटनांचा पुढें कोठें फेरविचार होऊन न्याय मिळणार आहे, ही केवळ कल्पना दिसते.

हे माझे विचार पोरकट आहेत, असेच पुष्कळ थोर, विचारी पुरुषांना वाटेल. तसें म्हटलें तर मी पोरच आहें. माझें ज्ञान तें काय आणि माझा अनुभव तो किती ! पण मला वाटतें कीं, आपली सदसद्विवेकबुद्धि व मनावर घडलेले जुनेनवे संस्कार ह्यांमुळें जें आपणांस पटेल, तें आचरण चुकीचें असलें व त्यांचे परिणाम वाईट झाले तरी पुरवलें. पण विचार न करतां रुळलेल्या मार्गानें जाणाऱ्यांचें आचरण बरोबर असलें तरी तें घातक. समाजांत जिवंतपणा उत्पन्न होण्यास समाजाला न पटणाऱ्या गोष्टींचें विचारपूर्वक आचरण करणारीं माणसेंच पाहिजेत.

असे माझे विचार असले तरी विचारपूर्वक आपलीं मतें बनवून त्याप्रमाणें श्रद्धायुक्त अंतःकरणानें आचरणाऱ्या व्यक्ति व त्यांनीं चालविलेल्या संस्था, ह्यांबद्दल मला आदर वाटतो. मग त्या व्यक्ती व संस्था जुन्या मतांचा पुरस्कार करणाऱ्या असोत किंवा नव्या मतांचें प्रतिपादन करणाऱ्या असोत. बंगाल्यांतील ब्राह्मसमाज, आपल्या प्रांतांतील प्रार्थनासमाज, आर्यसमाज, पंजाबांतील देवसमाज, थिऑसाफी, वेदशास्त्रोत्तेजक मंडळी वगैरे संस्था व त्या चालविणाऱ्या व्यक्ती यांबद्दल मला आदर आहे. माझें म्हणणें एवढेंच कीं, विचार करून प्रामाणिकपणें आपलीं मतें व श्रद्धा बनवून तदनुरूप आचरण व्हावें. मनुष्याचीं मतें काय आहेत, तो बोलतो काय व लिहितो काय ह्यांवर मनुष्याची किंमत करतां कामा नये. मनुष्य करतो काय आणि वागतो कसा, ह्यांवर त्याची योग्यता ठरविली पाहिजे.

' श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः । ' ' श्रद्धावान् लभते मोक्षम् '—हीं वचनें अर्थपूर्ण आहेत. पूर्वसंस्कारांमुळें श्रद्धा जशी रूढ आचारविचारांवर बसूं शकते, त्याप्रमाणें नव्या विचारांचा पगडा मनावर बसल्यानें नव्या आचारविचारांवरही ती बसूं शकते. ख्रिस्ताचें चरित्र व ख्रिस्ती मिशनऱ्यांचे निःस्वार्थी प्रयत्न पाहून ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केलेले व त्यांत

रमलेले कित्येक विद्वान् पहिल्या अमदानींत होऊन गेले. श्रद्धायुक्त आचरणानें आपलें आयुष्य घालविणाऱ्या माणसाला संसारांतील दुःखें व अडचणी भेडसावीत नाहींत. त्याला मनाची शांति लाभते. मनाची शांति हेंच जीवनसर्वस्व, हाच मोक्ष.

कळत, न कळत, प्रत्यक्ष, अप्रत्यक्ष जे संस्कार मनावर घडत गेले, त्यांचा परिपाक म्हणजे माझीं आजचीं मतें.

सरतेशेवटीं मला एवढेंच सांगावेसें वाटतें कीं, माझ्या ह्या विचारांनीं माझ्या मनाला आजपर्यंत तरी पूर्ण शांति लाभली आहे. पुढचें कोणीं सांगावें ?



विवेकानंद ( १८६२-१९०२ )

## ९. शिवोऽहम्

जगाची नीतिमत्ता सुधारली पाहिजे ही ओरडही आतां सुरू झाली आहे. या नीतिशास्त्राचें मूलही आमच्या ग्रंथांतच आहे. याकरितां या शास्त्राची जगांत सांप्रत गरज आहे. त्यांना जें काय पाहिजे आहे, तें त्यांस हिंदुस्थानांतूनच प्राप्त होईल. या तत्त्वांची जरूर पाश्चात्यांस असेल तर तीं तत्त्वें हजारपट अधिक प्रमाणांवर आज आपणांस हवीं आहेत. उपनिषद्ग्रंथ कितीही श्रेष्ठ असले आणि आपला जन्म अति श्रेष्ठ अशा महर्षींच्या कुलांत झाला असला तथापि परकीयांच्या तुलनेनें आज आपण अत्यंत दुर्बळ झालों आहों ही गोष्ट प्रांजलपणें आपण कबूल केली पाहिजे. प्रथम आपण शरीरानें दुबळे झालों आहों. आपणांस जीं अनेक दुःखें आज भोगावीं लागत आहेत त्यांतील निदान तिसरा हिस्सा केवळ शारीरिक दुर्बलतेचें फळ आहे. आपण अत्यंत आळशी झालों आहों; काम करण्याचा हुरूप आपणास नाहीं; समुच्चयानें काम करणें आपणास अशक्य झालें आहे; परस्परांबद्दल प्रेमभाव आपल्या ठिकाणीं नाहीं; आपण अत्यंत आपलपोटे झालो आहों; आपणांपैकीं केवळ तीनच माणसें एकत्र जमलीं तरी तात्बडतोब या त्रयींत द्वेषाचा प्रादुर्भाव दिसून येतो. तात्बडतोब एकमेकांचा मत्सर तीं करूं लागतात. रानांत इतस्ततः पळत असलेल्या खिल्लारासारखी आपली स्थिति आहे. अत्यंत आपलपोटेपणामुळें आपण परस्परांच्या छातीवर बसण्यांत आज कित्येक शतकें घालविलीं आहेत. गंध आडवें कोणीं लावावें आणि उभें कोणीं लावावें असल्या 'जाड्या' विषयांवर वाद करण्यांत कित्येक शतकांचा अपव्यय आपण केला आहे. अमक्याच्या दृष्टीनें आपलें अन्न विटाळतें कीं नाहीं अशासारख्या महत्त्वाच्या विषयावर गाढवाच्या ओझ्याचे ग्रंथ आपण लिहिले आहेत. गेलीं कांहीं शतकें हाच उद्योग आपण केला आहे. असल्या जाड्या शोधांत ज्यांचे मेंदू कित्येक शतकें गुंतून गेले त्यांजपासून एखाद्या महत्त्वाच्या गोष्टीची अपेक्षा ती काय करावी ! या स्थितीबद्दल आपणांस केव्हांच शरम वाटत नाहीं काय ! केव्हां केव्हां आपणांस शरम वाटते. पण या मगराची मिठी मात्र सुटत नाहीं.

× × ×

पुष्कळ गोष्टी कराव्या अशी इच्छा आपणास होते; पण त्यांतील एकही आपल्या हातून प्रत्यक्ष घडत नाहीं. आपली स्थिति पोपटासारखी झाली आहे. पोपटासारखी बडबड आणि कृतीच्या नांवानें शून्य असे आपण बनलों आहों. या स्थितीचें कारण काय ? शारीरिक दुर्बलता हेंच कारण आहे. याकरितां शरीर सबळ करण्याकडे आमच्या तरुणांनीं प्रथम लक्ष दिलें पाहिजे. हें साध्य झालें तर धर्ममार्गही मग सुखानें आक्रमण करतां येईल. '**शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम्**' हें वचन तरुणांनीं कधींही विसरूं नये. माझ्या तरुण मित्रांनो, माझा तुम्हांस एकच उपदेश आहे. तो हाच कीं, शारीरिक बळ प्रथम मिळवा. गीतापाठापेक्षां फूटबॉलचा खेळच तुम्हांस स्वर्गाकडे अधिक लौकर घेऊन जाईल. माझें म्हणणें पुष्कळांस आश्चर्याचें वाटेल व तें त्यांस कदाचित् रुचणारही नाहीं; पण तसें झालें तरी पुनःपुन्हा तेंच सांगणें मला भाग आहे. तुमच्या ठिकाणीं असलेलें माझें प्रेम मला गप्प बसूं देत नाहीं. दोष कोठें आहे हें अनुभवानें मला समजलें आहे. तुमच्या शरीरांतील स्नायू अधिक बळकट झाले तरच गीतेचें खरें रहस्य तुमच्या ध्यानीं येईल. तुमच्या शरीरांत रक्ताचा भरपूर सांठा झाला तरच भगवान् श्रीकृष्णाच्या सामर्थ्याचें रहस्य तुम्हांस अधिक चांगलें समजेल. पौरुष तुमच्या रोमरोमांत खेळूं लागलें तरच उपनिषद्ग्रंथ आणि आत्म्याची उज्ज्वलता यांचें खरें स्वरूप तुमच्या ध्यानीं येईल. आपल्या सांप्रतच्या स्थितींत उपनिषद्ग्रंथांचा हाच उपयोग आपणांस करून घ्यावयाचा आहे.

मी अद्वैतमताचा प्रचार करतों याबद्दल कित्येकांस माझा राग आला आहे. वास्तविक माझा उद्देश द्वैताचा, अद्वैताचा अथवा दुसऱ्या कोणत्याही विशिष्ट मताचा प्रसार करण्याचा नाहीं. आत्मा सर्वशक्तिमान आहे, तो परमपवित्र आहे आणि तो सदोदित परिपूर्ण आहे याच विशिष्ट मताचा प्रसार होणें आपणास सध्यां इष्ट आहे. मला एखादें मूल असतें तर त्याच्या जन्मदिवसापासून 'तूं अत्यंत पवित्र आहेस' असा घोष त्याच्या कानांशीं मीं केला असता. पुराणांतील मदालसा राणीची कथा आपण वाचली असेलच. मुलाला स्व–हस्तें पाळण्यांत निजवून पाळणा लोटतां लोटतां ती तोंडानें, 'तूं पवित्र आहेस, निष्कलंक आहेस, पातकरहित आहेस, सर्वशक्तिमान् आहेस, सर्वश्रेष्ठ आहेस,' अशा अर्थाचें गाणें म्हणत असे. या कथेंत फार

मोठें तात्पर्य आहे. आपण मोठे आहों, अशी भावना आपल्या अंतःकरणांत आपण सदोदित वागविली तर आपण खरोखरच मोठे होऊं. युरोपांत मीं प्रवास केला त्यांत जो कांहीं अनुभव मला आला त्याचा निष्कर्ष हाच. 'आपण पातकी आहों' असें तोंडानें म्हणावयास तिकडील धर्मोपदेशक, लोकांस शिकवीत असतात. खरोखर सर्व युरोपीयन लोक आपण खरेच पातकी आहों असें मानीत असते तर त्यांची स्थिति मध्य आफ्रिकेंतील शिद्दयांच्या स्थितीहून अधिक योग्यतेची खास नसती. आपण पातकी आहों, असें ते मनापासून समजत नाहींत हा परमेश्वराचा मोठा आशीर्वादच होय. उलट आपण जगाचे धनी होण्याकरितांच जन्मलों आहों अशी त्यांची मनापासून भावना असते. आपण मोठे आहोंत आणि आपण वाटेल तें करूं शकूं, अशी त्यांची पक्की आत्मश्रद्धा असते. सूर्यावर किंवा चंद्रावर जाण्याची वेळ आली तरी तेंही आपण करूं शकूं असें त्यांस वाटतें. त्यांच्या या आत्मश्रद्धेच्या पक्कया भावनेमुळेंच ते आज खरोखर मोठे झाले आहेत. धर्मोपदेशकावर विश्वास ठेवून आपण खरोखरच पातकी आहों, अशी त्यांची श्रद्धा झाली असती तर त्यांना आजचें मोठेंपण कधींही प्राप्त झालें नसतें. धर्मोपदेशक कांहींही बडबडत असले आणि पाश्चात्य देशांत धर्मभोळेपणा कितीही असला तरी त्यांचें अंतस्थ चैतन्य अद्यापि जिवंत असून स्वतःच्या जिवंतपणाची साक्षही तें पटवितें.

आपली आत्मश्रद्धा नष्ट झाली आहे. एखाद्या इंग्रज पुरुषांत अथवा स्त्रींत जी आत्मश्रद्धा आज आढळून येते तिचा हजारावा हिस्साही आपल्या ठिकाणीं नाहीं. माझें हें बोलणें तुम्हांस कडू लागेल; पण वस्तुस्थिति आहे तशी स्पष्ट सांगण्यावांचून दुसरा उपाय काय ? एखाद्या इंग्रज गृहस्थाला अथवा स्त्रीला आमचे धर्मसिद्धान्त पटले तर त्याच्या मागें लागून ते लोक कसे वेडे होतात व आपण शास्त्यांच्या वर्गांतले आहोंत हा मोठेपणा बाजूस ठेवून आमच्या हिंदुस्थानांतच त्या सिद्धान्ताचा प्रसार करण्यास ते कशी मेहनत घेतात तें पहा. त्यांच्या देशबांधवांनीं त्यांची कितीही थट्टा केली तरी त्यांच्या या उद्योगास खळ पडत नाहीं. तुमच्यांपैकीं ही गोष्ट कितीसे करूं शकतील ? वास्तविक पाहतां ही गोष्ट तुमच्या हातून कां होऊं नये ? त्यांच्याइतकें ज्ञान तुम्हांस नाहीं काय ? वास्तविक तुमचें ज्ञान अधिक आहे. पण तुमचें अधिक

ज्ञानच तुम्हांस सांप्रत मारक झालें आहे. तुमच्या मार्गांत अडचण म्हटली तर हीच. तुमचें रक्त पाण्याहून पातळ होऊन गेलें आहे. तुमचा मेंदू गरम आणि तुमचें शरीर अशक्त झालें आहे. देहाच्या या अवस्थेंत तुमच्या हातून काय होणार ? ही स्थिति आतां बदलली पाहिजे. देहदुर्बलता हीच या सर्व स्थितीचें कारण आहे. यावांचून दुसरें कोणतेंही कारण नाहीं. समाजसुधारणा आणि दुसऱ्या कित्येक प्रकारच्या सुधारणा यांजबद्दल गेलें सारें शतक तुम्ही बडबड करीत आहां; पण या बडबडीचा उपयोग प्रत्यक्ष आचरणाकडे करावयाची वेळ आली म्हणजे दिवाभीतांसारखीं तुम्ही आपलीं तोंडें लपवितां. त्रिखंड शोधलें तरीही तुमचा पत्ता लागत नाहीं. तुमच्या या वर्तणुकीचा साऱ्या जगास आतां अगदीं वीट येऊन गेला आहे. सुधारणा हा शब्द सध्यां थट्टेचा विषय होऊन बसला आहे. अशा स्थितीचें कारण काय ? तें कारण तुम्हांस अज्ञात आहे असें नाहीं. तें तुमच्या पक्क्या ओळखीचें झालें आहे. अशक्तता, दौर्बल्य हेंच कारण. तुम्ही जसे शरीरानें दुबळे तसेच मनानेंही पंगू आहां. आत्मश्रद्धा तर थोडीशीसुद्धां तुमच्यापाशीं नाहीं. जातिभेद, परकीयांचा अंमल आणि तुमच्याच लोकांनीं तुम्हांवर गाजविलेली सत्ता या गोष्टींच्या हजारों वर्षांच्या प्रचंड आघाताखालीं तुमच्या सर्व सामर्थ्याचा चुराडा उडून गेला आहे. माझ्या प्रियबंधूंनो, तुमचीं सर्व हाडें मोडून गेलीं आहेत; आणि धुळींतील किड्यांच्या योग्यतेस तुम्ही सांप्रत पोहोंचलां आहां. आतां हें शक्तिदान तुम्हांला कोण करील ? 'सामर्थ्य, सामर्थ्य' हा एकच जप तुम्हांस आतां कोण शिकवील ? आपणांस या एकाच वस्तूची जरूर आहे. या मार्गांतील पहिली पायरी म्हटली म्हणजे उपनिषद्ग्रंथांचा आधार घेऊन 'शिवोऽहं शिवोऽहं' असें म्हणावयास शिकावयाचें हीच होय.

"नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः ।
न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः ॥"

असा आत्मा मी आहें. मी सर्वव्यापी, सर्वसाक्षी व सर्वशक्तिमान् आहें. या सूत्राचें नित्य पठण करणें यांतच आपला तरणोपाय आहे. 'मी दुर्बल आहें' ही कल्पना आपल्या चित्तास शिवूंही देऊं नका. मी वाटेल तें करूं शकेन, असें सदोदित आपल्या चित्तास शिकवा. वस्तुस्थिति अशीच आहे.

आपणां सर्वांचे आत्मे खरोखर असेच उज्ज्वल आहेत. आपली तशी श्रद्धा नाहीं यामुळेंच सध्यांच्या दुःखगर्तेंत आपण बुचकळ्या खात आहोंत. नचिकेताप्रमाणें उत्तम श्रद्धा प्रथम मिळवा. तशी श्रेष्ठ आत्मश्रद्धा तुमच्या सर्वांच्या ठिकाणीं उत्पन्न होवो हीच मागणी मी परमेश्वरापाशीं मागतों. अशी आत्मश्रद्धा तुम्हांला प्राप्त झाली तर सारें जग हालवून सोडण्याजोगें प्रचंड सामर्थ्यही तुमच्या ठिकाणीं येईल. तुम्ही प्रत्यक्ष परमेश्वरच बनून जाल. तसें तुम्ही व्हावें एवढीच माझी इच्छा आहे. अशा प्रकारची आत्मश्रद्धा आणि अशा प्रकारचें श्रेष्ठ प्रतीचें बल हीं तुम्हांस उपनिषद्ग्रंथांतूनच प्राप्त होतील.

उपनिषद्ग्रंथ हे केवळ संन्याशाकरितां आहेत काय? ते संन्याशाकरितां आहेत असा समज एके काळीं होता. पूर्वीं संन्याशीच या ग्रंथांचा अभ्यास करीत आणि अभ्यासानंतर ते अरण्याचा आश्रय करीत. श्रीशंकराचार्य थोडे अधिक कनवाळू होते. उपनिषद्ग्रंथांचा अभ्यास गृहस्थांनीं करणें हें वाईट नसून त्यापासून त्यांचाही फायदाच होईल असें आचार्यांनीं सांगितलें. तथापि उपनिषद्ग्रंथ संन्याशांच्याच उपयोगाचे आहेत व त्यांत अरण्यवासाचाच मार्ग सांगितला आहे ही कल्पना आपला पिच्छा अद्यापीही सोडीत नाहीं. ज्यानें वेदग्रंथांस चालन दिलें त्याच भगवान् श्रीकृष्णांनीं गीतेच्या द्वारें श्रुतीचा खरा निष्कर्ष सांगितला आहे हें आपण पक्कें ध्यानांत धरा. श्रुतीचें खरें रहस्य जर कोठें पहावयाचें असेल तर तें भगवद्गीतेंत मात्र आढळून येईल. सर्व धंद्यांच्या आणि सर्व आश्रमांच्या लोकांसाठीं भगवद्गीता अवतीर्ण झाली आहे. श्रुतिरहस्यें अरण्यांतून आतां आपल्या घरांत आणलीं पाहिजेत. त्यांना त्यांच्या गुहांतून बाहेर काढून गरिबांच्या झोपडींत आणि कोळ्यांच्या घरीं व विद्यार्थ्यांच्या खोलींत त्यांचा प्रवेश करून दिला पाहिजे. कोणी कोणताही धंदा करीत असो अथवा कसल्याही स्थितींत राहात असो, भगवद्गीतेनें सर्वांस सारखाच उपदेश केला आहे. उपनिषद्ग्रंथांचीं रहस्यें कोळ्यामाळ्यांस कशीं उपयोगी पडतील याचा मार्ग भगवद्गीतेनें दाखविला आहे. धर्माचा विस्तार अनंत आहे. धर्म अनंतरूप आहे. धर्माच्या कक्षेबाहेर कोणाचाही वास नाहीं, धर्मप्रसारार्थ जो थोडा फार उद्योग तुम्ही कराल तो तुम्हांस अवश्य फलद्रूप होईल. एखादीच चांगली

गोष्ट तुम्ही मनापासून केली तर तिजपासूनही कल्पनेबाहेर फळ येतें. याकरितां प्रत्येकानें आपल्या हातून होईल तेवढेंच कार्य करण्यास मागेंपुढें पाहूं नये. गीतेचें रहस्य एखाद्या कोळयास सांगितलें तर तो अधिक चांगल्या प्रकारचा कोळी होईल. तें एखाद्या विद्यार्थ्यास समजलें तर तो अधिक चांगला विद्यार्थी होईल. हें तत्त्व सर्वत्र सारखेंच लागूं पडतें. या मार्गानें खऱ्या जाती निर्माण होऊं लागतील.

समाजांत निरनिराळया जाती असाव्या ही गोष्ट केवळ स्वाभाविकच आहे. त्यांतून फक्त विशिष्ट हक्क मात्र नष्ट होतील. जातिभेद उत्पन्न होणें हें स्वाभाविक आहे. समाजांत एखाद्याला एक गोष्ट साध्य होते तर दुसऱ्याला दुसरी साधते. एकच गोष्ट सर्वांस सारखीच साध्य होत नाहीं. समाजाचें अनुशासन करण्याची कला तुम्हांस साध्य झाली तर फाटके जोडे शिवण्याची कला मला साध्य होईल. पण असें असलें तरी एकाहून दुसऱ्यानें अधिक श्रेष्ठ म्हणण्याचें कारण नाहीं. कारण, परस्परांची कला परस्परांस सारखीच दुःसाध्य आहे. मला जसें अनुशासनाचें कार्य साधणार नाहीं त्याचप्रमाणें जोडे शिवण्याची माझी कला तुम्हांस येणार नाहीं. मी जोडे शिवूं शकतों तर तुम्ही श्रुतिग्रंथ वाचूं शकतां. पण एवढ्यामुळें तुम्ही माझ्या मस्तकावर पाय द्यावे असें होत नाहीं. असे विशिष्ट हक्क नष्ट होणें इष्टच आहे. तथापि जातिभेद असणेंही इष्ट आहे. संसारमार्ग सुकर होण्याचा हाच स्वाभाविक रस्ता आहे. जातिभेद हे सदोदित राहणारच. ते तुम्हांस कधींही नष्ट करतां येणार नाहींत. ज्या ज्या ठिकाणीं मनुष्यें समाज करून राहतील त्या त्या ठिकाणीं जातिभेद असावयाचाच. तथापि असें असलें तरी विशिष्ट जातींस विशिष्ट हक्क देण्याचें कारण नाहीं. हें हक्कांचें खूळ साफ मोडून टाकिलें पाहिजे. एखादा मनुष्य कोळयाचा धंदा करीत असला आणि दुसरा वेदान्ततत्त्वज्ञाता असला तरी दोघांतही एकाच परमेश्वराचा वास आहे. आपणांस सध्यां जर कशाची जरूर असेल तर ती याच मताच्या प्रसाराची होय.

समाजांत सर्वांस सारखेच हक्क मिळाले पाहिजेत. सर्वांच्या ठिकाणचें चैतन्य एकाच स्वरूपाचें आहे. ही गोष्ट सर्वांस शिकविली पाहिजे. हें साध्य झालें म्हणजे जो तो आपापल्यापरी मुक्तीचा मार्ग आपणच शोधून काढतो. स्वातंत्र्य

हा सर्व उन्नतीचा मूळ पाया होय. ' अमक्या मनुष्याला मी मुक्तीचा मार्ग दाखवीन ' असें तुम्हांपैकीं कोणी एखादा म्हणत असेल तर तें त्यांचें म्हणणें सर्वथा चुकीचें आहे. विधवा स्त्रियांच्या स्थितीबद्दल आणि एकंदरीनें सर्व स्त्रियांच्या स्थितीबद्दल माझें मत काय आहे असा प्रश्न मला वारंवार विचारण्यांत येत असतो. या प्रश्नास मी आतां एकदांच उत्तर देऊन टाकतो. विधवांबद्दल माझें मत तुम्ही मला विचारतां तें मी विधवा आहे म्हणून काय? तसेंच स्त्रियांच्या स्थितीबद्दलही मला तुम्हीं माझें मत काय म्हणून विचारावें? मी स्वतः स्त्री आहे काय? स्त्रियांच्या प्रश्नाबद्दल चर्चा करणारे तुम्ही कोण? सर्व स्त्रीजातीची वासलात तुम्ही लावूं म्हणतां पण तसें करण्यास त्यांची सर्व मुखत्यारी तुम्हांकडे आली आहे काय? त्यांचें बरें अथवा वाईट करण्यास तुमच्या अंगीं परमेश्वराचें सामर्थ्य आलें आहे काय? स्त्रिया आपली उन्नति स्वतःच करून घेतील. त्या भानगडींत तुम्हीं पडूं नये हेंच चांगलें. मी अमक्याचें बरें करूं शकेन अथवा वाईट करूं शकेन असें वाटणें हा तुमचा निव्वळ जुलूम आहे. अशी सुलतानी सत्ता तुमच्या हातीं कोणींही दिलेली नाहीं. सर्वांची काळजी परमेश्वरास सारखीच आहे. आपण सर्वज्ञ आहों, असा समज करून घेण्यास तुम्हांस काय अधिकार आहे? परमेश्वराच्या हातांतील सत्ता अशा रीतीनें काढून घेण्यास तुमची छाती तरी कशी होते? असें करणारा मनुष्य ईश्वरद्रोहीच समजला पाहिजे. प्रत्येक आत्मा हा परमेश्वराचाच आत्मा आहे ही गोष्ट तुम्हांस ठाऊक नाहीं काय? तुम्हीं आपल्या स्वतःच्या कर्मापुरताच विचार करावा; व स्वतःपुरताच मुक्तीचा मार्ग चोखाळावा हें योग्य आहे. तुमच्या राष्ट्रानें तुमची थोरवी गाइली, तुमच्या समाजानें तुमची मोठी स्तुति केली आणि मूर्खांनीं तुम्हांस धन्यवाद दिले तरी तुमच्या मुक्तीचा मार्ग तुम्हीं स्वतःच चोखाळला पाहिजे. परमेश्वर डोळे मिटून बसलेला नाहीं, तो सदा जागृत आहे; आणि प्रत्येकाला त्याच्या त्याच्या कर्मांच्या फळाची वांटणी तो केव्हां ना केव्हां करीत असतोच.

या जगांतील प्रत्येक पुरुष आणि प्रत्येक स्त्री ही ईश्वररूप आहेत हें नित्य ध्यानांत धरीत जा. त्यांना मदत करण्याचें सामर्थ्य तुम्हांस नाहीं. फक्त त्यांची नोकरी बजाविण्याचा अधिकार मात्र तुम्हांस आहे. परमेश्वराच्या मुलांची नोकरी बजाविणें हेंच तुमचें कर्तव्य आहे. परमेश्वराची नोकरी बजाविणें हा

एक मोठा हक्क आहे. तो हक्क तुम्हांस प्राप्त झाला असेल तर त्याची अंमलबजावणी तुम्ही करा. परमेश्वराच्या एखाद्या लेंकराला मदत करण्याची पात्रता त्यानें तुमच्या अंगीं ठेविली असेल तर ती त्याची तुम्हांवर मोठीच कृपा होय. आपण सर्वज्ञ आहों असली वेडी घमेंड कधींही बाळगू नका. कोणास मदत करण्याची पात्रता तुमच्या अंगीं असेल, तर इतरांच्या अंगीं ती पात्रता नाहीं म्हणून तुम्ही परमेश्वराचे उपकार माना. आणि या हक्काची अंमलबजावणी करितांना आपण त्याचें पूजन मात्र करीत आहों अशी भावना धरा. एखादा अत्यंत दारिद्री मनुष्यही परमेश्वर आहे असेंच समजून केवळ माझ्या स्वतःच्या मुक्तीसाठींच मी मदतीच्या रूपानें त्याचें पूजन करीन. जगांतील गरीब आणि दुःखी कष्टी लोक हे आपल्या मुक्तीसाठींच निर्माण झालेले आहेत. त्यांची नोकरी आपण बजाविली तर परमेश्वराच्या पूजनाचें श्रेय आपणांस प्राप्त होईल. रोगांनीं पिडलेले, वेडे झालेले, महारोगी आणि पापी लोक हे याकरितांच निर्माण झालेले आहेत. या सर्वांच्या रूपानें दृश्य होणाऱ्या परमेश्वराची नोकरी बजावतां येणें हा आपल्या जीवितांतील एक मोठा हक्क होय. माझे हे शब्द आपणांस धाष्टर्याचे वाटत असतील पण मी आपणांस त्रिवार बजावून सांगतों कीं, यांची नोकरी बजावितां येणें हा विशेष हक्क आपणांस मोठ्या भाग्यानें प्राप्त झाला आहे. इतर लोकांवर सुलतानी अंमल गाजवून तुम्ही त्यांचें बरें करूं शकाल असें तुम्हांस वाटत असेल तर तो तुमचा भ्रम होय. हा भ्रम तुम्ही आतां टाकून द्या. एखाद्या वाढत्या झाडाला खत वगैरे घालून त्याच्या वाढीला ज्याप्रमाणें आपणांस हातभर लावतां येतो त्याचप्रमाणें मनुष्यांच्या वाढीलाही अशाच रीतीनें आपणांस हातभार लावितां येईल. एखादा वृक्ष ज्याप्रमाणें भूमींतून, पाण्यांतून आणि हवेंतून स्वतःच्या पोषणास लागणारीं द्रव्यें आपणच शोधून घेतो, त्याचप्रमाणें प्रत्येक मनुष्यही स्वतःच्या वाढीस आवश्यक असा मार्ग आपणच शोधून काढतो.

सर्व जग प्रकाशमय करून सोडा. जगाला प्रकाशाची जरूर आहे. जगांतील प्रत्येक व्यक्तीला प्रकाश प्राप्त करून द्या. प्रत्येक व्यक्ति परमेश्वराला पोहोंचेपर्यंत आपलें प्रकाशदानाचें कार्य चालू राहिलें पाहिजे. प्रकाशाची जरूर ज्याप्रमाणे गरिबाला आहे त्याचप्रमाणें ती श्रीमंतालाही आहे. किंबहुना श्रीमंताला अधिक प्रकाशाची जरूर आहे. अज्ञ जनांना ज्याप्रमाणें प्रकाशाची

जरूर आहे त्याचप्रमाणें सुशिक्षितांनाही ती आहे. किंबहुना हल्लींच्या सुशिक्षितांत दांभिकपणा भयंकर प्रमाणावर वाढला असल्यामुळें त्यांना तर अधिकच प्रकाश पाहिजे. जग प्रकाशमय करून सोडणें इतकेंच तुमचें कर्तव्य आहे. तेवढें तुम्हीं केलें म्हणजे त्याचा परिणाम काय होतो हें पाहण्याचें काम तुमचें नाहीं. त्याचें फळ परमेश्वराकडे सोंपवा.

'**कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन**' असें भगवान् श्रीकृष्णांनीं स्वतःच तुम्हांस सांगितलें आहे. सदोदित कर्तव्य-रत राहून त्याचीं फळें न घेणें हेंच तुम्हांस योग्य आहे.

आमच्या पूर्वजांच्या चित्तांत असल्या उज्ज्वल कल्पना ज्यानें उत्पन्न करून दिल्या तोच आमचा मदतगार होवो, व त्याच्या आज्ञांचें अनुशासन करण्यास आम्हांस सामर्थ्य देवो अशी मी त्याची प्रार्थना करतों.



## १०. हिंदुस्थानचा भविष्यकाळ

आमच्या जुन्या अद्वैत सिद्धान्ताप्रमाणें सर्व विश्व एका प्रकारच्या भारलेल्या स्थितींत आहे. स्वतःची इच्छा हीच शक्ति आहे. प्रत्येकाचें सामर्थ्य त्याच्या इच्छाशक्तीवर अवलंबून आहे. ज्याची इच्छाशक्ति अत्यंत प्रबल असेल, असा मनुष्य स्वतःभोंवतीं तेजोवलय उत्पन्न करीत असतो; आणि त्याच्या भोंवतीं जे कोणी असतील, त्यांस तो स्वतःच्या इच्छे-प्रमाणें वागावयास लावतो. असे विशाल इच्छाशक्तीचे पुरुष मधून मधून निर्माण होत असतात. अशा प्रकारचे पुरुष निर्माण झाले म्हणजे स्वतःतील विचारांची प्रेरणा ते सामान्य जनांत करतात, आणि त्या विचारांच्या चालने-मुळें सामान्य जनही सामर्थ्यवान् होतात. सामान्य जनांच्या संघटित समूहांत जें सामर्थ्य नेहमीं दिसून येतें तें कां ? संघटना ही केवळ लौकिक आहे असें समजूं नका. संघटनेंत सामान्य शक्तीहून अधिक प्रतीच्या शक्तींचा वास असतो. चार कोट इंग्रज लोक तीस कोट हिंदवासीयांवर अंमल कां करितात,

याचें रहस्य ध्यानीं आणा. या देखाव्याचें अंतर्गत रहस्य काय आहे, याचा विचार करा. हे चार कोट लोक संघटनेनें आपल्या सर्व इच्छाशक्ति एकवटून ठेवीत आहेत. या समीकरणांतून अपरिमित शक्ति बाहेर पडत असते, आणि तुम्हां तीस कोट लोकांत ही सर्व शक्ति आपापल्यापरी वेगवेगळ्या मार्गानें जात असते. याकरितां भावी हिंदुस्थानास उन्नतावस्था प्राप्त व्हावी अशी तुमची इच्छा असेल तर या अनेक इच्छाशक्तींचें समीकरण झालें पाहिजे; या सर्व इच्छाशक्ति एकवटल्या पाहिजेत. या सर्व इच्छाशक्तींनीं परस्परांस पोषक झालें पाहिजे. अथर्ववेद संहितेंतील एक सुंदर ऋचा मला आठवते. ती अशी:—" तुम्ही सर्व एकचित्ताचे व्हा. तुम्हां सर्वांच्या हृदयांत एकाच प्रकारचे विचार असूं द्या. कारण पूर्वकालीं सर्व देव एकाच विचारानें वागत, यामुळें हविर्भाग मिळविण्याची योग्यता त्यांस प्राप्त झाली. सर्व देव एकचित्ताचे आहेत, म्हणूनच मनुष्यांनीं त्यांची पूजा करावी अशी योग्यता त्यांस प्राप्त झाली." आपल्या मनुष्यसमाजासही हीच गोष्ट लागू आहे. सर्वांनीं एका दिलानें असणें हेंच समाजाच्या सामर्थ्याचें रहस्य आहे; आणि ' हा द्राविड आणि हा आर्य व हा ब्राह्मण व तो शूद्र ' असल्या प्रकारचीं शुष्क भांडणें जोंपर्यंत तुम्ही भांडत राहाल, तोंपर्यंत तुम्हांस सामर्थ्य प्राप्त होणार नाहीं. ज्या सामर्थ्यांतून आणि इच्छाशक्तींतून भावी हिंदुस्थान निर्माण होणार त्या इच्छाशक्तीची प्राप्ति तुम्हांस अशा रीतीनें होणार नाहीं. भावी हिंदुस्थानचें दैव तुमच्या हातीं आहे, ही गोष्ट पक्की ध्यानांत धरा. इच्छाशक्तींची संघटना आणि अनेक इच्छाशक्तींचें समीकरण हेंच भावी उदयाचें रहस्य आहे. चिनांत कोट्यवधि मनुष्यांची वस्ती आहे, पण त्यांतील प्रत्येकाची विचारशक्ति वेगवेगळ्या मार्गानें जात आहे. उलटपक्षीं मूठभर जपानी लोकांच्या इच्छाशक्तीचें एकीकरण झालें आहे. या दोन वेगवेगळ्या प्रकारांचें फळ काय आहे, हें आज आपण प्रत्यक्ष पाहात आहोंतच. साऱ्या जगाच्या इतिहासांत हाच नियम अबाधित चालला असल्याचें तुम्हांस आढळून येईल. राष्ट्र लहान पण सर्व एक विचारांचें असलें म्हणजे विस्कळित अशा एखाद्या मोठ्या राष्ट्रावर तें अम्मल चालवीत असतें. असें असणें हें एका अर्थी रास्तच आहे. राष्ट्र लहान असलें म्हणजे सर्व इच्छाशक्ति एका क्षेत्रांत आणण्यास सोपें जातें. व यामुळें त्याच्या उन्नतीचा मार्ग मोकळा होतो; आणि तेंच राष्ट्र फार मोठें

असलें म्हणजे त्याची संघटना करणें जड जातें. मोठ्या राष्ट्रांतील समाज एखाद्या अव्यवस्थित कळपाप्रमाणें वागत असल्यामुळें त्यांत संघटना उत्पन्न होत नाहीं. याकरितां हे क्षुल्लक तंटे आपण प्रथम थांबविले पाहिजेत.

याशिवाय आणखी एक उणीव आपल्यांत आहे. अनेक शतकांच्या दास्यामुळें आपलें राष्ट्र अगदीं बायकी बनून गेलें आहे. माझ्या भगिनींनो, मला क्षमा करा; जें सत्य आहे तें मला कथन केलेंच पाहिजे. आमच्या या देशांत काय अथवा दुसऱ्या देशांत काय, तीन बायका पांच मिनिटें सुद्धां तंटा केल्याशिवाय एकत्र नांदावयाच्या नाहींत. युरोपांतील देशांत बायका मोठमोठे संघ स्थापन करितात, आणि स्त्रियांची शक्ति मोठी अफाट आहे, अशा प्रचंड वल्गनाही करतात; पण पुढें थोड्याच काळानें त्या भांडूं लागतात. मग त्यांचीं भांडणें सोडविण्यास एखादा पुरुष पुढें येतो आणि पुढें त्याचा अंमल जारी होतो. स्त्रियांना शिस्तीनें वागविण्यास कोणी तरी पुरुषच पाहिजे हें साऱ्या जगभर आढळून येतें. सांप्रत आम्ही पुरुषही स्त्रियांप्रमाणेंच झालों आहों. स्त्रियांचा पुढाकार घेण्यास एखादी स्त्री पुढें सरसावली, तर त्याच स्त्रिया वाग्बाणांचा वर्षाव करतील आणि तिला फाडफाडून घेतील. अशा स्थितींत त्या बिचारीला आपलें काम सोडणें भाग पडेल; पण त्यांचा पुढारी पुरुष असला आणि त्यानें चार कडक शब्दांनीं त्यांची झाडणी केली व मधून मधून हें झाडणीचें काम असेंच चालू ठेविलें तर त्या तें सर्व निमूटपणें ऐकून घेतील, कारण कडक शब्दांच्या जादूनें भारलें जाणें हें स्त्रियांच्या अंगवळणीं पडलें आहे. सारें जग असल्या शाब्दिक जादुगारांनीं आणि मांत्रिकांनीं भरलेलें आहे. अशाच रीतीनें आपला एखादा देशबंधु कसल्याही कार्यांत थोडेंसें डोकें वर काढूं लागला कीं, वरून काठी हाणण्यास आम्ही नेहमीं तयार असतों; व तोच एखादा विदेशी आम्हांस लाथा मारूं लागला, तर त्याची आम्हांला मुळींच क्षिति वाटत नाहीं. लाथा खाणें जणूं काय आमच्या अगदीं अंगवळणींच पडून गेलें आहे. असले गुलाम मोठ्या धन्याच्या पदवीपर्यंत चढूं पाहतात हें आश्चर्य नव्हे काय ? याकरितां ही गुलामगिरी प्रथम सोडून द्या. पुढील पन्नास वर्षें या एकाच मुद्दयावर आपण खर्च केलीं पाहिजेत. या पन्नास वर्षांत आपल्या मातृभूमीचीच देवता आपल्या हृदयांत बाळगिली पाहिजे. या काळांत सगळ्या देवदेवतांस रजा द्या. आपल्या हृदयांत जो देव बाळगावयाचा

तो हा एकच. सर्वत्र त्याचेच हात, पाय व इतर अवयव आपणांस दिसले पाहिजेत. वस्तुमात्रांत याच देवतेची व्याप्ति आपण पाहिली पाहिजे. दुसरे देव सध्यां झोंपीं गेले आहेत. आपल्या भोंवतीं असलेल्या या विराट स्वरूपाची पूजा न करितां दुसऱ्या अनेक देवतांच्या मागें आपण कां लागावें ? प्रथम या देवतेची पूजा करावयास आपण शिकलों, म्हणजे इतर देवतांची पूजा आपणांस साध्य होईल. आपणांसन्निध असलेल्या या देवतेची पूजा आपण प्रथम करूं या.

अर्धा मैल रांगण्याचेंही सामर्थ्य नसतां हनुमानाप्रमाणें समुद्र उल्लंघन करण्याची वेडी हांव आपण कशाला बाळगावी ? असें होणें शक्य नाहीं. प्रत्येक जण ध्यानधारणा करून योगी होऊं पाहात आहे; पण ही गोष्ट शक्य नाहीं. सारा दिवस जगाशीं मिसळून अनेक प्रकारचीं कर्मे करावीं आणि संध्याकाळीं नाक दाबून योगसाधन करावें इतकें तें सोपें आहे काय ? मिनिट दोन मिनिटें तुम्हीं नाक दाबलें म्हणजे सारा ऋषिगण हवेंतून उडत उडत तुम्हांपाशीं येईल, असें तुम्हांस वाटतें काय ? अशा रीतीनें या विषयाची तुम्हीं निवळ थट्टा आरंभिली आहे. आपणास जर कोणत्याही गोष्टीची प्रथम जरूर असेल तर ती गोष्ट चित्तशुद्धि ही होय. ही चित्तशुद्धि प्राप्त करून घेण्याचा खरा मार्ग म्हणजे विराटस्वरूपाचें पूजन हाच होय. आपणाभोंवतीं जें स्वरूप पसरलें आहे त्याचें पूजन करावें. आपणाभोंवतीं या साऱ्या परमेश्वराच्या मूर्ती पसरल्या आहेत. ज्यांचें पूजन आपणांस करावयाचें आहे, ते आपले देव म्हणजे आपले देशबांधवच होत. त्यांच्याशीं भांडणें करणें अथवा त्यांचा मत्सर करणें, हीं कर्में आपणास सोडून द्यावयाचीं आहेत. आपणांस त्यांची भक्ति करावयाची आहे. पूर्वकालीं ज्या घोर कर्मांचें आचरण आपण केलें आहे, त्याचींच कडू फळें आपण सध्यां चाखीत आहोंत. इतके चटके बसत असतांही आपले डोळे अद्यापि उघडूं नयेत ही केवढ्या आश्चर्याची गोष्ट आहे बरें !

हा विषय इतका विस्तीर्ण आहे कीं, तो कोठें पुरा करावा, हेंच मला समजत नाहीं. तथापि माझें भाषण मला पुरें केलेंच पाहिजे. याकरितां पुढील बेताची थोडी रूपरेषा दर्शवून तें मी पुरें करणार आहे. आपल्या देशाच्या ऐहिक आणि पारमार्थिक शिक्षणाची दोरी आपल्या हातांत राहिली

पाहिजे. कार्य हें कसें करतां येईल, ह्याच विचार तुमच्या चित्तांत सदोदित जागृत राहिला पाहिजे. याच विषयाची बडबड तुम्ही सदोदित करीत राहावी. स्वप्नांत सुद्धां तुम्हांला हेंच दिसलें पाहिजे. आणि याच कार्यास तुम्ही स्वतः वाहून घेतलें पाहिजे. हें कार्य साध्य होईपर्यंत आमचा देश अवनतींतून वर येणार नाहीं.

सांप्रत जें शिक्षण तुम्हांस मिळत आहे, त्यांत कांहीं चांगल्या गोष्टी आहेत; पण त्यापासून जो एक तोटा होत आहे, तो इतका मोठा आहे कीं, त्याच्यापुढें या चांगल्या गोष्टींचें चांगुलपण पार नाहींसें होतें. या शिक्षणापासून मर्द गडी तयार होत नाहींत, हा त्यांत मोठा दोष आहे.सध्यांच्या शिक्षणानें जुन्याची मोडतोड करण्याचें काम मात्र चांगलें केलें आहे. असल्या प्रकारचें मोडतोडीचें शिक्षण हें मृत्यूहूनही वाईट आहे. मुलाला शाळेंत घातला, कीं तो पहिली गोष्ट शिकतो ती हीच कीं, त्याचा बाप मूर्ख आहे, त्याचा आजा वेडा होता, त्याचे गुरु दांभिक आहेत, आणि या सर्व शिक्षणावरचा कळस म्हणजे जुने धर्मग्रंथ सर्व खोटे आहेत, या ज्ञानानें बसविण्यांत होतो. अशा रीतीनें तयार झालेला हा बांड सोळा वर्षांचा झाला, म्हणजे शुद्ध निर्जीव हाडांचा सांगाडा बनतो. अमुक असें नाहीं आणि तमुक तसें नाहीं. व हें खोटें व तें वाईट, असल्या नकारात्मक ज्ञानानें मात्र त्याचें डोकें तुडुंब भरलेलें असतें. अर्धशतक आपलें राष्ट्र सांप्रतच्या पद्धतीचें शिक्षण घेत असतांही, त्यांत स्वतंत्र शोधक बुद्धीचा एकही मनुष्य उभ्या हिंदुस्थानांत आढळूं नये हा कशाचा परिणाम आहे ! जिच्यांत थोडी तरी स्वतंत्र बुद्धीची झुळूक दिसून आली, अशा प्रत्येक व्यक्तीचें शिक्षण या देशांत झालें नसून, तें दुसऱ्या कोठें तरी झालें असल्याचें आढळून येईल. नुसती अनेक प्रकारची माहिती डोक्यांत खचून भरणें हें शिक्षण नव्हे. अनेक प्रकारचें कच्चें ज्ञान डोक्यांत राहिलें म्हणजे सारा जन्म तें तेथें गोंधळ उडवून देत असतें. ज्यापासून आपला भावी आयुष्यक्रम पक्का होईल, ज्यापासून आपणास पौरुष प्राप्त होईल आणि ज्यापासून दानतीची वाढ होईल, अशा प्रकारचें शिक्षण आपणास मिळालें पाहिजे. जीं तत्त्वें आपणास शिकविलीं जातात, त्यांचें पुरें पचन होऊन त्यांतील सत्त्व आपल्या अंगीं मुरलें पाहिजे. अशा प्रकारचीं पाचक तत्त्वें तुमच्या अंगीं पूर्णपणें मुरलीं असतील आणि तीं तुमच्या दानतींत

आणि आयुष्यक्रमांत प्रत्यक्ष दिसूं लागलीं असतील, तर नुसत्या ओझेंभर पुस्तकांतील ज्ञानानें ज्यानें आपलें डोकें भरून घेतलें आहे, अशा माणसापेक्षां तुम्हांला अधिक शिक्षण मिळालें आहे असें म्हणतां येईल. '**यथा खरश्चंदनभारवाही भारस्य वेत्ता न तु चंदनस्य ॥**' चंदनाचें ओझें वाहणारा गाढव त्याचें ओझें मात्र जाणतो, पण त्याची किंमत जाणत नाहीं. नुसती पुष्कळ माहिती असणें एवढ्याचाच अर्थ जर शिक्षण असा होऊं लागेल, तर जगांतील पुस्तकालयें हींच मोठी पंडित म्हटलीं पाहिजेत. अशा स्थितींत मोठ्या ऋषिवर्यांचें स्थान विश्वकोशांस दिलें पाहिजे. याकरितां आपलें मुख्य साध्य हें आहे कीं, आमचें ऐहिक आणि पारमार्थिक साधन आमच्याच हातांत असलें पाहिजे; आणि शक्य असेल तोंपर्यंत तें राष्ट्रीय पद्धतीनें व राष्ट्रीय परंपरेस धरून दिलें गेलें पाहिजे. ही गोष्ट अचाट आहे, फारच मोठी आहे हें मी कबूल करितों. हें कार्य आपल्या हातून कधीं काळींतरी पार पडेल कीं काय, याची मला शंकाच वाटते; तथापि कामाला आरंभ केलाच पाहिजे. आतां हा आरंभ कसा केला पाहिजे, याचें थोडें दिग्दर्शन केलें पाहिजे.

प्रथम आपणाला एक देऊळ बांधलें पाहिजे; कारण आमच्या हिंदूंच्या मानसिक परिस्थितीला धर्मापासून आरंभ करणें हेंच उचित आहे. अशा प्रकारें आरंभ केल्यास अनेक पंथ आणि पोटपंथ आपापसांत भांडूं लागतील, अशी कोणी शंका घेईल. या शंकेचें समाधान इतकेंच कीं, हें देऊळ कोणत्याही विशिष्ट पंथाचें नसून तेथें फक्त 'ॐ' या ध्वनिदेवतेची प्रार्थना करावी. ही देवता अर्थातच सर्व पंथांना मान्य होईल. 'ॐ' ज्याला मान्य नाहीं, तो स्वतःला हिंदु म्हणविण्यास पात्र नाहीं, असें खुशाल समजावें. सनातनधर्माचें प्रतिपादन प्रत्येकानें आपापल्या कल्पनेप्रमाणें वेगवेगळें केल्यास हरकत नाहीं; तथापि आपणा सर्वांस सामान्य असें एक देऊळ पाहिजे. स्वतःच्या मताला योग्य वाटणाऱ्या प्रतिमांचें अथवा चिन्हांचें पूजन इतरत्र करण्यास कोणास हरकत नाहीं; पण या देवळांत मात्र त्यानें कोणाशीं तंटा करतां नये. या ठिकाणीं सर्व पंथांच्या मुळाशीं जीं आद्य तत्त्वें सर्वांस सारखींच उपयोगी पडणारीं आहेत, तीं शिकविलीं जावीं. त्याचप्रमाणें निरनिराळ्या पंथांच्या आचार्यांनीं आपापल्या पंथांचें प्रतिपादन तेथें करण्यास हरकत नसावी.

त्यांनीं कोणाशीं तंटे करूं नयेत एवढा प्रतिबंध मात्र अवश्य आहे. तुम्हांला स्वतःचीं जीं कांहीं तत्त्वें शिकवावयाचीं असतील, तीं तुम्हीं खुशाल जगाला सांगा. जगाला तीं हवींच आहेत; पण इतरांबद्दल तुमचें काय मत आहे, हें जाणण्याची जगाची इच्छा नाहीं व वेळही नाहीं. याकरितां हीं आपलीं मतें तुम्हीं आपल्या जवळच ठेवावीं हें बरें. दुसरें असें कीं, या देवळांत शिक्षक तयार करण्याचीही संस्था असावी. या शिक्षकांनीं आसपासच्या लोकांत हिंडून त्यांस धार्मिक आणि ऐहिक शिक्षणाचें दान करावें. परा आणि अपरा या दोन्ही विद्यांचा सांठा या शिक्षकांपाशीं असला पाहिजे. ज्याप्रमाणें धर्माचा प्रचार करीत आपण दारोदार हिंडतों, त्याचप्रमाणें ऐहिक शिक्षणही आपण घरोघर पोंचतें केलें पाहिजे. हें काम फारसें कठीण आहे असें नाहीं. आपल्या या देवालयांतून जे शिक्षक व धर्मोपदेशक अशा रीतीनें तयार होतील, त्यांजकडून या कार्याचा अधिकाधिक प्रसार होत जाईल. याच रीतीनें या देवळाप्रमाणें दुसरींही अनेक मध्यवर्ती ठिकाणें आपणांस इतकीं निर्माण करतां येतील कीं, त्यांचें जाळें सर्व हिंदुस्थानभर पसरून जाईल. माझ्या दृष्टीप्रमाणें आपल्या भावी कार्याची ही रूपरेषा आहे. हें कार्य फार प्रचंड आहे असें वाटेल, पण तें अवश्य केलें पाहिजे असें आहे. एवढ्या कार्याला लागणाऱ्या पैशाची वाट काय ? असाही प्रश्न कोणी करील. या कार्याला पैशाची जरूरी नाहीं. पैशाला वास्तविक कांहीं किंमत नाहीं. उद्यांचें जेवण कोठें मिळणार हें गेलीं बारा वर्षें मला माहीत नव्हतें; पण पैसा आणि मला लागणाऱ्या इतर वस्तु आपोआप आल्याच पाहिजेत कारण या साऱ्या वस्तूंचा मी गुलाम नसून त्यांचा धनी आहें. माझ्या इच्छेप्रमाणें वर्तन करणें त्यांना भाग आहे. ‘ भाग आहे ’ असें मी पुन्हा निक्षून म्हणतों.

मुख्य प्रश्न हा आहे कीं, माणसें कोठें आहेत ? मद्रासेंतल्या तरुणांनो, तुमच्यावर माझी सारी भिस्त आहे. आपल्या राष्ट्राच्या हांकेला तुम्ही उभे राहणार कीं नाहीं, हाच प्रश्न सध्यां तुमच्यापुढें आहे. तुमचा माझ्यावर विश्वास असेल तर तुमचा भविष्यकाळ फार उज्ज्वल आहे, असें मी तुम्हांस सांगतों. तुमच्या ठिकाणीं जाज्वल्य आत्मविश्वास मात्र पाहिजे. लहानपणापासून माझ्या ठिकाणीं अशाच प्रकारचा आत्मविश्वास होता आणि त्याच्याच धोरणानें माझा सांप्रतचा आयुष्यक्रम चालू आहे. आपल्या प्रत्येकाच्या

ठिकाणीं अनंत शक्तीचा वास आहे, असा पक्का आत्मविश्वास तुम्हांपैकीं प्रत्येकाच्या ठिकाणीं असला म्हणजे सर्व देशास तुम्ही चेतना आणूं शकाल. हिंदुस्थानांतील प्रत्येक जातींत आणि देशोदेशींच्या इतर लोकांतही आपणांस कार्य करावयाचें आहे. या कार्यासाठीं तरुणांनीं कंबर कसली पाहिजे. तरुण सुदृढ, निकोप आणि तीव्र बुद्धीच्या लोकांनाच परमेश्वरप्राप्ति शक्य आहे, असें श्रुतिवचन आहे. आपला भावी आयुष्यक्रम ठरविण्याची हीच वेळ आहे. ' अंगं गलितं पलितं मुण्डं ' अशी स्थिति झाली म्हणजे तुमच्या हातून काय होणार ! तारुण्याचा जोम अंगीं आहे तोंवरच कोणतीही गोष्ट शक्य होईल. कार्याला लागण्याची अत्यंत उचित अशी हीच वेळ आहे. ज्यांना कोणींही हुंगलें नाहीं अथवा ज्यांना कोणीं स्पर्श केला नाहीं, अशीं अगदीं ताजीं फुलें मात्र भगवंताच्या चरणीं अर्पण करण्यास योग्य असतात; आणि त्यांचाच तो स्वीकार करतो. आयुष्य कोणाच्या हातचें नाहीं, तें केव्हां संपेल याचा नेम नाहीं. याकरितां जागें होऊन आजच कार्यास लागा. वकील होऊन भांडणें भांडत बसण्यापेक्षां अधिक उच्च दर्जाचीं कार्यें माणसांकरितां वाट पहात बसलीं आहेत.

आपल्या बांधवांच्या सुखाकरितां आणि साऱ्या मनुष्यजातीच्या सुखाकरितां स्वतःस अर्पण करणें याहून अधिक मोठें कार्य तें कोणतें ? या आपल्या आयुष्याची खरी किंमत काय आहे ! तुम्ही हिंदु आहां त्या अर्थी जीवात्मा अमर आहे हा विश्वास जन्मादारभ्यच तुमच्या चित्तांत खिळलेला आहे. पुष्कळ तरुण मजकडे येऊन नास्तिकवादाविषयीं माझ्याशीं बोलत असतात. कोणताही हिंदु नास्तिक होईल असें मला वाटत नाहीं. युरोपीयन ग्रंथांच्या वाचनानें तो कांहीं काल चार्वाकवादी झाल्यासारखा दिसेल, तथापि त्याच्या चित्तावरचें हें पटलसुद्धां फारच थोडा वेळ टिकेल. चार्वाकवाद अथवा निरीश्वरवाद हे तुमच्या रक्तांतच नाहींत. ज्या कल्पना तुमच्या हाडींमासीं खिळलेल्या नाहींत, त्या तुम्हांस कधींही आपल्याशा करतां येणार नाहींत. त्या तुम्ही आपल्याशा करूं पाहाल तर तुमची फसगत मात्र होईल. याकरितां असल्या कल्पनांच्या मागें लागणें सोडून द्या. एकदां लहानपणीं मीसुद्धां हा उद्योग करून पाहिला; पण ती गोष्ट मला साध्य झाली नाहीं. आपलें आयुष्य क्षणभंगुर आहे, पण आपला जीवात्मा अमर आहे. निश्चयानें घडून येणारी

गोष्ट म्हटली म्हणजे मृत्यु हाच होय. याकरितां मोठ्या कार्यालाच आपण आपलें सारें आयुष्य वाहूं या. हा निश्चय आजच आपण करूं या. 'धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे' असें वचन ज्यानें आपणास दिलें आहे, त्या भगवान् श्रीकृष्णाचा आशीर्वाद आपण मागूं या. तो परमात्मा आपल्या सर्वांचे मनोरथ पूर्ण करील.



# ११. पूर्व आणि पश्चिम

रुंद आणि खोल असा प्रवाह असलेल्या महानद्या दुथडी भरून चालल्या आहेत. या नद्यांच्या तटाकीं सुंदर उपवनें जागोजाग पसरलीं आहेत. आपल्या सौंदर्यानें तीं जणूं काय, नंदनवनाशीं स्पर्धा करूं पाहात आहेत. भूलोकावरील या नंदनवनाच्या मध्यभागीं संगमरवरी दगडांचे भव्य प्रासाद आकाशाशीं आपलीं मस्तकें भिडवूं पहात आहेत. यांजवरील नक्षीकाम दृष्टीस पडतांच पहाणारा थक्क होऊन जातो. या प्रासादांच्या आजूबाजूस नजर फिरविली असतां लहानसहान झोंपडीं इकडेतिकडे विखुरलीं असल्याचें दिसून येतें. त्यांच्या त्या मातीच्या भिंतींना जागोजाग खिंडारें पडलीं आहेत. वरील आढीं चंद्रमौळी झालीं आहेत. त्यांतील बांबू मधून मधून प्रेक्षकाकडे डोकावून पाहात आहेत. या चंद्रमौळी झोंपड्यांतून वृद्ध आणि तरुण पुरुष इकडेतिकडे फिरतांना आढळतात. त्यांच्या अंगांवर लंगोटीशिवाय दुसरें वस्त्र दिसत नाहीं. अन्नाच्या अभावीं त्यांच्या पाठी व पोटें हीं एकरूप झालेलीं आहेत. शेंकडों वर्षांच्या दारिद्याचा आणि हताशपणाचा पूर्ण ठसा त्यांच्या चेहऱ्यावर उमटलेला दिसत आहे. गायी, बैल, म्हशी इत्यादि जनावरें जिकडेतिकडे संचार करीत आहेत. हाय ! हाय ! त्यांचेही डोळे त्यांच्या धन्यांच्या डोळ्याप्रमाणेंच तेजशून्य दिसत आहेत. धन्याप्रमाणेंच त्यांच्याही शरीराचीं हाडें स्पष्टपणें मोजतां येतात. एखाद्या गांवाच्या आजूबाजूस पाहिलें तर सध्यांच्या भरतभूमीचें हें चित्र आहे !

एका बाजूस उत्तुंग राजवाडे तर यांच्याच शेजारीं पडकींझडकीं झोपडीं ! एका बाजूस सुंदर देवालय आणि शेजारीं केरकचऱ्याचा प्रचंड ढीग ! एका

बाजूस ओकारी येईपर्यंत जेवल्यामुळें ढेरपोट्या बनलेला आणि जरतारी कपडे अंगांत घालणारा लक्ष्मीपुत्र तर त्याच्याच बाजूस फक्त लंगोटी घालून चालणारा आणि हाडांचीं काडें झालेला संन्यासी नजरेस पडतो. आमच्या भरतभूमीची सांप्रतची स्थिति अशी आहे !

प्लेग आणि महामारी यांच्या धडाक्यानें गांवेंच्यीं गांवें बेचिराख होत आहेत; विषारी ताप आमचीं काळजें पोखरून टाकीत आहे; दुष्काळ तर आमच्या पांचवीस पुजला आहे; कोणत्या ना कोणत्या भागांत दुष्काळाचें भेसूर तांडव नृत्य सुरू आहे; आमची भूमि ही रोग आणि दुःख यांचें कुरुक्षेत्र बनून गेली आहे. जिकडेतिकडे स्मशानेंच स्मशानें आढळून येतात. या ठिकाणीं कित्येक भग्न हृदयांचीं हाडें पसरलीं आहेत आणि त्यांच्याच मध्यभागीं एखादा योगी गंभीर शांततेंत निमग्न होत्साता बसला आहे. मोक्षसाधनावांचून त्याला दुसरें कोणतेंच कर्तव्य दिसत नाहीं. एखादा युरोपीय फिरस्ता इकडे आला तर त्याच्या नजरेस हिंदुस्थानचें असें चित्र दिसतें !

तीस कोट मनुष्यें निव्वळ बाजारबुणग्यासारखीं इकडेतिकडे धांवत आहेत. त्याचें मनुष्यत्व आतां फक्त त्यांच्या बाह्य आकारांतच उरलें आहे. स्वकीयांच्या आणि परकीयांच्या पायाखालीं कित्येक शतकें हीं माणसें तुडविलीं गेल्यामुळें त्यांचें खरें मनुष्यपण नष्ट झालें आहे. त्यांच्या खुद्द देशबांधवांनीं आणि धर्मबांधवांनींच ही स्थिति त्यांस आणली आहे. गुलामांच्या ठिकाणीं ज्याप्रमाणें स्वतंत्रबुद्धीचा अभाव असतो, त्याचप्रमाणें यांच्याही ठिकाणीं स्वतंत्र विचारशक्तीचा अभाव असून ठरलेलीं कामें करावीं आणि निमूटपणें दुःखें भोगावीं, अशा स्थितींत त्यांचा काळ जात आहे. भविष्यकाळाबद्दल त्यांच्या चित्तांत कसलीही आशा नाहीं. आपला पूर्वेतिहास तीं विसरलीं आहेत आणि त्यांचा भविष्यकाळही फारसा मनोहर दिसत नाहीं. जीव आणि शरीर यांची संगति चालू क्षणापुरती तरी तुटूं नये एवढीच त्यांची इच्छा दिसते. गुलामांच्या वृत्तीस शोभणारा मत्सर त्यांच्या हृदयांत घर करून बसला आहे. आपल्या शेजाऱ्याचें बरें झालेलें त्यांस पाहावत नाहीं. त्यांचीं हृदयें श्रद्धाशून्य झालीं आहेत. त्यांचा आत्मविश्वास मरून गेला आहे. लुच्चेगिरी आणि विश्वासघात हे कोल्ह्यांचे गुण त्यांच्या अंगीं पूर्णपणें मुरले असून तींच त्यांच्या बचावाचीं शस्त्रें होत. हे लोक शुद्ध आपलपोटे आहेत.

प्रसंगीं समर्थांच्या चरणाची धूळ चाटण्यासही हे कमी करणार नाहींत. एका बाजूला इतक्या प्रतीचा नम्रपणा दाखवीत असतां आपणाहून अशक्त असणारांवर मर्मप्रहार करून त्यांचा जीव घेण्यासही ते मागेंपुढें पाहणार नाहींत. सडलेल्या प्रेतांत लक्षावधि किडे ज्याप्रमाणें बुजबुजत असतात, त्याचप्रमाणें भरतभूमीच्या देहावर तीस कोटी किडे बुजबुजले आहेत. एखाद्या परकीयाच्या नजरेनें दिसणारें आमचें चित्र अशा प्रकारचें आहे !

सत्तावारुणीचें आकंठ पान करून धुंद झालेले, विहित आणि अविहित यांचा विचार ज्यांच्या ठिकाणीं नष्ट झाला आहे असे, जंगली जनावरांप्रमाणें भयप्रद आणि कनककामिनीच्या मागें लागलेले, पावित्र्याची कल्पनाही ज्यांस शिवली नाहीं आणि गलिच्छपणांत जे सदा मुरलेले असे, जडवादाचे पूर्ण भक्त, जडवादाची आत्यंतिक उत्क्रांति हीच ज्यांची संस्कृति, परकीयांस लुबाडून स्वःचीं घरें भरणारे, परलोकाबद्दलचा विचारही ज्यांच्या चित्तास शिवत नाहीं, देह हाच ज्यांचा आत्मा आहे आणि इंद्रियांचा संतोष करावयाचा हीच ज्यांची इतिकर्तव्यता आहे असे लोक कोणी असतील तर ते युरोपीयच आहेत. एखाद्या हिंदूच्या नजरेनें पाश्चात्यांचें चित्र अशा प्रकारचें असतें ! पाश्चात्य लोक म्हणजे चालू काळचे असुरच आहेत असें त्यांस वाटत असतें.

परस्परांबद्दल असणारी अपुरी माहिती अथवा पूर्ण अज्ञान आणि परस्परांबद्दल सद्विचाराचा अभाव यांमुळें उभय पक्षीं अशा प्रकारचीं मतें प्रचलित आहेत. परकीय युरोपियन लोक हिंदुस्थानांत येतात, आणि शहरांतील अति स्वच्छ असणाऱ्या भागांतल्या टोलेजंग इमारतींत राहतात आणि तेथून शहराच्या ' नेटिव्ह ' भागाची तुलना युरोपीय शहरांशीं करतात. त्यांच्याशीं ज्या हिंदी लोकांचा संबंध येतो ते लोक म्हटले म्हणजे बहुधा त्यांचे नोकर असावयाचे. आणि वास्तविक पाहतां हिंदुस्थानाइतकें दारिद्र्य आणि दुःख जगांत दुसऱ्या कोठेंही आढळावयाचें नाहीं. तसेंच आमच्या घाणेरड्या परिस्थितींत, अशा प्रकारच्या गुलामगिरींत आणि अशा प्रकारच्या अवनतावस्थेंत एखाद्या तरी चांगल्या गुणाचा वास असूं शकेल, ही गोष्ट बाहेरून आलेल्या युरोपियाच्या चित्तास शिवतसुद्धां नाहीं.

उलटपक्षीं विहिताविहिताचा विचार न करतां युरोपीय लोक हातीं पडेल तें भक्षण करीत असतात असें आपण पाहात असतों. त्यांच्या स्वच्छतेच्या

कल्पना आमच्या कल्पनांहून भिन्न आहेत, असें आमच्या नजरेस येतें. त्यांच्यांत जातिभेदाला थारा नसून त्यांचीं स्त्रीपुरुषें एकत्र मिसळत असतात, दारू पिऊन व एकमेकांच्या हातांत हात घालून तीं नाचत असतात असें आपण पाहतों. या सर्व गोष्टीचें आपणांस अत्यंत नवल वाटतें. अशा प्रकारच्या राष्ट्रांत चांगलें तें काय असणार, असा प्रश्न आपल्या मनांत साहजिक उद्भवतो.

केवळ बाह्य दृष्टि असल्यामुळें दोन्ही पक्ष अशा प्रकारच्या चुका करीत असतात. दोहोंपैकीं एकाच्याही दृष्टीस खोलपणा नाहीं. बाह्य देखाव्याच्या आंतील वस्तुस्थिति काय आहे, हें जाणण्याची तीक्ष्ण दृष्टि दोघांसही नाहीं. परकीय लोकांस आपण म्लेंच्छ समजतों आणि आपल्या समाजांत त्यांस आपण मिसळूं देत नाहीं. त्यांच्या बाजूनें तेही आपणांस गुलाम समजून आपणां-संबंधीं बोलतांना ‘ निगर ’ असा तुच्छतापूर्वक शब्द वापरतात. उभयपक्षीं बाह्यैकदृष्टीमुळें अशा प्रकारच्या चुका होत असल्या तरी दोघांच्याही मतांत थोडाफार सत्यांश असला पाहिजे हेंही उघड आहे.

प्रत्येक मनुष्यांत कोणत्या ना कोणत्या विशेष कल्पनेचा वास असतो. आपण मनुष्याचें जें कांहीं बाह्यरूप पाहतों तें त्याच्या अंतर्गत सूक्ष्म भावनांचें दृश्यरूप होय. अमूर्त विचार ज्याप्रमाणें शब्दरूपानें मूर्तपणास येतात, त्याच-प्रमाणें मनुष्याच्या अंतर्गत भावना त्याच्या एकंदर चालचलणुकीच्या रूपानें प्रत्यक्षत्वास येत असतात. जी गोष्ट एका व्यक्तीस लागू आहे, तीच साऱ्या राष्ट्रासही लागू आहे. व्यक्तीप्रमाणेंच राष्ट्रालाही विशिष्ट राष्ट्रीय कल्पना असतात. प्रत्येक राष्ट्राची ही विशिष्ट कल्पना जगांत आपल्यापरी काम करीत असते आणि जगाच्या अस्तित्वासाठीं तिची आवश्यकताही आहे. जगाच्या अस्तित्वासाठीं अशा प्रकारच्या कल्पनेची आवश्यकता ज्या दिवशीं नष्ट होईल, त्याच दिवशीं ती व्यक्ति अथवा तें राष्ट्र नाश पावेल. आपल्या हिंदुस्थानांत अनंत प्रकारचीं दुःखें, अठरा विश्वें दारिद्र्य आणि आंतून व बाहेरून जुलूम, अशा प्रकारची स्थिति असतांही आपण अजून जगलों आहों याचें कारण हेंच आहे. जी राष्ट्रीय कल्पना आमच्यामध्यें आहे, तिची आवश्यकता जगाला अद्यापि असल्यामुळें आमचा नाश होऊं शकत नाहीं. त्याचप्रमाणें युरोपीय राष्ट्रपुरुषाच्या कल्पनेचीही आवश्यकता जगाला आहे.

तिच्या अभावीं जगाचें गाडें सुरळीत चालूं शकणार नाहीं. युरोपीय राष्ट्रांच्या सामर्थ्याचें बीज हें आहे. कोणत्याही मनुष्यप्राण्यांतील शक्ति सर्वथा नष्ट झाली तर तो एक क्षणभर तरी जगूं शकतो काय ? अनेक व्यक्ति मिळून राष्ट्र बनलेलें असतें. त्या राष्ट्राची सर्व शक्ति आणि त्याचें सर्व चैतन्य नष्ट झालें तर तें राष्ट्र क्षणभर तरी जिवंत राहूं शकेल काय ? हजारों वर्षांच्या अवनत-दशेच्या फेऱ्यांत सांपडलेलें हिंदुमानवकुल नष्ट कां झालें नाहीं ? आपल्या चालीरीती जर खरोखरच इतक्या वाईट आहेत, तर पृथ्वीच्या पाठीवरून अजूनपर्यंत आम्ही नामशेष कसें झालों नाहीं ? आमचा पुरा नाश करण्याचे बाबतींत नाना प्रकारच्या परकीयांनीं कांहीं बाकी टेविली आहे काय ? मग असें असतांही इतर मागासलेल्या देशांतील लोकांप्रमाणें आम्ही नष्ट कसे झालों नाहीं ? हिंदुस्थानांतील लोकसंख्येचा नाश होऊन तेथें मोठालीं अरण्यें अद्यापि कशीं बनलीं नाहींत ? असें झालें असतें तर हिंदुस्थानांत येऊन तेथें आपल्या वसाहती स्थापण्यास परकीयांनीं क्षणाचाही विलंब लावला नसता. अमेरिका, ऑस्ट्रेलिया आणि आफ्रिका या खंडांतील वसाहतींप्रमाणेंच हिंदुस्थानच्या सुपीक भूमींतही परकीयांच्या वसाहती झाल्या असत्या. पण तसें झाल्याचें दिसून येत नाहीं.

माझ्या परकीय मित्रा, तुला वाटतें तितका तूं समर्थ नाहींस. ' कर्तुमकर्तु-मन्यथाकर्तुम् ' असें सामर्थ्य आपणांस आहे असें तुला वाटतें, पण तो तुझा निव्वळ भ्रम आहे. हिंदुस्थानालाही कांहीं विशिष्ट प्रकारचें सामर्थ्य आहे आणि अद्यापही कांहीं विशेष गुण त्याच्या ठिकाणीं आहेत, ही गोष्ट तूं प्रथम ध्यानांत आण. त्याचप्रमाणें जगाच्या संस्कृतींत भर टाकण्यासाठीं लागणाऱ्या वस्तूंपैकीं कांहीं वस्तु अद्यापि हिंदुस्थानजवळ असल्यामुळेंच तो देश अद्यापि जगला आहे, हेंहि ध्यानांत आण. त्याचप्रमाणें जे माझे देशबांधव अंतर्बाह्य युरोपीय बनूं पहात आहेत, त्यांनींही ही माझी सूचना लक्षांत ठेवावी. ' आम्ही अवनतीच्या पंकांत लोळत आहों. आम्ही पशूंच्या पंक्तींत जाऊन बसलों आहों. अहो युरोपीय सद्गृहस्थहो, तुम्ही आमचे सर्वतोपरी त्राते आहां. तुम्हीं आम्हांवर दया करा आणि या चिखलांतून आम्हांस बाहेर काढा. ' असा टाहो फोडणाऱ्या माझ्या देशबांधवांनींही वरील सूचना लक्षांत ठेवावी. त्याचप्रमाणें ' हिंदुस्थानचा तारक येशू ख्रिस्त हिंदुस्थानांत आला असून,

परमेश्वरी इच्छेची पूर्तता आतां होत आहे ' अशी ओरड करणाऱ्या लोकांनींही ही सूचना ध्यानांत ठेवावी. छे, छे ! येथें येशू ख्रिस्त आला नाहीं आणि जिहोवाही आला नाहीं. ते बिचारे येथें येणारही नाहींत. स्वतःची जळतीं घरें विझविण्याचीच कामगिरी त्यांस पुरेशी आहे. आमच्या देशांत येण्यास त्यांस फुरसत तरी कोठें आहे ?

आमच्या येथें पूर्वीप्रमाणेंच आजही तोच वृद्ध शिव पूजिला जात आहे. तीच असुरमर्दिनी कालीमाता येथें अद्यापिही पूज्य मानिली जात आहे. प्राचीन काळच्या सर्व थाटामाटानें तिचें पूजन आजही होत आहे. तोच गोपाळ मुरलीधर श्रीकृष्ण अद्यापिही येथें वास करीत आहे. एका काळीं याच वृद्ध शिवानें नंदीवर बसून आपल्या डमरूचा नाद करीत सुमात्रा, बोर्निओ, सेलेबिस, ऑस्ट्रेलिया आणि अमेरिका येथवर प्रवास केला होता. त्याचप्रमाणें दुसऱ्या भागांकडे जाऊन तिबेट, चीन, जपान आणि सैबीरिया या मुलखांतही आपल्या नंदीवर बसून प्रवास केला होता. फार काय, पण आजमितीसही चीन आणि जपान या देशांतसुद्धां कालीमाता आपला पूजेचा हक्क वसूल करीत आहे. तिचेंच रूपांतर करून ख्रिस्तानुयायांनीं कुमारी मेरी निर्माण केली. आणि तिच्याच पोटीं येशू ख्रिस्ताला जन्मास घातलें. या उत्तुंग हिमनगराजाकडे पहा. याच्या उत्तर-दिशेकडील भागांत कैलास असून वृद्ध शिवाचें हें प्राचीन निवासस्थान आहे. दशमुखी आणि वीस हाताच्या प्रचंड शक्तिमान् रावणालाही या स्थानाचें उच्चाटन करतां आलें नाहीं. आतां हें दुष्कर कृत्य परधर्मानुयायी उपदेशक करणार आहेत काय ? ही गोष्ट त्यांनीं स्वप्नांतही आणूं नये. आमच्या हिंदुस्थानांत तोच शिव पूजिला जाईल. अनंत काल लोटला तरी त्याच कालीमातेचें पूजन पशुहननासह केलें जाईल; आणि तोच मुरलीधर श्रीकृष्ण आपली बांसरी अनंत कालपर्यंत येथें वाजवीत राहील ! हिमालयाप्रमाणेंच आमचीं हीं दैवतेंही स्थिर आहेत. ख्रिस्ती अथवा दुसऱ्या कोणत्याही धर्माच्या अनुयायांनीं कितीही अट्टाहास केला, तरी त्यांस स्थानभ्रष्ट करणें या अनुयायांस शक्य नाहीं. यांचा वास तुम्हांस सहन होत नसेल तर तुम्हीच दूर सरा. तुम्हां मूठभर लोकांच्या संतोषासाठीं दीर्घ कालपर्यंत सारें राष्ट्र तुमचा जाच सहन करील काय ? हा जाच सहनशीलतेची सारी मर्यादा आतां उल्लंघूं पहात आहे. तुमच्या साऱ्या चैनी जेथें यथेष्टपणें चालवितां

येतील, असा दुसरा एखादा भाग आतां तुम्ही शोधून काढा. हें विस्तीर्ण जग तुम्हांस अगदीं मोकळें आहे. पण, हा उपदेश तुम्हांस कसचा रुचणार ! ही गोष्ट करावयास लागणारें सामर्थ्य तरी तुम्हांपाशीं कोठें आहे ! तुम्ही त्या वृद्ध शिवाचें अन्न खाऊन अशाच रीतीनें त्याच्याशीं दगलबाजी करणार ! अशाच रीतीनें तुम्ही त्याचा उपहास करणार आणि परकीय देवतांचें स्तोम येथें माजवीत सुटणार ! " आम्ही अत्यंत क्षुद्र आहों, आम्ही हलके आहों, आम्ही अत्यंत अवनतावस्थेस पोहोंचलेलें आहों, आमच्या जवळच्या सर्व चीजा सर्वथैव त्याज्य आहेत, अशी बडबड माझे जे कोणी देशबांधव परकीयांसमोर करीत आहेत, त्यांस मी इतकेंच म्हणतों कीं, तुमचें म्हणणें कदाचित् खरेंही असेल. तुम्ही सत्यवक्तेपणाचा तोरा ज्या अर्थी मिरवितां, त्या अर्थी तुमचें म्हणणें आम्ही मान्य करतों. पण ' आम्ही ' या शब्दांत स्वतःबरोबर आमच्या साऱ्या राष्ट्रास ओढण्याचा यत्न तुम्ही कां करतां ? महाराज, आपल्यासारख्या सत्यवक्त्यास असें करणें शोभतें काय ! आपणाबरोबर साऱ्या राष्ट्रांसही वाईट ठरवावयाचें ही रीत कोठली ?

उत्तमोत्तम सद्गुणांवर कोणत्याही एकाच राष्ट्राचा हक्क नाहीं, ही गोष्ट आपण प्रथम लक्षांत ठेविली पाहिजे. व्यक्तींत ज्याप्रमाणें सद्गुणदुर्गुणांची मिसळ सांपडते, त्याचप्रमाणें ही गोष्ट राष्ट्रांसही लागू आहे. एखाद्या राष्ट्रांत एखादा सद्गुण विशेषेंकरून आढळला, तर दुसऱ्यांत दुसरा एखादा सद्गुण परिणतावस्थेस गेल्याचें आढळून येईल.



ना. गो. चापेकर ( १८६९ )

# १२. मनुष्यस्वभाव

आपण ज्याला सज्जन समजतों त्याच्यामध्यें सहृदयता अथवा सहानुभूति, संगतीची आवड अथवा समाजशीलता आणि न्याय–अन्याय पाहण्याची बुद्धि अथवा न्यायशीलता हे गुण असतात. परोपकार हा एक स्वार्थाचाच प्रकार आहे, अथवा एकाच्या सुखदुःखानें दुसऱ्याच्या अंतःकरणांत त्या सुखदुःखाची भावना उद्भूत होते, असें प्रतिपादन करणें योग्य ठरणार नाहीं. पशुपक्ष्यांकडे पाहिलें तरीसुद्धां स्वार्थाबरोबर परोपकाराचीही छटा त्यांच्या अंतःकरणावर उमटलेली असते असें दिसून येतें. या सहानुभूतीचा उगम प्रजननकर्मांत आपणांस आढळून येतो. मांजराच्या पिलांवर जर त्यांच्या आईचें म्हणजे मांजरीचें प्रेम असणार नाहीं, तर तीं पिलें कधींही जगणार नाहींत हें उघड आहे. फार काय मांजरप्राणी हा जगांतून नष्ट होईल. मनुष्यजातीचीही हीच स्थिति आहे. तान्ह्या अनाथ अर्भकाचें रक्षण व्हावें म्हणून तर मातेच्या अंतःकरणाला मायेचा पाझर सुटतो. या मायेच्या योगानेंच मनुष्यजातीचें सातत्य राहिलें आहे. ज्या कांहीं लोकांत मायेचा अंश कमी असतो त्यांची संख्या हटत हटत अखेरीस तो सर्व समाजच नष्ट होतो. स्वतःच्या सुखाचा त्याग करून मुलांचें संरक्षण करण्याची प्रवृत्ति ज्या समाजांतील आईबापांत असते त्याच समाजाची वाढ होत असते. या कारणानेंच म्हणजे अर्भकाच्या रक्षणाची जबाबदारी निसर्गतःच मातेवर पडत असल्यानें ममताळूपणा हा स्त्रियांचा स्वभाव होऊन बसला आहे. रानटी लोकांच्या तडाक्यांत सांपडलेल्या प्रवाशांनीं त्या रानटी लोकांच्या बायकांनाच शरण जाऊन आपला जीव बचावल्याचीं उदाहरणें प्रवासवृत्तांतून आढळून येतात. कित्येक लोकांचें मत असें आहे कीं, पुरुषांइतक्या बायका उपद्व्यापी व कलागती लावणाऱ्या नसल्यामुळें त्यांचा समाज पुरुषांच्या अगोदर बनला. या मताला इतिहासाचा आधार मिळेल कीं नाहीं याची शंका वाटते. तथापि एवढें मात्र निर्विवाद कीं, समाज करून राहण्यास भांडखोर–वृत्तीच्या माणसांपेक्षां शांत स्वभावाचीं माणसेंच उपयोगी पडतात. अशीं माणसें समाज करून एकत्र राहिलीं म्हणजे

त्यांचें बल वाढतें व त्यायोगें निर्दय व दुष्ट स्वभावाचे लोक आपोआपच हळू हळू नाहींसे होतात. मनुष्याला एकदां शांततेची चटक लागली, शांतता व मारामाऱ्या यांचे परिणाम त्यांच्या निदर्शनास येऊं लागले, म्हणजे खट्याळ व उपद्व्यापी लोकांबद्दल त्यांच्या मनांत तिटकारा उत्पन्न होतो आणि असे लोक हळू हळू समाजांतून लुप्त होतात. कधीं कधीं याच्या उलटहि प्रकार होण्याचा संभव आहे; म्हणजे क्रूर वृत्तीचे लोक बहुसंख्याक असल्यास त्यांच्यामध्यें शांत वृत्तीचीं माणसें राहूं शकत नाहींत; आणि म्हणून अशा समाजांतून हीं माणसें बाहेर हाकललीं जातात. उपद्रवाची धग आपणांस कोठूनहि लागूं नये म्हणून शांतस्वभावी माणसें अविवाहित स्थिति पतकरितात, त्यामुळें अशा लोकांचा हळू हळू ऱ्हास होतो. तात्पर्य, अत्यंत निर्दय माणसांचा जसा समाजामध्यें टिकाव लागत नाहीं तसाच अत्यंत शांतताप्रिय माणसाचाहि लागत नाहीं असें दिसतें. म्हणजे कोणत्याही समाजांत अशा दोन टोकांकडे सर्वांशीं झुकलेलीं माणसें असूं शकणार नाहींत. अर्थात् मध्यम मनोवृत्तींच्या माणसांचाच समाज बनलेला असतो असें म्हणावें लागतें.

अगदीं जुना रानटी मनुष्य क्रूर होता असेंच इतिहास आपणांस सांगतो. आजचा क्रूर मनुष्य त्याच्या मानानें किती तरी सदय ठरेल. समाजांत राहण्यामुळेंच पूर्वमनुष्याची ही क्रूर वृत्ति नष्ट झाली असें म्हटलें पाहिजे. एकंदरींत माया अथवा प्रेम यांच्या पायावरच कुटुंबाची उभारणी होऊं शकते. पिढ्यान्‌पिढ्या कुटुंबसंबंध जे टिकतात त्याचें कारणही या वैवाहिक, पैत्रिक मायेंत आढळून येतें. याशिवाय या सहानुभूतीच्या योगानें मनुष्य परोपकारशील होतो. मनुष्याच्या आयुष्यांत ज्या घडामोडी होतात त्यांची तीव्रता कमी करण्यास सहानुभूतीचा फार उपयोग होतो. दुर्दैवाचा फेरा दुसऱ्याच्या सहानुभूतीमुळें टळतो आणि विषमतेची उग्रता सह्य होऊं शकते. स्त्रिया, विधवा, मुलें व वृद्ध यांसारख्यांची तर आपत्ति इतरांच्या सहानुभूतीनेंच कमी होऊं शकते. ही व्यक्तींची गोष्ट सोडून समाजांतही सहानुभूतीचें कार्य मोठ्या प्रमाणावर घडून येत असल्याचें दिसून येतें. कारखान्यांत काम करणाऱ्या बायकांच्या कामाचे तास कमी करणें, सुखासमाधानानें त्यांस राहतां येईल इतकें वेतन त्यांस मिळवून देणें, व्याधिग्रस्तांचा सांभाळ करणें इत्यादि कृत्यें सहानुभूतीच्याच जोरावर होत असतात. जेथें जेथें म्हणून विषमता आढळून

येईल तेथें तेथें ती नाहींशी करण्याचा उपाय समाज योजतो त्याचें कारण सहानुभूतीच होय. धनी आणि नोकर, नवरा आणि बायको, आईबाप आणि मुलें, शिक्षक आणि विद्यार्थी त्यांच्या परस्पर-संबंधावर सार्वजनिक रीत्या नजर असावी लागते. नाहींतर एकापासून दुसऱ्यास अन्याय सहन करावा लागतो.

याप्रमाणें सहानुभूतीचें कार्य जरी मोठें असलें तरी ती समाजाच्या वाढत्या प्रपंचास अपुरी पडते यांत कांहीं शंका नाहीं. सामाजिक संघटना म्हटली म्हणजे तिच्यांतील प्रत्येक मनुष्यानें कोणाची देखरेख असो वा नसो, त्यास नेमून दिलेलें काम केलेंच पाहिजे; तसेंच दुसऱ्याच्या कामांत त्यानें अडथळा आणतां कामा नये. हें कसें साधेल याचा विचार केला, तर नुसत्या सहाभूतीनें किंवा मायेनें वरील गोष्ट घडून येणार नाहीं अशी आपल्या मनाची खात्री होते. विषमता नाहींशी होण्यास सहानुभूति कारणीभूत होते, म्हणून सहानुभूति हाच जर आपल्या समाजघटनेचा पाया केला तर जगांतील पुष्कळ दुःख नाहींसें होईल, अशी लोक कल्पना करतात; आणि म्हणून समाज सुसंघटित करण्याच्या उद्देशानें कित्येक विचारवंत माणसें, स्त्रिया व मालमत्ता हीं कोणाच्याहि एकाच्या मालकीचीं नसून सर्व समाजाच्या मालकीचीं असावीं, असें प्रतिपादन करतात. उलट सहानुभूतीचा फायदा मिळणाऱ्यास हा दुसरा मनुष्य आपली कींव करीत आहे असें वाटतें. संकटांत सांपडलेल्या मनुष्यास सहानुभूति म्हणजे वैषम्य उत्पन्न करणाराच गुण असें वाटण्याचा संभव आहे. असें झाल्यास सहानुभूति दाखविली जाणाऱ्या माणसांत जी मनोवृत्ति उत्पन्न होते ती इष्टच असते असें म्हणतां येणार नाहीं. मोठ्या संस्थांत किंवा संघटनेंत मित्रत्वानें केलेल्या साह्याचा उपयोग होत नसतो. तेथें विश्वासाच्या वागणुकीचीच आवश्यकता असते. एखाद्या बायकोचा नवरा तिला मारीत असला तर सहानुभूति असणारा मनुष्य मध्यें पडून तिचा मार चुकवील हें खरें; पण त्यामुळें तो लांच खाणार नाहीं अथवा खोटें बोलणार नाहीं असें अनुमान करतां येणार नाहीं. गाडीखालीं मूल सांपडत असल्यास एखादा एंजिनियर धावत जाऊन त्याला काळाच्या जबड्यांतून ओढून काढील; परंतु तेवढ्यामुळें कराराप्रमाणें काम न करणाऱ्या ठेकेदाराला तो शासन करीलच असा नेम नाहीं. भिक्षेकऱ्याला एखाद्यानें भिक्षा घातली म्हणून तो खोटी साक्ष देणार नाहीं असें म्हणतां येणार नाहीं बुडणाऱ्या माणसाला एखाद्यानें

हांत दिला म्हणून तेवढ्यानें कर बसविणाऱ्या अधिकाऱ्याला तो आपलें वास्तविक उत्पन्न सांगेल असें नाहीं. यावरून सहानुभूतीची उपयुक्तता व अनुपयुक्तता कशी आहे हें आपणांस दिसून येतें. शिवाय असें कीं, जे आपले आप्तेष्ट असतील अथवा ज्यांना आपण ओळखतों, अशांचेंच फार तर सहानुभूतीच्या योगानें आपण कार्य करूं शकूं. परंतु ज्यांच्याशीं आपला फार संबंध नाहीं त्यांच्यासंबंधीं सहानुभूति निरुपयोगीच ठरते. आपल्या कृत्यानें एखाद्या विशिष्ट व्यक्तीचें नुकसान होत आहे अशा प्रसंगीं कदाचित् आपण माघार घेऊं; परंतु सर्व लोकांकरितां अशी आपण माघार घेऊंच असा नियम नाहीं. सारांश, नुसत्या मनोविकारावर विसंबून मोठमोठीं राष्ट्रकार्यें होणें अवघड वाटतें. दयार्द्र अंतःकरणाचा मनुष्य चहाड्या सांगून किंवा खोटी बातमी पसरवून देशाचें अनन्वित नुकसान करण्यास तयार होतो असा अनुभव आहे. ढेकूण मारावयाला ज्याचें मन कचरतें असा स्थानिकस्वराज्यसंस्थेचा सभासद,दोष उत्पन्न होऊन पिण्याला अयोग्य झालेलें पाणी लोकांस बिनदिक्कत देत असतो. उदार स्वभावाचा अधिकारी स्वार्थ साधण्याकरितां लग्नसंस्था, मालमत्ता, भाषणस्वातंत्र्य यांच्यावर गदा आणतो, असा अनुभव अनेक वेळां आलेला आहे. म्हणून असें दिसतें कीं, संरक्षणाची आवश्यकता जेथें अधिक भासते तेथें सहानुभूति अपुरी पडते. कारण प्रगतीच्या पायरीला लागलेल्या समाजांत व्यक्तीचें महत्त्व नसून ठरीव तत्त्वानुसार सर्वांचे आचार नियमित झालेले असतात. बायकोवर प्रेम करणें, मुलांवर माया करणें आणि शेजाऱ्याला आपल्यापासून उपद्रव न पोंचूं देणें याच्यापेक्षां मनुष्याचें कर्तव्यक्षेत्र सध्यां विस्तृत झालें आहे. आपण मनुष्यावर ज्याप्रमाणें प्रेम करतों त्याप्रमाणें संस्थांबद्दल आपल्यामध्यें पूज्यबुद्धि असावी लागते. अशा वाढत्या समाजाचें काम केवळ सहानुभूतीनें भागणार नाहीं; आणखी दुसऱ्या कशाची तरी आवश्यकता आहे हें खास.

दुसऱ्या कोणाच्या तरी सहवासांत राहावें अशी मनुष्याची स्वाभाविक वासना असते. त्याला एकटें राहणें मनापासून आवडत नाहीं. असंस्कृत माणसाला तर एकलकोंडेपणाचा कंटाळाच येतो. बायको तरी निदान आपल्याला सहचरी असावी असें त्याला वाटत असतें तें यामुळेंच. सुबुद्ध समाजांत आपल्याला अविवाहित स्थितींत राहणारे तरुण आढळून येतात; परंतु अप्रबुद्ध

अशा रानटी समाजांत अविवाहित स्थितींत कालक्रमण करणारा क्वचितच आढळतो. मंडळींत बसून हसावें, खेळावें, मजा मारावी, अशी त्याची इच्छा असते. आतां हे गुण ज्या माणसांत आहेत तो मनुष्य सद्वर्तनी असतोच अशी मात्र खात्री देतां येत नाहीं. तथापि अशा प्रकारची वृत्ति स्नेहसंबंध जडविते. मंडळींत ऊठबस होत असल्यामुळें प्रसंगोपात्त एकमेकाला उपयोगी पडण्याची बुद्धीही आपोआपच होते. या कारणास्तव अशा लोकांच्या समाजांत शिस्त राहूं शकते. जनावरांनाही कळप करून राहण्याची संवय आहे, एवढेंच नव्हे तर जनावरांइतकी संगतीची आवड रानटी लोकांत असतेच असें म्हणवत नाहीं. रानटी मनुष्य क्रूर असतो असा सामान्यतः समज आहे आणि तो खरा आहे. पण हें त्याचें क्रौर्य फक्त युद्धकर्मांतच प्रकट होतें. एरवीं तो चांगलाच माणसाळलेला आहे. तो घर करून राहतो, कुटुंब बनवितो व शेजारधर्म पाळण्याला कमी करीत नाहीं. अशा समाजांतून वाईट मनुष्य खड्यासारखा बाहेर टाकला जातो. त्याचा या समाजांत निभाव लागत नाहीं. सुधारलेल्या समाजांत मात्र उलट प्रकार झालेला अनुभवास येतो. कायद्याच्या नांवाखालीं सुष्ट आणि दुष्ट या दोघांचेंही रक्षण समाज करतो.

माणसांचे अनेक संघ बनलेले आपल्याला दिसतात, पण ते स्नेहभावानें अथवा संगतिप्रियतेनें बनलेले असतात असें मात्र नव्हे. सर्वांत प्रचंड संघ म्हणजे राष्ट्र होय. परंतु राज्यें व अधिराज्यें आजपर्यंत तरी निदान एका बाजूला पाशवी शक्ति व दुसऱ्या बाजूस भीति यायोगानेंच बनलेलीं आहेत. मुलुखागिरी करावयाची असली म्हणजे लोक संघटित होतात, त्याचप्रमाणें सर्वांवर सारखेंच कोसळणारें संकट टाळण्याकरितांही त्यांना एकवटावें लागतें. म्हणून जेत्यांचा आणि जितांचा एक संघ कधींही बनत नाहीं. हिंदुस्थानांतील इंग्रज राज्यकर्त्यांत तुसडेपणा दिसून येतो याचें कारण हेंच होय.

पूर्वकालीन समाजस्थैर्याला प्रत्येकानें शेजारधर्मास अनुसरून आचरण केलें तर तितकें पुरें होत असे. सध्यांचा समाज अशा स्थितीला येऊन पोंचला आहे कीं, आतां प्रकृतिधर्म मागें पडून विचारशक्तीची गरज अधिक भासते. समाजाचीं स्थित्यंतरें होण्यास नैतिक कारणांपेक्षां आर्थिक कारणेंच अधिक प्रभावी होतात. म्हणून असा निष्कर्ष निघतो कीं, संघ करून राहण्याची स्वाभाविक प्रवृत्ति मनुष्यांत असली तरीसुद्धां त्या समाजाची प्रगति होणार

नाहीं. संघशक्तीचें महत्त्व ज्या समाजांतील लोकांना पटतें आणि उत्तम प्रकारची समाजघटना करण्याची अक्कल ज्यांच्यांत आहे त्याच समाजाचें पाऊल पुढें पडतें. म्हणून रानटी लोकांचे संघ स्वाभाविक रीत्या बनत, तर हल्लींच्या सुधारलेल्या लोकांचे संघ कृत्रिम रीतीनें बनत असतात. प्राचीन समाजांत संघांतील लोक थोडेच असल्यामुळें ते वैयक्तिक स्नेहानें एकमेकांशीं बद्ध झालेले असतात. रानटी लोकांचा संबंध बाहेरच्या लोकांशीं आला तर तो नाचासारख्या प्रसंगानें येतो. अशा रीतीनें दोन संघांतील लोकांचा घरोबा जडल्यास तो सहकारी तत्त्वानुरोधानें जडतो. हा दुसऱ्या प्रकारचा संबंध पहिल्या प्रकारच्या संबंधाहून अधिक व्यापक असतो. सुधारणेची बरीच मजल मारलेल्या समाजांत ज्यांचें प्रत्यक्ष कधीं मुखावलोकन झालेलें नाहीं अशाच लोकांशीं निकट संबंध जडण्याचे प्रसंग येतात. गांधींच्या अनुयायांत गांधींचें तोंडही ज्यांनीं कधीं पाहिलें नाहीं असे किती तरी लोक असतील. परंतु घरच्या माणसांवरसुद्धां नसेल इतकें प्रेम व इतकी निष्ठा या अनुयायांची गांधींवर आहे. यावरून असें उघड होतें कीं, समविचारांचाच संघ बनणें हें सुधारणेचें द्योतक होय. मोठमोठ्या शहराकडे आपण पाहिलें तर आपणांस असें सहज दिसून येण्यासारखें आहे कीं, त्यांतील लोक स्नेहबद्ध होऊन एकत्र राहिलेले नाहींत. शहरांतील समाज गुण्यागोविंदानें नांदत असतो याचें मुख्य कारण म्हणजे एकमेकांचे हितसंबंध एकमेकांत गुंतलेले असतात. हे संबंध कोणी तोडूं म्हणेल तर त्याला उपाशीच राहावें लागेल. पैसे मिळविणें ही ज्यांची महत्त्वाकांक्षा आहे अशा स्वार्थी माणसांकडून शहरें वसविलीं जातात. शहरांत कोणी कोणाची फिकीर करीत नाहीं. प्रत्येकजण स्वतःकरितां धडपडत असतो. त्यांतल्यात्यांत स्नेहशीलता हा मनुष्यांचा धर्म असल्यामुळें लहान लहान बनलेले अनेक संघ शहरांत दृष्टीस पडतात. तेव्हां शहरांतील माणसांत असलेली शिस्त सोबतीच्या आवडीमुळें लागत नसून नुकसानीच्या भीतीनें लागत असते. तें कांहींही असो, अद्यापि तरी स्वार्थ व परमार्थ यांचें तादात्म्य मानणारे लोक फार थोडे आहेत. उलट असा कांहीं चमत्कार दिसून येतो कीं, शहरांतील लोक समाजाला कंटाळून मनाला रमविण्याकरितां वनाचा आश्रय करितात. विचार करणाऱ्या माणसाला समाजाचा संपर्क नडतो हें कांहीं खोटें नाहीं. हा प्रकार रानटी माणसाच्या अगदीं विरुद्ध दिसतो. यावरून सोबतीची

आवड अथवा समाजशीलता वर्तमानकालीन समाजाच्या शिस्तीला पुरी पडत नाहीं हेंच सिद्ध होतें.

लहान मुलाच्या वागणुकीकडे सूक्ष्म रीतीनें पाहिल्यास न्यायबुद्धीचा उगम कसा व कोठें होतो हें ध्यानांत येईल. लहान मुलास स्वतःचाच अनुभव असल्यामुळें आपल्यावरून तो दुसऱ्याची स्थिति समजून घेतो. दुसऱ्याची स्थिति समजण्यास त्याला अन्य मार्गच नाहीं. आपल्यावरून तो जगाची परीक्षा करीत असतो. आपल्याला भूक लागते तशीच आईला लागत असेल, अशा विचारानें 'आई, तूं कां जेवली नाहींस?' असा तो तिला प्रश्न करितो. थोडें आणखी जास्त समजूं लागलें म्हणजे दुसऱ्याचे हितसंबंध व त्याचे हितसंबंध यांची भेसळ होते. अशा वेळीं दुसऱ्याच्या हितसंबंधाला तो स्वतःइतकेंच महत्त्व देतो. मला जसें वाटतें तसेंच दुसऱ्याला वाटत असावें, हें त्याच्या बालबुद्धीला पटत असतें. मी व तूं अथवा तो यांमध्यें तो फरक करीत नाहीं. सर्व जग आपल्यासारख्या माणसांनींच भरलें आहे अशी ज्या माणसाची समजूत होते, तो दुसऱ्याच्या हिताचा विचार आपल्या दृष्टीनें करतो. अशा विचारांत आपपरभाव नसतो. मी व तो यांत भेद करण्यास सुरुवात झाली म्हणजे अन्यायबुद्धि डोकें वर करते. लहान मुलगा आपल्या अल्पवयस्क बहिणीला जेव्हां फसवितो तेव्हां ती लहान आहे, मी मोठा आहें, ती मुलगी आहे, मी मुलगा आहें, असा भेद करून तो आपल्या फसवेगिरीचें समर्थन करतो. हीच गोष्ट मोठ्या माणसांचीही आहे. गुलामासंबंधीं धन्याचें वर्तन अशाच कारणामुळें अन्यायाचें होत असतें. गुलाम हा माझ्यापेक्षां निराळा आहे, म्हणजे माझ्याहून कमी दर्जाचा आहे; म्हणून त्याला चांगले पदार्थ खावयास न मिळाले अथवा भरपूर वस्त्र पांघरावयास नसलें तरी तें योग्यच आहे, असें या भेदबुद्धीमुळें धन्यास वाटूं लागतें. जेते जितांना आपल्याहून कमी योग्यतेचे समजतात, त्यामुळें त्यांच्याशीं वागतांना नीतिनियम पाळले नाहींत तरी त्यांत कांहीं पाप नाहीं असें त्यांस वाटत असतें. इंग्रज लोक आपापसांत वागतांना जितकें नैतिक आचरण ठेवीत असतात तितकें हिंदी लोकांशीं वागतांना ठेवलेंच पाहिजे असें त्यांचें नीतिशास्त्र सांगत नाहीं. याचें कारण हिंदी लोक आपल्याहून हीन दर्जाचे, हीन संस्कृतीचे आहेत असें त्यांना मनांतून वाटत असतें. समबलांचा सामना होतो तेथेंच

नीतिनियम पाळण्याची खबरदारी घेण्यांत येते, असें यावरून निदर्शनास येण्यासारखें आहे. तात्पर्य, भाषा, जात, वर्ण, धंदा, गारिबी इत्यादि बाह्योपाधींकडे दुर्लक्ष करून मनुष्यत्वाच्या समत्वभावनेनें जो वागतो तोच न्यायाचें वातावरण उत्पन्न करतो.

याशिवाय जगांत असे कांहीं लोक असतात कीं, मीच काय तो एकटा या जगाचा मध्यबिंदु आहे, म्हणून माझ्या भोंवतींच सर्व जग फिरलें पाहिजे, असें त्यास वाटत असतें. माझ्याकरितांच परमेश्वरानें सर्व पदार्थ निर्माण केले आहेत, त्यांचा उपभोग मलाच एकट्याला घेतां आला पाहिजे, अशा भावनेनें प्रेरित होऊन ते लोकांशीं वागत असतात. अशा वागणुकींत अन्याय रुतलेला असल्यास त्यांत विशेष आश्चर्य नाहीं. मनुष्यामध्यें स्वभावतःच आढळून येणाऱ्या दया, माया, स्नेह इत्यादि मनोविकारांच्या योगानें अशा माणसाकडून सद्वर्तन होईल तेवढेंच; एरवीं जेथें या सहज प्रवृत्तींची मजल पोंचत नाहीं, तेथें त्यांच्याकडून इतरांच्या संबंधानें अन्यायाचें वर्तनच घडत असतें.

सहानुभूति आणि न्यायबुद्धि हीं एक नव्हत. त्यांच्यामध्यें मूलतःच भेद दिसतो. सहानुभूति ही मनुष्यांत त्याच्या जन्माबरोबरच उद्भूत झालेली असते. परंतु न्यायबुद्धि हें विचाराचें कार्य आहे. सहज प्रवृत्तीला दाबून न्यायबुद्धीला तिची जागा पटकवावी लागते. न्यायबुद्धीची वाढ व पोषण हीं समाजशासनांनीं करावीं लागतात. उपजतच जो धर्म मनुष्यांत व्यक्त होतो त्याच्या वाढीकरितां कृत्रिम उपायांचें कारण पडत नाहीं. समाजाचे कायदे असे असावे लागतात कीं, त्यांच्या योगानें न्यायबुद्धि जागृत राहील; परंतु जर याच्या उलट प्रकार असला, म्हणजे समाजाचे उक्तानुक्त नियम जर सदोष असतील तर मनुष्यांची न्यायबुद्धि बोथट होईल. प्रसंगीं ती लुतही होण्याचा संभव आहे. मनुष्याच्या न्यायबुद्धीचें ढळढळीत उदाहरण युद्धक्रियेंत दिसून येतें. युद्धांतील दोन्ही पक्ष युद्धाचे नियम पाळीत असतात याचें कारण न्यायबुद्धीशिवाय दुसरें काय असूं शकणार ? द्वंद्वयुद्धांत परस्परांचा जीव घेऊं पाहणारे पुरुषही द्वंद्वयुद्धाचे नियम आनंदानें पाळतात. हें सहानुभूतीचें कार्य आहे असें कोणाला ध्वनितही करतां येणार नाहीं. दुसरा मनुष्य पेंचांत सांपडला असतां त्याचा फायदा घेऊन स्वार्थ साधूं नये असें त्यास वाटतें असें नव्हे; तर आपणही संकटांत सांपडलों असतां दुसऱ्यानें

त्याचा फायदा घेऊं नये असें त्यास वाटत असतें; आणि त्याच भावनेनें त्यांच्याकडून न्यायाची वागणूक होते. निःशस्त्र माणसाला शस्त्र घेऊन मारणें हें असल्याच कारणानें अन्यायाचें ठरतें. दरोडा घालावा, पण चोरी करूं नये; दुसऱ्यास फसवावें, पण विश्वासघात करूं नये; मारावयाचें असेल तर भर दिवसां मारावें, झोपेंत मारूं नये; असें वाटणें हें न्यायबुद्धीचेंच फळ होय. आपण दिलेलें वचन पाळलें पाहिजे, उसने घेतलेले पैसे परत दिले पाहिजेत, असें मनुष्याला वाटतें त्याचा उद्गम त्याच्या न्यायबुद्धींतच असतो. यामधूनच कर्तव्याच्या कल्पनेची उत्पत्ति झाली आहे. युद्ध करण्यामध्यें नीतिबंधनें कशीं पाळलीं जातात याचें आतां आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं. खेळ,व्यापारधंदा, राजकारण यांत नेहमीं समानाबरोबरच व्यवहार होत असतात. म्हणून यांतील दोन्ही बाजूंच्या लोकांत औदार्य, न्यायप्रियता, प्रामाणिकपणा इत्यादि वरिष्ठ प्रकारचे गुण आढळून येतात. पण जेते एकदां राज्य करूं लागले म्हणजे त्या राज्यकर्त्यांत वरील गुणांचा लोप होतो; कारण मागें सांगितल्याप्रमाणें जितांना ते आपल्याहून कमी लेखतात. इकडे राज्यकर्त्यांकडून अशा रीतीनें अन्याय वर्तन होतें, तर परसत्तेखालीं प्रजा नेभळी व निःसत्त्व बनल्यामुळें तिच्याकडून कुटिल नीतीचा अवलंब करण्यांत येतो. शूर मनुष्य सरळ असतो, पण दुबळ मनुष्य अप्रामाणिकपणाच्या युक्त्यांवर आपलें संरक्षण करीत असतो. अशा रीतीनें जित व जेते अथवा राज्यकर्ते व प्रजा या दोघांचाही अधःपात होतो.

न्यायबुद्धि आणि ममताळूपणा यांमध्यें किती अंतर आहे हें निरनिराळ्या समाजांच्या वागणुकीवरून दिसून येतें. कोणत्याही गोष्टीसंबंधानें बरेचसे युरोपियन लोक हें बरोबर आहे काय असा प्रश्न करतील. उलट चीन देशांतील लोक हें दयाळूपणाचें आहे काय असें विचारतील. इंग्रज लोक आपल्या हक्काविषयीं आग्रह धरितात आणि त्या हक्कावर कोणी गदा आणिल्यास तो गुन्हा समजतात. चिनी लोक सर्व परिस्थितीचा विचार करून मनुष्यानें अशा वेळीं काय केलें असतें याचा विचार करितात. एखाद्या श्रीमंत मनुष्याकडे पोटाकरितां गरिबानें लहानशी चोरी केली तर त्याबद्दल ते त्याला फारसा दोष लावणार नाहींत; पण गरिबाला लुबाडणें हा ते अधिक भयंकर अपराध समजतात. अशा प्रकारची मनोवृत्ति बनण्यास भौगोलिक कारणें असतात; परंतु त्यांचा येथें फारसा विचार कर्तव्य नाहीं. थंडीच्या देशांत

मनुष्य घरांत कोंडून घेतो, उष्ण प्रदेशांत घराच्या बाहेर असतो. यामुळें दोन्ही समाजांच्या लोकांचे निरनिराळ्या दिशेनें स्वभाव बनणें स्वाभाविक आहे. येथें आपल्याला जें ठरवावयाचें आहे तें हें कीं, न्यायबुद्धीनें वागण्याची प्रवृत्ति ही समाजाच्या शिस्तीला कितपत कारणीभूत होते. वर वर्णन केलेल्या न्यायबुद्धीच्या योगानें इतर लोक कसे वागतात, त्यांच्या वागणुकीचे नियम कोणते याची चौकशी करून तदनुसार तो वागेल. म्हणजे समाजाला लागलेली शिस्त तो मोडणार नाहीं; परंतु शिस्त नसलेल्या समाजाला शिस्त लावण्याचें काम अशा माणसाकडून होईल असें मानावयास कारण दिसत नाहीं. शिवाय समाजाकरितां व्यक्तीचा बळी दिला पाहिजे, ही गोष्ट त्याच्या न्यायबुद्धीच्या क्षेत्रांत येण्यासारखीही नाहीं. ' घर आणि चोप ' अशा प्रवृत्तीच्या समाजाला असल्या माणसाचा पाठिंबा मिळेल व शांततेचाही तो पुरस्कार करील. चार लोकांची रीत सोडून वागलें नाहीं म्हणजे अशा माणसाची न्यायदेवता संतुष्ट होते. तात्पर्य, केवळ न्यायशीलतेनें समाज सुव्यवस्थित होईलच असा नेम नाहीं.

रहदारीच्या रस्त्यावर पोलीस शिपाई उभा नसतांना एखादा गाडीवान दुसऱ्याच्या गाडीला मोडतोड होईल या भीतीनें अथवा आपल्या स्वतःच्याच गाडीचें नुकसान होईल या भयानें धकाधकी करण्यापासून परावृत्त होईल, त्याचप्रमाणें दया, माणुसकी अथवा न्यायबुद्धि यांचा, आगळिक करण्यापासून मनुष्याला परावृत्त करण्याच्या कामीं जेथें उपयोग होत नाहीं अशा ठिकाणीं तो मनुष्य केवळ प्रत्याघाताच्या भीतीनें माघार घेण्याचा संभव आहे. तात्पर्य, समाज सुव्यवस्थित चालण्यास सहानूभूति, समाजशीलता, न्यायशीलता आणि प्रत्याघाताचें भय हीं कारणीभूत होतात. यांपैकीं पहिले तीन गुण हे कर्त्याच्या ठिकाणीं असतात. उलटपक्षीं चौथें कारण आपल्या कर्माचा परिणाम ज्याच्यावर घडतो अशा माणसाच्या ठिकाणीं असलेला मनःसंताप हें होय. ही प्रत्याघाताची बुद्धि आत्मरक्षणार्थ उत्पन्न झालेली आहे. आपण जगावें ही जी मनुष्याला उत्कट वासना असते तिच्यामुळें आपल्या अंगावर कोणी चालून आल्यास अथवा आपल्याला कोणी इजा केल्यास आपणाला उलट क्रिया करण्याची इच्छा होते. विचाराअंतीं, प्रत्याघाताच्या क्रियेचें पर्यवसान समता स्थापन करण्यांतच होतें असें एका दृष्टीनें

म्हणतां येईल. माझा दांत ज्यानें पाडला त्याचा दांत मी पाडीन, माझा डोळा ज्यानें फोडला त्याचा मी डोळा फोडीन असें वाटणें म्हणजे सूड उगविण्याचा जो मूळ स्वभाव त्यावर विचाराचा मुलामा देणें होय. आपल्याला इजा करून दुसऱ्यानें जो कमीपणा आणिला, म्हणजे विषमताच निर्माण केली, ती नाहींशी करून पुनः दोघांनीं समबलच राहावें याकरितां जितकें माझें नुकसान झालें तसें करण्यानें अपकृत माणसाचें समाधान होतें. क्षुद्र स्वरूपांत राग हा सहजधर्म होय. परंतु उच्च स्वरूपांत अन्याय सहन न करण्याचा अभिमान असेंही त्याला म्हणतां येईल. अन्यायाचें कृत्य करण्यापासून मनुष्य जितका परावृत्त होईल, त्या मानानें अन्याय सहन न करण्याचा त्याला त्वेष येईल. मनुष्यामध्यें न्यायबुद्धि असली म्हणजे दुसऱ्यांच्या हक्काबद्दल त्याच्या ठिकाणीं पूज्यबुद्धि उत्पन्न होते आणि तो आपण होऊन कोणाची कुरापत काढीत नाहीं. दुसऱ्या बाजूनें पाहिलें तर आपले हक्क प्रस्थापित करण्याच्या तत्परतेमुळें तो आगळिक होऊं देत नाहीं. एवढ्याचसाठीं राग हा सहजधर्म असला तरी तो एक गुण आहे व त्याची उपयुक्तताही आहेच आहे. समान हक्क स्थापून सर्व मनुष्यांना समबल करण्यांत त्याचा उपयोग होतो. प्रत्याघात करण्याची बुद्धि जर मनुष्यांत नसेल आणि आपल्याला होणाऱ्या उपद्रवासंबंधानें मनुष्य जर नुसत्या नफातोट्याचा विचार करूं लागेल तर बलिष्ठापुढें मान लववून आपल्या दुर्बलतेला अनुरूप असें स्थान तो मुकाट्यानें पत्करील. अशा रीतीनें असमबल मनुष्यांत कधींही समता उत्पन्न होणार नाहीं. निःशक्त मनुष्य आपला दुबळेपणा सूडाच्या जोरावर भरून काढतो.

आपण होऊन आगळिक करणाऱ्या माणसांत स्वार्थ साधण्याच्या वासनेनें एकप्रकारची धिटाई आलेली असते. कारण स्वार्थ साधावयाचा नसल्यास कोणीही मनुष्य दुसऱ्याच्या वाटेला विनाकारण जाणारच नाहीं. परंतु याच्या स्वार्थाला बळी पडला जाणारा जो मनुष्य त्याच्यांत मनःसंतापामुळें धैर्य आलेलें असतें. या दोघांची क्रिया मनोविकारांनींच जर प्रेरित झाली तर दोघांमध्येंही तितकेंच धैर्य असल्याचें अनुभवास येईल. अपकार केलेल्या माणसाच्या मनाला तो अपकार विषासारखा भासत असतो म्हणून तो दुर्बल असतां मोठ्या आडदंडाला भारी होतो. या सूडाला भिऊनच पुष्कळ माणसें

दुसऱ्याच्या वाटेस जात नाहींत. सूडाची भावना जबरदस्त असल्यामुळें आपण होऊन आगाळिक करणाऱ्यांना चांगलीच दहशत बसते. या कारणास्तव समाजांत सुव्यवस्था निर्माण करण्यास तिचा फार उपयोग होतो. यामुळें विषम स्थितींतील माणसांतही समता उत्पन्न होते.

एखाद्या नवीन बिनवस्तीच्या ठिकाणीं कांहीं लोक सोडले व त्यांच्यावर कोणताही प्रतिबंध ठेविला नाहीं तर अशी स्थिति होईल कीं, आडदांड व उर्मट अशा लोकांची एकमेकांशीं घासाघीस होऊन त्यांच्या चकमकी उडतील आणि दोघेही अखेरीस नाश पावतील. तसेंच जे निःसत्त्व असतील ते मरतील, पळून जातील, किंवा बलिष्ठांच्या टाटाखालचीं मांजरें होऊन बसतील. म्हणूनच त्या दोन्ही प्रकारच्या लोकांचा सामाजिक शिस्तीच्या कामीं उपयोग होत नाहीं. अशा प्रकारचीं माणसें पाहिजेत कीं, त्यांच्यांत आपल्याला कोणी उपद्रव केला असतां त्याचा प्रतिकार करण्याची धमक व निश्चय असून दुसऱ्याला फसविण्याची बुद्धि असूं नये. अशीं माणसें असतील तरच समाज टिकूं शकेल.

आतां अपकार केलेला मनुष्यच सूड उगवतो असें नाहीं. त्याच्याशिवाय त्याच्या कुटुंबांतलीं आणि जातीचीं माणसें अपकारकर्त्याला शासन करण्यास उद्युक्त होतात. अशा वेळीं या सूडाचें स्वरूप फारच अघोर असतें. या धास्तीमुळेंहि कित्येक लोक दुसऱ्याची आगाळिक करण्याच्या भरीस पडत नाहींत. एखाद्या माणसाचा कोणी खून केला तर त्याचा सूड उगाविण्यास मयताचीं माणसें पुढें येत नाहींत असें क्वचित् घडतें. ही सूडाची प्रवृत्ति फारच बोकाळली असती; पण वृद्ध माणसें मध्यें पडून जास्त हत्या न होऊं देण्याचा प्रयत्न करतात. माणसाला माणूस घेण्याच्या ऐवजीं ते दुसरी कांहीं तडजोड काढतात. मृत्यूमुळें झालेलें नुकसान देवावितात किंवा अशाच प्रकारचा दुसरा कांहीं उपाय अंमलांत आणितात. अशा रीतीनें हळू हळू व नकळत सूडाचें स्वरूप जें वैयक्तिक असतें तें सामाजिक बनतें. उसनें न फेडतां दिलेलें दुःख निमूटपणें सोसण्यांत फारच कमीपणा येतो. सर्व लोक त्याची छीःथू करितात. निष्कारण ज्याला कोणी त्रास दिला असेल अशा माणसांचा संताप किंवा त्वेष याला एकप्रकारचें पावित्र्य उत्पन्न होतें; आणि म्हणून त्याच्या आड कोणी येऊं नये अशी रानटी लोकांची समजूत असते.

जशास तसें हें त्यांचें शास्त्र असतें. कायद्यांच्या अभावीं अपकारकर्त्यास शासन करण्याची जबाबदारी अपकार झालेल्या माणसावरच असते. या स्वाभाविक प्रवृत्तीचा लोप आजपर्यंत कायदा करूनच करावा लागला आहे.

'माझी खोड तूं काढूं नको, तुझी मी काढणार नाहीं' असली वृत्ति जेथें समाजांतील व्यक्तींचे परस्पर संबंध सरळ असतात तेथें कामीं येते. परंतु हे संबंध जेथें गुंतागुंतीचे आणि सूक्ष्म असतात तेथें या वृत्तीनें काम भागणारें नसतें. सुधारलेल्या समाजांत परस्परांचे हितसंबंध इतके बारकाव्याचे असतात कीं, दोघांमध्यें वाद उत्पन्न झाला असतां चटकन निर्णय करणें कठीण पडतें आणि प्रत्येक मनुष्य माझेंच बरोबर आहे अशा दृढ भावनेनें मरण्यास तयार होतो. अशा ठिकाणीं सूडाची कल्पना असत नाहीं. तेव्हां अशा प्रकारचा वाद उपस्थित झाला असतां त्याचा निर्णय करण्यास तिऱ्हाईतच लागतो. म्हणून औद्योगिक समाजांत अशाकरितां कांहींतरी तजवीज करून ठेवणें भाग पडतें. प्रगमनशील नसणाऱ्या अशा स्थिर समाजांत वहिवाटीप्रमाणेंच निकाल करण्यांत येतो; व तेवढ्यानें त्या समाजाचें काम भागतें. पेशवाईंत वहिवाटीवांचून दुसरें निर्णयाचें शास्त्र कोणाला माहीतच नव्हतें. परंतु ज्या समाजांत एकसारखा फेरबदल होत आहे, कालची गोष्ट आज टिकत नाहीं आणि आजची उद्यांला राहात नाहीं, अशा समाजांत नुसत्या वहिवाटीवर विसंबून पुरें पडत नाहीं. बाहेरचीच कांहीं तरी सत्ता असले वाद मिटविण्यास अवश्य आहे. या सत्तेच्या अभावीं समाजाच्या चिंध्याच उडतील. लोकांनीं कसें वागावें याची एकदां पद्धत घालून दिली म्हणजे सूडाचें कारणच राहात नाहीं. ज्या कृत्याबद्दल समाजानें दावा साधला पाहिजे त्याबद्दल व्यक्तीला सूड उगवूं देणें हितावह नाहीं. कारण ठोशास ठोसा लगावून दिला असतां समाजांत एकसारखीं भांडणें, मारामाऱ्या व बेशिस्त यांचें साम्राज्य होईल. समाज हा अमूर्त असल्यामुळें त्यानें केलेल्या कृत्याबद्दल सूडाची बुद्धीच उत्पन्न होत नाहीं. म्हणून सुधारलेल्या समाजाचें पहिलें कर्तव्य केलेल्या अपराधाचें शासन परस्पर व्यक्तीला करूं न देणें हें होय. वैयक्तिक सूड कायद्याच्या योगानें बंद पडतो, इतकेंच नव्हे, तर आत्मसंरक्षणाचें क्षेत्रही कायद्यानें आकुंचित करण्यांत येतें. समाजांतील व्यक्तीला निष्कारण त्रास दिला असतां तो समाजालाच दिला आहे असें समाज समजतो. समाजाचें प्रतिनिधित्व

राजाकडे असतें. तेव्हां हा मलाच त्रास दिलेला आहे अशा भावनेनें त्रास देणाऱ्याला शिक्षा करणें ती राजाकडून केली जाते. सर्व प्रकारच्या आगळिकी-मुळें सार्वजनिक शांततेचा भंग होतो असें समाज मानतो; आणि म्हणून व्यक्तीच्या हातून काढून घेतलेला शासन करण्याचा अधिकार न्यायाधिशावर सोंपविला जातो.



वि. रा. शिंदे ( १८७३–१९४४ )

## १३. धर्मसंघाची आवश्यकता

हल्लीं आमच्या देशांत कसा विपरीत प्रकार चालला आहे पहा. चांगले शिकलेले कांहीं पुढारी देखील खाजगी संभाषणांत उघडपणें म्हणतात कीं, हल्लीं चहूंकडे राष्ट्रांराष्ट्रांमध्यें किती झटापट चालली आहे, बलवान् दुर्बळाला कसा खालीं रगडीत आहे. अशा वेळीं धर्माच्या आणि सामान्य बंधुत्वाच्या गोष्टी सांगत बसणें योग्य नव्हे. निदान आमच्यासारख्या मागासलेल्या देशानें तरी केवळ सात्त्विकपणा स्वीकारणें शहाणपणाचें होणार नाहीं. आम्ही आधीं राजसी गुणच वाढवून इतरांची बरोबरी केली पाहिजे म्हणजे नंतर समानतेच्या गोष्टी सांगितल्यास कांहीं तरी शोभेल. असें प्रतिपादणारे धर्माचा आणि सात्त्विकपणाचा कांहीं भलताच अर्थ समजत असतात. त्यांच्या मतें शौर्य, वीर्य इत्यादि गुण म्हणजे जणूं सात्त्विक नव्हतच. सात्त्विकपणा म्हणजे नुसतें नेहमीं सहन करून असणें असा केवळ निषेधार्थी अर्थ समजला जातो. पण वस्तुत: पाहतां सत्त्व म्हणजे तर शुद्ध शक्ति असा अर्थ आहे. विशेषेंकरून वरील विचार करणारे जेव्हां जपानचें सुप्रसिद्ध व सर्वसामान्य उदाहरण पुढें आणून आपलें राजसी मत जोरानें प्रतिपादतात तेव्हां तर धार्मिक प्रयत्न करणारांचें तोंड अगदीं बंदच होतें कीं काय अशी भीति पडते. जपानचे लोकांनीं जी ही अकल्पिक सरशी केली त्याचेपूर्वी त्यानें कधीं व कोणता धर्म-संघ स्थापला होता ! उलट हिंदुस्थानानें आज गेलीं पाऊणशें वर्षें ब्राह्मसमाज, प्रार्थनासमाज, आर्यसमाज इत्यादि कित्येक संघ रचून काय दिवे लाविले आहेत ! जपानच काय पण हल्लींचे बहुतेक सर्वच पुढें असलेले देश धर्म-बाबतींत अगदीं उदासीन आणि जडवादी होत चालले नाहींत काय ! मग आम्हीच हा कोरडा काथ्याकूट कां करावा इत्यादि अनेक आक्षेप वरील मंडळीचे निघतात. धर्मसंघ म्हणजे मतांची कोरडी काथ्याकूट करणारी मंडळीच. एवढाच अर्थ असेल तर वरील युक्तिवाद्यांशीं निदान ब्राह्म आणि प्रार्थना-सामाजिकांची बरीच सहानुभूति जमेल. पण संघाचा अर्थ अगदीं उलट आहे.

म्हणून वरील प्रश्नास उत्तरादाखल उलट थोडक्यांत एवढाच प्रश्न केल्यास पुरे आहे. तो हा कीं, जपानांत आणि इतर पुढें सरसावलेल्या देशांत धर्म-बाबतींत लोकांना जें झपाट्यानें स्वातंत्र्य मिळत चाललें आहे आणि त्यामुळें व्यक्तीचें व राष्ट्राचें शील वाढत चाललें आहे, त्याचें खरें कारण तेथील धर्मविषयक औदासीन्य, कीं धर्मविषयक विचार आणि उलटपक्षीं आमच्या देशांत धर्माच्या नांवाचें आचारविचारांचें जें पुरातन पारतंत्र्य साम्राज्य चालू आहे आणि त्यामुळें शीलाची हानि होते तिचें खरें कारण आमची धर्मप्रवृत्ति कीं धर्मविषयक औदासीन्य बरें ! ह्या दृष्टीनें पाहतां, जपानांत जरी ब्राह्म-प्रार्थनासमाजांप्रमाणें धर्मसंघ स्थापण्यांत आले नसतील तरी ब्राह्म-प्रार्थना-समाजांचें कार्य जें उदार आत्मिक प्रवृत्तींचा देशांत प्रसार करण्याचें, तें जपानांत खास होत असलें पाहिजे. त्याशिवाय सर्व जगांत थक्क करून सोडणारें इतकें राष्ट्रीय तेज व नैतिक बळ एकाएकीं उत्पन्न होणें शक्य नाहीं, हें निःसंशय आहे. तसेंच पण हेंही निःसंशय आहे कीं, हा जो जपानांतील आत्मिक व नैतिक बळाचा झरा आपल्या भोंवतीं सांचलेलें जड आच्छादन फोडून वर वर पाहणारास जणूं अकस्मात् आणि यदृच्छेनेंच बाहेर आला आहे असें वाटतें त्या झऱ्यावर जर वेळींच चोहोंकडून योग्य बांध पडले नाहींत आणि त्याचे प्रगतीवर धर्मसंघ बनले नाहींत, तर हा वर आलेला पूर केव्हांच ओसरून जाईल आणि पुनः जपान जें आज जगाच्या आनंदाला व आश्चर्याला पात्र झालें आहे तें पुढें अनुकंपेला पात्र होईल. इतकेंच नव्हे तर हल्लीं कित्येक खोल दृष्टीचे प्रवाशी जपानाच्या उथळपणाविषयीं प्रसंगवशात् इषारा देत आहेतच. एकंदरींत पुढारलेलें चिमुकलें जपान काय किंवा मागासलेलें अवाढव्य हिंदुस्थान काय दोहोंपक्षीं धर्मसंघाची सारखीच आवश्यकता आहे. अवर्षण पडलें असतां खोल विहिरी खणून पाणी काढणें किंवा अतिवृष्टीमुळें पूर आला असतां जागजागीं बांध घालून पाणी सांठवणें ह्या दोन्ही गोष्टी जशा शहाण्या बागवानाच्या दृष्टीनें सारख्याच महत्त्वाच्या व जरूरीच्या आहेत तद्वतच जपानांतल्यासारखा साहजिक उद्रेक झाला काय किंवा हिंदुस्थानांतल्याप्रमाणें कितीही खडक फोडला तरी ठणठणीतपणाचा देखावा दिसला काय, सुज्ञ दूरदर्शी व लोकहितकारी जे ऋषि आहेत त्यांना धर्मसंघाची आवश्यकता दोन्ही प्रसंगीं सारखीच भासेल. जगाच्या एका कोपऱ्यांत एकदां असा स्फोट झाला म्हणून सात्त्विक प्रयत्नाची कधींही व कोठेंही जरूरी नव्हती, किंवा

निदान हल्लीं आमच्या देशांत तर हमरीतुमरी आणि मारामारीसंबंधीं नुसता बोलण्याचा सुकाळ केला कीं, इतिकर्तव्यता झाली असें समजणें म्हणजे ह्या विपरीतपणाला सीमाच नाहीं म्हणावयाची.

ह्या जगांत मनुष्य मनुष्यावर आजपर्यंत अनेक कारणांवरून अथवा सबबी-वरून जी सत्ता चालवीत आला आहे ती चार प्रकारची आहे. (१) राजकीय, (२) धार्मिक, (३) सामाजिक, (४) औद्योगिक. ह्या चार सत्तांना अनुक्रमें (१) सरकार, (२) संघ ( अथवा अलीकडे समाज हें नांव अधिक प्रचारांत येऊं लागलें आहे ), (३) रूढि आणि (४) पत किंवा व्यवहार अशीं नांवें आहेत. ह्यांपैकीं पहिल्या दोन म्हणजे राजकीय आणि धार्मिक सत्तांची पुरातन काळापासून सर्व देशांत सुव्यवस्थित रीतीनें घटना होऊन चुकल्यामुळें ह्या दोन्ही चांगल्या नांवारूपास आल्या आहेत. म्हणजे अधिकाराचें मूळ, अधि-कारी पुरुष, अधिकारासंबंधीं नियम व त्यांची अंमलबजावणी हीं सर्व ठरलेलीं आहेत. अधिकाराचीं स्थानें व पद्धति कदाचित् देशकालाच्या मानाप्रमाणें बदललीं तरी सर्व अधिकार नष्ट होऊन अजिबात सत्ताच बंद पडली असें होणें शक्य नाहीं. शेवटच्या दोन सत्ता, रूढि आणि व्यवहार ह्यांचें मात्र कार्य वरील दोन सत्तांच्याप्रमाणें व्यवस्थेनें चालत नाहीं. कारण नियम, अधिकार आणि त्यांचीं स्थानें हीं ठरणें शक्य नसल्यामुळें ह्या दोन सत्तांचें असें दृश्यरूप दिसून येत नाहीं. तथापि त्या निराकारपणें अस्तित्वांत आहेतच.

वर सांगितल्याप्रमाणें मानवी समाजांत (१) सरकार, (२) संघ, (३) रूढि, (४) पत अशा चार प्रकारच्या सत्ता चालू आहेत. ह्यांपैकीं पहिल्या दोन साकार रूपानें व दुसऱ्या दोन निराकार रूपानें चालू आहेत. म्हणून पहिल्या दोन्हींसंबंधीं ज्या जुन्या संस्था बनून चुकल्या आहेत त्यांच्यांत कालमाना-प्रमाणें डागडुजी किंवा तोडजोड करणें अथवा नवीन संस्थांची भर घालणें हें त्यांच्या चालकांना शक्य आहे. असें करणें त्या त्या नेमलेल्या अधिकाऱ्यांचें कर्तव्य आहे. आणि तें कर्तव्य त्यांनीं बजावलें नाहीं किंवा बजावण्यांत कसूर केली तर त्यांच्याकडून तें कर्तव्य करविण्याचा उपजत हक्क सर्व जनतेस आहे. पण आश्चर्याची गोष्ट ही आहे कीं, हल्लीं आमच्या देशांत जो तो राजकीय सत्तेसंबंधीं आपला हक्क शाबीत करीत सुटला आहे. पण धर्मसत्तेच्या बाबतींतही प्रत्येक व्यक्तीस तितकाच उपजत हक्क आहे आणि धर्माचे अधिकारीही

कालामानाकडे दृष्टि देऊन आपली जबाबदारी पाळतात कीं नाहींत हें पाहण्याचें काम धर्मसंघाचा घटक या नात्यानें प्रत्येक व्यक्तीचें असून तिकडे कोणी ढुंकूनही पाहात नाहीं. मिळण्यासारखें असो किंवा नसो आम्ही राजकीय स्वराज्य मागूं लागलों आहों. पण धार्मिक स्वराज्य आमचें आम्हांला आहेच. तिकडे लक्ष देतो कोण ! आमचे धर्मगुरु मोठ्या मोठ्या संस्थानांचे मालक बनून बसले आहेत. वर्षांत दोन-चारदां हत्ती, घोडे, उंट इ० बड्या लव्या-जम्यानिशीं ते भिक्षेला निघतात त्या वेळीं आम्ही त्यांजपाशीं स्वराज्य मागतों काय ? मागें दिलेल्या कराचा हिशोब मागतों काय ? सालोसाल राष्ट्रीय सभे-मध्यें जशी आम्हांला पाहिजे त्या सुधारणांची एक यादी करून राजाकडे पाठवितो तशी धर्मबाबतींतही ठराव पास करून धर्मगुरूकडे पाठवितों काय ! राजकीय बाबतींत अंतिम सत्ता लोकांची आहे, राजा केवळ त्यांनीं नेमलेला अधिकारी आहे, हें तत्त्व आम्ही राजाला शिकवूं लागलों आहों तसें धर्मगुरूलाही तेंच तत्त्व लागूं करितो काय ! आमच्या देशांत किती तरी देवळांना सोन्याचे दरवाजे व रुप्याचे खांब आहेत आणि मूर्तींवर किती जडजवाहीर आहे, किती मौल्यवान् देणग्या व मातबर वतनें चालू आहेत, आणि एकंदरींत धर्माच्या नांवानें किती अवाढव्य खर्च बेदाद चालला आहे, आमच्या तत्त्वज्ञानावर किती शतकांचा गंज चढलेला आहे, आमच्या धार्मिक वाङ्मयावर किती भलत्याच आगंतुक विचारांचीं कोळिष्टकें आणि जळमटें वाढलीं आहेत, धर्माच्या नांवानें शेखी मिरविणारे आम्ही सर्व जगाचे धर्म-बाबतींत स्वतःस गुरु समजणारे स्वतः आमच्याच देशांत धर्मशिक्षण कसें अजीबात बंद पडत चाललें आहे, ह्या आणि अशा अनेक धर्मसंघांच्या बाबतींतील आमच्या हलगर्जीपणाकडे आमचें लक्ष जातें काय ! पाश्चात्यांचे इतिहास व पाश्चात्यांच्या चळवळी पाहून राजकीय हक्क मागण्याचे कामीं मात्र आम्ही त्यांचें अनुकरण करितों; पण धर्मसंघाचे बाबतींत पाश्चात्यांनीं आपल्या देशांत व जगभर जे भगीरथ प्रयत्न चालविले आहेत त्याचें अनुकरण तर राहोच, पण नुसतें अवलोकन तरी करितों काय ! पाश्चात्य लोक राजकीय कर देतांना आपल्या राजाशीं प्रत्येक पेनीबद्दलही भांडण्यास मागें घेत नाहींत, तेच आपल्या डोईजड धर्मगुरूच्या जुलमी सत्तेस आळा घालून आधुनिक समजुतीस शोभेल असे नवीन धर्मपंथ कसे काढीत

आहेत व आपल्या ह्या नवीन धर्माचा, आपल्या जीवंत नीतीचा, आपल्या शीलाचा प्रसार आफ्रिका आणि ऑस्ट्रेलियासारख्या ओसाड आणि जंगली देशांतही करण्याकडे कसा लक्षावधि रुपयांचा दरसाल खर्च करीत आहेत; लहान मुलांकरितां आदित्यवारच्या धर्मशिक्षणाच्या शाळा, गरीब बायका आणि विधवांकरितां उपयुक्त घरगुती कला शिकविण्याच्या संस्था, काम न मिळाल्यामुळें लफंगे आणि बदमाष बनलेल्या तरुणांना ताळ्यावर आणण्याकरितां सायंकाळचीं क्रीडाभुवनें, अनाथ व उनाड मुलांना एकत्र करून त्यांना शेतकी, सुतारी व विणण्याचे वगैरे धंदे शिकवून व उत्तर अमेरिकेसारख्या देशांत पाठवून तेथें वसाविलेल्या वसाहती, नवीन शिक्षणामुळें तरुणांनीं भकून जाऊं नये म्हणून अगदीं आधुनिक वाङ्मयांतूनच उदार आणि आध्यात्मिक विचार त्यांचे मनांत बिंबविण्याकरितां व्याख्यानमाला आणि सर्वसाधारण लोकांकरितां सर्व ललितकलांचा विकास ज्या ठिकाणीं पाहावयास मिळेल अशीं भव्य व मोहक उपासनामदिरें, अशा किती तरी गोष्टींत पाश्चात्य धर्मसंघांचें लक्ष गुंतलेलें आहे, तें आमच्या तिकडे गेलेल्या प्रवाशांच्या नजरेंत भरतें तरी काय ! हें होत नसून जर आम्ही नुसतें राजकीय स्वराज्यच मागत असलों तर मिळत नसलेल्या वस्तूबद्दल हट्ट व मिळालेल्या वस्तूबद्दल हेळसांड करणें हा केवळ पोरकटणा आम्ही करितों असें वाटून कोणीही आमच्या मागण्यांचा आदर करणार नाहीं.

आपल्यांतील जुन्याचे कित्येक अभिमानी विद्वान् आपल्यास नेहमीं असें भासवीत आहेत कीं सुधारलेल्या देशांत खिस्ती धर्माचीं मतें अगदीं ढांसळत आहेत आणि तेणेंकरून तिकडील धर्मसंबंधाचें वजन बहुजनसमाजावरून पार उडत चाललें आहे. आधुनिक ज्ञानाचा प्रकाश चोहोंकडे फैलावत असल्यामुळें खिस्ती धर्माची काय पण जेथें हा प्रकाश पोहोंचला आहे तेथील सर्वांचीं बनावट मतें आणि भाकडकथा लयास जाऊं लागल्या आहेत. पण पाश्चात्य देशांतील आणि त्यांतल्या त्यांत अँग्लो–सॅक्सन लोकांचा विशेष हा कीं, त्यांच्यामध्यें संघशक्ति, प्रसंगावधान, व्यवहारचातुर्य आणि संसाराविषयीं आदर इ० गुण उत्कृष्ट रीतीनें वसत असल्यामुळें, त्यांनीं सोकावलेल्या धर्माधिकाऱ्यांचे उद्दाम चोंचले चालूं न देतां व खिस्तानंतर ३–४ शतकांनीं बनविलेल्या ३९ मतांची पर्वा फारशी न बाळगतां, खुद्द खिस्ताच्या सांगण्यांत

जो कांहीं शाश्वत नीतीचा आणि आध्यात्मिक हिताचा मुख्य भाग होता, त्यावरच आपली सर्व मदार ठेवून आणि ख्रिस्ती धर्माचें मुख्य आणि विशेष असें जें तत्त्व स्वर्गीय राज्य पृथ्वीवर आणण्याचें तें बळकट ध्यानांत ठेवून सर्व देशोदेशीं, शहरोशहरीं, गल्लीगल्लींतून स्वतंत्रपणें, धर्माधिकाऱ्याच्या शिव्याशापांस न जुमानतां आणि प्रत्यक्ष राजाचाही प्राणान्त छळ सोसून, नवीन नवीन नवीन धर्मसंघाची संस्थापना केली. आधीं रोमच्या शिरजोर मठाधिकाऱ्यांस रजा दिली. पुढें जेव्हां चर्च ऑफ इंग्लंड म्हणजे इंग्रजांचा राष्ट्रीय अथवा सरकारी धर्मसंघ इंग्लंडच्या राजानें बळकावला व नुसत्या विधिसंस्काराचेंच अवडंबर माजून खऱ्या व स्वतंत्र धर्मसाधनांत व्यत्यय येऊं लागला, तेव्हां या मजबूत हाडांच्या लोकांनीं आपल्या आवडत्या राष्ट्रीय संघालाही राम राम ठोकला आणि नॉन्कन्फॉर्मिस्ट म्हणजे विभक्त समाज स्थापिले; तेथेंही प्रेसबिटर्स म्हणजे अधिकारारूढ वडील माणसांनीं धुमाकूळ माजविला, तेव्हां ह्यांनीं कॉंग्रेगेशनॅलिस्ट लोकसत्तात्मक समाज स्थापिलें. त्यांतही मताचें पूर्ण स्वातंत्र्य मिळेना म्हणून युनिटेरिअन अथवा एकेश्वरी समाज निघाला. त्यांतही जेव्हां जेव्हां मताविषयीं किंचित् दुराग्रह दिसतो तेव्हां प्रसिद्ध माहितीप्रमाणें फ्री ख्रिश्चन्स म्हणजे केवळ स्वतंत्र ख्रिस्तानुयायी म्हणविणारे निघतात आणि शेवटीं रेव्ह. चार्लस व्हायसे हे तर आपल्यास नुसते ईश्वराचा अनुयायी म्हणूनच एक निराळा केवळ थिईस्टिक चर्च म्हणजे ब्राह्म-समाज चालवीत आहेत. असो. ह्याप्रमाणें कॅथोलिकपासून ब्राह्मसमाजापर्यंत परंपरा येऊन पोहोंचली तरी नव्या-जुन्या संघांतून जें कार्य होत आहे तें वर सांगितल्याप्रमाणें लोकशिक्षणाचें, लोकसंग्रहाचें, सांसारिक फायद्याचें आणि तद्द्वारां आत्मिक संतोषाचेंच होत आहे. केवळ तर्कवितर्क, कर्मठपणा किंवा जातीजातींनीं परस्परांवर आपली श्रेष्ठता शाबीत करण्याचे ओंगळ प्रकार फार कमी होतात. प्रख्यात मुक्तिफौजेच्या संघाचीं नुसतीं मतें जर पाहूं गेलें तर तीं जुनीं आणि टाकाऊ दिसतील. त्यांतील कांहीं भाविक सेवेकऱ्यांच्या विश्वासाची मजल केव्हां इतकी पोहोंचते कीं, उद्यां सकाळीं खात्रीनें योहानाच्या शुभवर्तमानांत सांगितल्याप्रमाणें येशू आपले स्वर्गीय राजदंड घेऊन खालीं उतरणार असें मानून बिचारीं झोंपी जातात. ह्या विश्वासाची किंमत कांहीं असो, मुक्तिफौजेचा संघ जें लोकसेवेचें कार्य दरोबस्त पृथ्वीवर रात्रंदिवस करीत आहे, त्याचा मासला आम्हांला तुकारामाच्या नुसत्या शब्दांत मात्र आढळतो.

जे कां रंजले गांजले ॥
त्यांसि म्हणे जो आपुले
ज्यांसि आपंगिता नाहीं ।
त्यांसि धरी जो हृदयीं ॥

असो. ह्याप्रमाणें पाश्चात्य देशांतील जुने-नवे धर्मसंघ कार्य करीत आहेत म्हणून त्यांचें लोकांवरचें वजन मुळींच कमी न होतां उलट वाढत आहे आणि ह्याचा पुरावा इतकाच बस्स आहे कीं, ह्या संघांना लोकांकडून पैशाची व अंगमेहनतीची जितकी विपुल व जशी खुशीनें मदत मिळत आहे, तशी बोअर युद्धांत ब्रिटिश सरकारला पैसे देऊं करूनही मिळाली नाहीं ! तात्पर्य इतकेंच कीं, धर्मसंघच इतर सर्व संघांना पोसणारा आहे. राष्ट्राचे भावी मुत्सद्दी, भावी वीर, भावी कवी, आणि इतर महात्मे ह्यांच्या शीलांचा विकास बाळपणीं धर्मसंघांतच होतो. ज्या देशांत धर्मसंघ मृतप्राय झालेले आहेत किंवा जे शिल्लक उरलेले आहेत, त्याची सर्व करामत भोळ्या भाबड्यांची माया परोपरी जळवाप्रमाणें शोषून घेण्यांतच खर्चत आहे, त्या देशांत वीर पुरुष निर्माण होत नाहींत आणि झाले तरी राष्ट्रामध्यें मुळीं शीलाचीच वाण असल्यामुळें, त्यांना जोमाचा अनुयायीगण मिळत नाहीं. त्यांच्या ईर्षा आणि मनोरथ जागच्या जागीं निवतात व त्यांची वाढ खुंटते. शेवटीं ते उरीं फुटून अकालीं लय पावतात आणि त्यांच्या हातून जें मोडकेंतोडकें कार्य झालें असेल, त्याचें योग्य स्मारक करण्याचाही जोम पुढच्या पिढींत राहात नाहीं ! बंधूंनो, ह्यासाठीं धर्मसंघाची अगदीं आवश्यकता आहे.



# १४. शासनयोग

मनुष्यानें मनुष्यास कसें वागवावें हें पाहण्याच्या पूर्वीं, मनुष्यास वागविण्याचा अधिकार मनुष्यास आहे कीं नाहीं, या गोष्टीचा विचार करावयास पाहिजे आहे. पण त्याच्याही पूर्वीं म्हणजे मनुष्यास शासनाचा अधिकार आहे कीं नाहीं हें ठरविण्याच्या पूर्वीं, जगतांत मुळीं शासन आहे कीं नाहीं, हें

पाहिलें पाहिजे. संसारांतील व्यवहाराचा पायाच जर कोणत्याही शासनावर अथवा नियमावर अवलंबून नसला, तर मनुष्याच्या व्यवहारापुरताच शासनाचा विचार करण्याची जरूरीच राहणार नाहीं. या बाह्य विश्वामध्यें सर्वत्र अबाधित आढळून येणाऱ्या शासनाविषयीं जरी निरनिराळीं दर्शनें आहेत, तरी थोडा विचार करून पाहतां त्यामध्यें वस्तुतः परस्परविरोध नाहीं असें दिसून येईल. केवळ नीतिनियमांचें अस्तित्व मानणारा कर्मवादी बुद्धादिकांचा एक पक्ष आहे. या नियमांच्या मागें कोणी नियता आहे, त्याची इच्छा म्हणजेच नियम असें मानणारे ईश्वरवादी आहेत. पण हे दोन्ही पक्ष सारखेच आस्तिक समजावयास पाहिजेत. व्यवहारांत एकास नास्तिक व दुसऱ्यास आस्तिक समजण्यांत येतें हें चुकीचें आहे. केवळ नियमांसच मानून नियंत्याविषयीं उदासीन राहणाऱ्या कर्मवाद्यास जर अंशतः नास्तिक म्हणावयाचें, तर उलटपक्षीं केवळ नियंत्यासच मानून नियमाविषयीं उदासीन राहणाऱ्या ईश्वरवाद्यासही वरीलप्रमाणें अंशतः नास्तिक म्हणावयास पाहिजे. कारण, ईश्वरवादाचा मुख्य सिद्धान्त सांगत आहे कीं, ' **अपि चेत् सुदुराचारो भजते मामनन्यभाक् । साधुरेव स मन्तव्यः सम्यग् व्यवसितोऽहि सः ॥** यामध्यें धडधडीत नियमांचें उल्लंघन करणाऱ्या दुराचार मनुष्यासही साधु समजण्याविषयीं आज्ञा आहे. यावरून नियमबंधनांविषयीं हा पक्ष किती उदासीन आहे हें दिसतें. उलटपक्षीं, नियमवाद्यांचा असा आग्रह असतो कीं, आज आम्ही जे विचार मनांत आणूं त्यांचें पर्यवसान उद्यां कृतींत होणार इतकेंच नव्हे, तर आजचा विचार ती उद्यांची कृति, उद्यांची कृति ती परवांची संवय, परवांची संवय तें तेरवांचें शील, तेरवांचें शील ती शाश्वतची समाधि, येणेंप्रमाणें पर्यवसानाची अबाधित परंपरा हा पक्ष मानतो. आणि ही परंपरा कोणा नियंत्याची इच्छा आहे कीं नाहीं याविषयींच्या विचारांत तो पडत नाहीं. याप्रकारें बोधिसत्त्व आणि भगवद्भक्त हे सारखेच आस्तिक किंवा नास्तिक ठरतात. परंतु ज्या अर्थी दोघांचाही कांहीं विधानांवर आधार आहे, त्या अर्थी दोघांनाही आस्तिक म्हणावयास पाहिजे.

लौकिक व्यवहारामध्य कांहीं सनद मानणारे व कांहीं स्वामी मानणारे असे दोन पक्ष दिसून येतात. सनदपक्ष म्हणतो कीं, स्वामी असला तरी तो सनदी नियमांनीं बांधलेलाच असणार व तो असावयास पाहिजे. म्हणून सनद

हेंच मुख्य ध्येय. स्वामीपक्ष म्हणतो कीं, सनद हें केवळ स्वामीचें दान म्हणून तेंच मुख्य ध्येय. अध्यात्मांत ब्रह्म हें ज्याप्रमाणें 'शुद्धमपापविद्धं' त्याचप्रमाणें व्यवहारांतील स्वामी हाही A king can do no wrong या म्हणण्याप्रमाणें गुन्हा करूं शकत नाहीं. येणेंप्रमाणें प्रपंचांत आणि परमार्थांत जरी वरवर पाहतां दोन भिन्न पक्ष दिसतात, तरी त्या दोघांमध्यें खरा विरोध नाहीं. दोन्ही पक्ष सारखेच निष्ठावान् आहेत. विचार करतां दोघांच्याही ध्येयांचा अंतिम लय एकाच वस्तूंत होतो.

पण तिसरा एक पक्ष असा आहे कीं, तो मनुष्याच्या मनाबाहेर नियमांचें अस्तित्व मानीत नाहीं. नियमांचें अधिष्ठान मनुष्याच्या अंतःकरणांत आहे असें त्याचें म्हणणें असतें. तत्त्ववेत्ता Kant याचें Categorical Imperative आणि कविकुलगुरु कालिदास यांचें 'सतां हि संदेहपदेषु वस्तुषु प्रमाणमंतःकरणप्रवृत्तयः' हीं दोन्ही सूत्रें वरील स्वेष्टवादाचेंच समर्थन करितात. पण हा स्वेष्टवादही शासन मानीतच आहे. तें शासन आंतून असो किंवा बाहेरून असो, तें आहे आणि मानलें जात आहे हें खास.

चवथा पक्ष मात्र आंत बाहेर कोठेंच नियम मानीत नाहीं. खा, पी, चैन कर, कारण उद्यां मरण येणार आहे, असें सांगणारा. हा मात्र खरा आणि शुद्ध नास्तिक पक्ष होय. अशा वाममार्गी शाक्तांचा नाश झाल्यास कोणासही वाईट वाटणार नाहीं. नाश होतेवेळीं स्वतः त्यांनासुद्धां वाईट वाटण्याचें कारण नाहीं. स्वतःच्या शक्तीशिवाय त्यांना बाहेर कांहींच दिसत नसतें म्हणून त्या शक्तीचा लय झाला असतां मरण्यास त्यांनीं खुशीनें तयार असलें पाहिजे, तरच ते शाक्त ! नाहीं तर त्या वेळेला जर बाहेरील शासनासंबंधीं त्यांच्यांत श्रद्धा किंवा भीति उत्पन्न होईल, तर ते शाक्त कसले ? लोकायतिक, चार्वाक इत्यादि मतवाद्यांचें कांहीं युक्तिवादपूर्वक वाङ्मय होतें, पण तें द्वेषानें नाहींसें केलें असें सांगतात. पण तें उघडकीला येईतोंपर्यंत तरी त्यांच्या नास्तिकपणाला बाध येत नाहीं.

असो. हा चवथा पक्ष शिवायकरून वरील तिन्ही पक्षांस, सृष्टीमध्यें शासन आहे, हें मान्य आहे. आतां मनुष्यास शासन करण्याचा अधिकार आहे कीं नाहीं हें पाहण्यासाठीं आजपर्यंत त्याच्याकडून हा अधिकार कसा बजाविला गेला आहे याचा इतिहास पाहूं. मनुष्येंच काय पण इतर प्राण्यां-

मध्येंही शासनाचे दाखले दिसत आहेत. शासनाचा पहिला उद्भव मातेमध्यें दिसून येतो. अपत्य जन्मल्याबरोबर माता त्यावर प्रेम करूं लागते; इतकेंच नव्हे तर त्यावर राज्यही करूं लागते; प्रेमामुळें तिजवर शासनाची एक जबाबदारी येते. मुलाचे लाड करणें व कौतुक करणें एवढींच प्रेमाचीं लक्षणें नसून, अपत्याची जी इच्छा असेल त्या इच्छेला आपल्या शहाणपणाचा आळा ती सतत घालीत असते. मग ती माता मानवी असो किंवा खालील प्राण्यांतील असो.

समाजाचा अधिकाधिक विकास होऊन अनेक कारणांमुळें इतरांपेक्षां एका व्यक्तीमध्यें जेव्हां धन, बल, बुद्धि इत्यादि एक किंवा सर्व गुणांचा जास्त संचय होतो, तेव्हां त्यांच्यामध्यें साहजिक आढ्यता उत्पन्न होऊन तिच्या जोरावर तो इतरांचा पुढारी होऊन त्यांवर शासन करूं लागतो. 'हें बळ मजमध्येंच आहे, इतरांमध्यें नाहीं. हें कार्य मजसारखे आजपर्यंत करीत आलेले आहेत, मी आतां न करणें म्हणजे मानहानि होणार आहे' अशा प्रकारच्या राजसी विचारांमुळें क्षत्रियांची उत्पत्ति आणि वाढ होऊं लागते, म्हणून आढ्यता हें शासनाचें दुसरें कारण होय. वत्सलतेमुळें होणाऱ्या शासनाचा परिघ साहजिकच अल्प असणार. अपत्यसंबंधापलीकडे त्याचा वाव नसतो. केवळ वत्सलतेमुळेंच ज्या स्थितींत शासन चालू असतें ती समाजाची आद्य स्थिति. पुढें आढ्यतेमुळें व्यक्तीचें आणि व्यक्ति-समूहावर जें राज्य चालू होतें ती समाजाची दुसरी स्थिति. या आढ्यतेच्या जोरावर अद्यापिही शासन चाललें आहे आणि पुढेंही या शासनाचा विस्तार अधिकाधिकच चालू राहणार.

शासनाचें तिसरें कारण कर्तव्य हें होय. समाजाचा विकास अधिकाधिक झाल्यानंतर सात्त्विक माणसांनीं इतरांवर शासन करणें हा एक त्यांच्या सात्त्विकपणाचा भाग आहे अशी कर्तव्यबुद्धि जागृत होते. कमी सुसंस्कृत माणसांवर किंवा जातींवर अधिक सुसंस्कृत माणसांनीं किंवा जातींनीं शासन चालविणें ही हक्काची गोष्ट नसून उलट कर्तव्याची गोष्ट आहे. अडाणी माणसांवर बुद्धिवानानें, अडाणी माणसांच्या हितासाठीं राज्य करणें हा बुद्धिवानाचा हक्क नसून अडाणी माणसाचा बुद्धिवानावर हक्क आहे आणि बुद्धिवानाचें हें कर्तव्य आहे. ज्याप्रमाणें मातापित्यांनीं अपत्यांचा सांभाळ

करावा हें मातापित्यांचें कर्तव्य आणि अपत्यांचा हक्क आहे, त्याप्रमाणें सुसंस्कृतांनीं असंस्कृतांचें नियमन करावें हें सुसंस्कृतांचें कर्तव्य योग्य होय. हें कर्तव्य बजाविलें जात असतांना शास्त्यांचा सात्त्विकपणा तीव्र कसाला लागतो आणि ज्या ज्या मानानें तो या कसोटीला उतरतो त्या त्या मानानें त्याचें तें शासन, कर्तव्याचें म्हणजे तिसऱ्या कोटींतलें आणि ज्या ज्या मानानें तें उतरत नाहीं त्या त्या मानानें तें आढ्यतेचें म्हणजे दुसऱ्या कोटींतील समजावें. एकंदरींत वत्सलता, आढ्यता आणि कर्तव्यता हीं शासनाचीं तीन निरनिराळीं कारणें आहेत.

मनुष्याच्या विकासाचा इतिहास पाहिला असतां वरील कारणांच्या द्वारें मनुष्याकडून जें शासन घडत आहे, त्याचें श्रेय मनुष्यशक्तीकडे आहे, किंवा मनुष्येतर कोणा श्रेष्ठ शक्तीकडे आहे याच्याविषयीं वाद पडतो. वत्सलता आणि कर्तव्यता या सात्त्विक कारणांमुळें हें श्रेय श्रेष्ठ शक्तीकडे देऊं गेल्यास त्याबरोबर आढ्यता या राजसी गुणाचेंही संशयित श्रेय त्याच शक्तीकडे जाईल. हा संभव टाळावा म्हटल्यास उलटपक्षीं सर्वच श्रेय मनुष्यशक्तीकडे येतें. मनुष्यशक्तीचा सर्व चांगला भाग श्रेष्ठ शक्तीकडे, अपूर्व वाईटाला मात्र मनुष्यास जबाबदार करणें ही मनुष्याविषयीं सम्यक् दृष्टि होत नाहीं. आणि श्रेष्ठ शक्तीलाही अशा प्रकारच्या पक्षपाताची जरूरी नाहीं. कांहींही असो, मनुष्याच्या द्वारां हें शासन घडत आहे. ह्या शासनाची त्याजवर जबाबदारी आहे. तिच्यापासून त्याची सुटका नाहीं. या शासनाच्या जबाबदारीपासून आपली सोडवणूक करून घेणें यांत कोणताही सात्त्विकपणा नाहीं. ईश्वराला शरण जाणें हें भगवद्भक्तीचें थोर लक्षण आहे. पण शरणतेमुळें ही शासनाची जबाबदारी चुकते असें होत नाहीं. शासनाविषयीं ईश्वरी आज्ञा झाली असतां तिच्यांत कसुरी करून पुनः आम्ही शरण आहों असें म्हणत राहणें हें शरणतेचें खरें लक्षण नव्हे. तें कोडगेपणाचें लक्षण होय. कोणालाही शरण गेल्यास तो सांगेल तें काम करावयास तयार राहणें आणि तें करण्यांतच आनंद आणि थोरवी मानणें हेंच त्या शरण गेल्याचें खरें खरें लक्षण होय.

आतां शासनाचे किती प्रकार आहेत ते पाहूं. ( १ ) आईबापांकडून मुलांवर घडणारें शासन, ( २ ) गुरूकडून शिष्यावर घडविणारें, ( ३ ) राजाकडून प्रजेवर घडणारें अशी तीनच मानवी शासनें संभवतात. व्यवहारांत

ह्याहीपेक्षां आणखी दोन शासनें आढळतात. ( १ ) धनी आणि नोकर यांमधील आणि ( २ ) पति आणि पत्नी यांमधील. पण न्यायदृष्टीनें पाहूं गेल्यास, धनी आणि नोकर यांचा संबंध शास्ते आणि शास्य असा मुळींच नाहीं. कचेरींतला चपराशी असो, घरांतील ब्राल्या असो, गिरणींतील कामगार असो, किंवा नोकर कोणीही असो, त्याच्यावर राज्य करावें असा धन्याचा अधिकार नाहीं. धनी आणि नोकर एकाच करार-नाम्याचे दोन सारखे उमदे पक्ष आहेत. दोघेही परस्परांचे सारखे ऋणको आणि धनको आहेत. असें असून घरोघरीं आणि शहरोशहरीं चाकर लोकांवर जीं साम्राज्यें चालूं आहेत तीं केवळ ' बळी तो कान पिळी ' या न्यायाचीं आहेत. अर्थात् बळाचें हें तत्त्व जेव्हां धन्याकडून चाकराकडे कलतें तेव्हां शासनाचें पारडें डळमळूं लागतें आणि जो घोटाळा उडतो त्यावरून वरील साम्राज्याचा पाया न्यायावर रचला नसून अन्यायावर रचला आहे हें उघडकीला येते. एकंदरींत हा संबंध शासनाचा नव्हे हें सिद्ध होतें. ह्याहूनही विलक्षण प्रकार पतिपत्नी किंवा साधारण स्त्रीपुरुषांच्या संबंधांत दिसून येतो. प्रत्येक कुटुंबांत हें बायकांवरचें राज्य चालू असतें. अर्धी मनुष्य जात या प्रकारें मनुष्यजातीच्या दुसऱ्या अर्ध्यावर सत्ता गाजवीत आहे. विवाहामध्यें यद्यपि एक पक्ष दुसऱ्यास म्हणतो कीं, ' माझें हृदय तें तुझें हृदय आणि तुझें हृदय तें माझें हृदय; ' तथापि व्यवहारांत ' माझें तें माझें आणि तुझें तें माझें, ' असा शुद्ध अद्वैतवाद माजलेला दिसतो. म्हणजे एका पक्षीं दोन हृदयें आणि दुसऱ्या पक्षीं कांहींच नाहीं असा प्रकार होतो. हा न्याय नव्हे. कोणी म्हणतात, पति आणि पत्नी यांमध्यें परस्परशासन असावयास पाहिजे; म्हणजे, पति पत्नीचा राजा आणि पत्नी पतीची राणी ( राज्य करणारी ) असें असावें. पण हाही भ्रम आहे. शासनाचा संबंध कधींच परस्पर असूं शकत नाहीं. एकपक्षीं शासन तर प्रतिपक्षीं निष्ठाच असावयास पाहिजे. शासन आणि निष्ठा हीं एकाच व्यवहाराचीं समकालीन आवश्यक अंगें होत. निष्ठेशिवाय शासन संभवत नाहीं आणि शासनावीण निष्ठा निराधार होते. शासन चालू असतांना निष्ठा ही उलट दिशेनें चालू असते. यावरून दोन पक्षांमध्यें परस्पर शासनाचा संबंध मानणें ही विचाराची भ्रांति होय. एवंच खरीं शासनें तीनच आहेत.

र्ती–( १ ) पितृशासन, ( २ ) गुरुशासन आणि ( ३ ) राजशासन; आणि तदनुरूप ( १ ) अपत्यनिष्ठा, ( २ ) शिष्यनिष्ठा आणि ( ३ ) प्रजानिष्ठा या तीन निष्ठा होत.

मनुष्यानें शासनाचा अधिकार आपणाकडे घेण्यापूर्वी स्वतः विनयसंपन्न झालें पाहिजे. या विनयाचा अष्टांग मार्ग पूर्वी सांगितलाच आहे. आढ्यतेमुळें जो मनुष्य शासन चालवीत असतो, तोच मनुष्य कर्तव्यतेमुळें शासनास उद्युक्त होतो, हा त्याच्या विनयसंपन्नतेचा प्रभाव होय; म्हणजे राजसी शासनांतून सात्त्विक शासनांचा जो विकास होतो, तो शास्त्याच्या विनयामुळें होतो. शास्ता–मग तो राजा असो किंवा गुरु असो किंवा पिता असो–त्या सर्वांनीं आधीं विनययोगांत सिद्धि मिळविलीच पाहिजे. ऐहिक राजशासनांत देखील राजाच्या लहानमोठ्या अधिकारी मंडळींनीं प्रजेशीं विनयानें वागलें पाहिजे असे राजकीय हुकूम सुटतात, तेही याच शास्त्राधारें. राजाचे अधिकारी हे सभ्य गृहस्थ असतात म्हणून विनयानें वागणें हा त्यांच्या सभ्यपणाचाच एक भाग आहे. एवढ्यावरच अवलंबून राजा स्वस्थ बसत नाहीं, तर शासनाचा अधिकार विनयाशिवाय मिळत नाहीं व कायम राहात नाहीं म्हणून विनय हा व्यक्तिविषयक सभ्यतेचा भाग असो किंवा नसो, तो शासनाची आद्य तयारी आहे म्हणून आचरलाच पाहिजे अशी राजाज्ञा असते. मग तशी धर्माज्ञा असेल त्यांत नवल काय !

येणेंप्रमाणें पितृशासन, गुरुशासन आणि राजशासन यांबद्दल पृथक् पृथक् विचार निरनिराळ्या प्रसंगीं पुढें केला जाईल आणि त्या वेळीं ‘ सत्य असत्याशीं मन केलें ग्वाहीं । मानियेलें नाहीं बहुमता ’ असाच मनाचा भाव ठेवला जाईल. बहुमताचा एवढा मोठा प्रचंड प्रभाव आहे कीं, तें ज्यास सुदैवानें अनुकूळ होतें त्याच्या मूर्ति मंदिरोमंदिरीं स्थापल्या जातात आणि त्याचे शहरांतील चौकांत पुतळे उभारले जातात. पण दुर्दैवानें तेंच बहुमत ज्यास प्रतिकूल होईल त्यास चव्हाट्यावर सुळावर चढावें लागतें. एवढा मोठा प्रभाव असूनही त्या बहुमतास न मानतां सत्य आणि असत्याचा शोध करावयाचा असल्यास शोधकांनीं आपलें मनच ग्वाही ठेवावें असें तुकाराम सांगतात तें आम्हांस मान्य केलें पाहिजे.

* * *

वि. दा. सावरकर ( १८८३ )

## १६. मनुष्याचा देव आणि विश्वाचा देव

वाहत्या नदींत काठी आपटली असतां त्या नदीच्या अखंड धारेचे पळभर दोन भाग झालेले भासतात. संध्याकाळीं अंधुकलेल्या अखंड आकाशांत मधेंच कुठें जी पहिली चांदणी लुकलुकूं लागते ती तशी चमकण्यासरशीं ह्या अखंड आकाशाला एक गगनबिंदु मिळून त्याच्या चारीकडे चार बाजू चटकन् वेगळ्या झाल्याशा भासतात.

ह्या पदार्थजातांतही मनुष्याच्या जाणिवेची चांदणी चमकूं लागतांच त्याचे अकस्मात् दोन भाग पडतात. उभें विश्व, अनंताच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत चरकन् कापलें जाऊन दुभंग होऊन पडतें. सुरूप आणि कुरूप, सुगंधी आणि दुर्गंधी, मंजुळ आणि कर्कश, मृदुल आणि कठोर, प्रिय आणि अप्रिय, चांगलें आणि वाईट, दैवी आणि राक्षसी, हीं सगळीं द्वंद्वें मनुष्य हा ह्या यच्चावत् विश्वाचा, वस्तुजाताचा, केंद्र कल्पिल्यामुळेंच, मध्यबिंदु समजला जातांच, अकस्मात् उत्पन्न होतात. मनुष्यास जो सुखद तो विश्वाचा एक भाग. मनुष्यास जो दुःखद तो दुसरा. पहिला चांगला, दुसरा वाईट.

ज्यानें विश्वाचा मनुष्यास सुखद होणारा हा चांगला भाग निर्मिला तो देव; मनुष्यास दुःख देणारा तो दुसरा वाईट भाग ज्यानें निर्मिला तो राक्षस.

मनुष्याच्याच लांबीरुंदीचा गज घेऊन विश्वाची उपयुक्तता, बरेवाईटपणा मोजला असतां ह्या मोजणीचा हा निकाल फारसा चुकत आहे असें कांहीं म्हणतां येणार नाहीं.

विश्वाची उपयुक्तता आपल्या मापानेंच मनुष्यानें अशी मापावी हेंही अपरिहार्यच होतें. विश्वाचें रसरूपगंधस्पर्शादि सारेंच ज्ञान मनुष्याला त्याच्यापाशीं असलेल्या पांच ज्ञानेंद्रियांनींच काय तें कळूं शकणार. विश्वांतील वस्तुजात एकेकीं गणून तिचें पृथक्करण करून, ते घटक पुन्हा मोजून त्या अमर्याद व्यापाची जंत्री करीत राहिल्यानें विश्वाच्या असीम महाकोषांतील

वस्तुजाताचें मोजमाप करणें केवळ अशक्य असें समजून आपल्या प्राचीन तत्त्वज्ञान्यांनीं, आपल्या पांच ज्ञानेंद्रियांनींच ज्या अर्थीं हें सर्व विश्व केव्हांही जें कांहीं आकळलें जाऊं शकणारें आहे तें जाऊं शकतें, त्या अर्थीं त्याचें 'पंचीकरण' करणें हाच वर्गीकरणाचा उत्कृष्ट मार्ग होय असें जें ठरविलें तें एका अर्थीं क्रमप्राप्तच होतें; इतकेंच नव्हे, तर तो त्यांच्या अप्रतिहत बुद्धिमत्तेचा त्या काळचा एक आश्चर्यकारक विजयच होता! ज्ञानेंद्रियेंच जर पांच तर विश्वाचें यच्चावत् वस्तुजात त्यांच्या त्या पांच गुणांपैकीं कोणत्यातरी एका वा अनेक गुणांचेंच असणार. अर्थात् त्या पांच गुणांच्या तत्त्वांनीं, पंचमहाभूतांनींच, तें घडलेलें असणार. ह्या विश्वदेवाचा आम्हांशीं जो कांहीं संवाद होणें शक्य आहे तो ह्या त्याच्या पांच मुखांनींच काय तो होणार म्हणूनच तो विश्वदेव, पंचमुखी होय!

आपल्या ज्ञानेंद्रियांनीं विश्वाच्या गुणधर्मांचें आकलन करण्याचा मनुष्याचा हा यत्न जितका अपरिहार्य नी सहज तितकाच स्वतःच्या अंतःकरणानें त्या विश्वाला निर्मिणाऱ्या देवाच्या अंतःकरणाची कल्पना करण्याचा यत्नही साहजिकच होता. त्यांतही मनुष्याला सुख देण्यासाठींच कोण्या दयाळू देवानें ही सृष्टि निर्मिली असली पाहिजे. ह्या मानवी निष्ठेला अत्यंत प्रबळ असा पाठिंबा ही सृष्टिदेवीच प्रतिपदीं, प्रतिपलीं तिला तशी लहरच आली कीं सारखी देत राही, आजही देतेच आहे!

खरोखर, मनुष्याच्या सुखसोयीसाठीं त्या दयाळू देवानें ही सृष्टीची रचना किती ममताळूपणानें केली आहे पहा! हा सूर्य, हा समुद्र–किती प्रचंड ही महाभूतें! पण मनुष्याच्या सेवेस त्यांना देखील त्या देवानें लावलें. दुपारीं तहान तहान करीत मुलें खेळून दमून येतील तेव्हां त्यांना थंडगार नी गोड पाणी मिळावें म्हणून आई सकाळींच विहिरीचें पाणी भरून 'कुज्यां' त घालून गारत ठेवते, तशा ममतेनें उन्हाळ्यानें नद्या सुकून जाण्याच्या आधींच हा सूर्य त्या समुद्रांतलें पाणी किरणांचे दोर खोलखोल सोडून भरतो; मेघांच्या 'कुज्यांतून' सांठवून ठेवतो, आणि तेंही मध्यंतरीं अशी कांहीं हातचलाखी करून कीं, समुद्रांत असतांना तोंडीं धरवेना असें खारट असणारें तें पाणी किरणांच्या कालव्यांतून त्या आकाशाच्या विस्तीर्ण सरोवरांत सांचतांच इतकें गोड नी गार व्हावें कीं, जें पाणी पिण्यासाठीं देवांच्याही तोंडास पाणी

सुटावें ! पुन्हा समुद्राचें खारट पाणी माणसासाठीं गोड करून देण्याच्या धांदलींत साराचा सारा समुद्र गोड करून टाकण्याची भलतीच चुकीही न होईल अशी तो दयाळू देव सावधगिरीहि घेववितो. एका वर्षांत हवें तितकेंच पाणी गोड करून आटविण्याइतकीच शक्ति सूर्यकिरणांत आणि सांठविण्या-इतकीच शक्ति मेघांत ठेविली जाते. नाहींतर सारा समुद्रच गोड झाल्यानें मनुष्यास मीठ मिळणें बंद होऊन त्याचा संसार अळणी व्हावयाचा !

हे पशु पहा ! मनुष्याच्या सेवेला आणि सुखाला हवे तसेच विविध हवे तितकेच बुद्धिमान्. वाळवंटांतलें तें मनुष्याचें तारू, म्हणून कांटे खाऊन पाण्यावांचून महिनोगणतीं चालण्याची युक्ति त्या उंटाला शिकविली. तो घोडा किती चपल ! त्याच्यावर स्वारी भरणाऱ्या मनुष्यास भर रणांगणांतही संभाळून वाहण्याइतकी नी मनुष्याशीं अत्यंत प्रामाणिकपणें वागण्याइतकी बुद्धि त्याला देवानें दिली. पण मनुष्यावरच स्वारी भरण्याइतकी बुद्धि मात्र दिली नाहीं ! ही गाय पहा. एका बाजूला सुकें गवत ढकलावें नी दुसऱ्या बाजूला त्याचें बनलेलें ताजें ताजें जीवनप्रद दूध चरव्या भरभरून काढीत बसावें ! असें तें आश्चर्यकारक रासायनिक यंत्र ज्या देवानें घडविलें तो खरो-खरच किती दयाळू असला पाहिजे ! आणि पुन्हा प्रत्येक जुनें यंत्र मोडतांच नवें घडण्याचे श्रमसुद्धां मनुष्याला पडूं नयेत अशी सोय त्यांतच केलेली; पहिल्या यंत्रांतच गवताचें दूध करून देतां देतांच तसलींच नवीन अजब यंत्रें बनविण्याचीही व्यवस्था केलेली !

एक गव्हाचा दाणा पेरला कीं, त्याचे शंभर दाणे ज्या जगांत होऊन उठतात; एक आंबा ! रसानें, स्वादानें, सत्त्वानें कोण भरपूर भरलेलें तें देवफळ ! पण तरीही तें इतकें सुपीक कीं, एक आंबा रुजविला कीं, त्याचा वृक्ष होऊन प्रतिवर्षी हजार हजार आंबे त्याला लागावे नी असा क्रम वर्षानु-वर्षे चालावा; फार काय सांगावें, एका आंब्याच्या फळापासून होणारीं तीं लाखों फळें सगळींचीं सगळीं जरी मनुष्यांनीं खाल्लीं तरी पुन्हा आंब्यांचा तोटा म्हणून पडूंच नये, यासाठीं आंब्याच्या झाडाच्या फांदीचींच कलमें करून त्यांच्या आंबरायांच्या आंबराया भरभराटण्याची सोय ज्या जगांत देवानें केलेली आहे; एका कणाचा मण होणारीं हीं तांदूळ, बाजरी, जोंधळे प्रभृति नानाविध सत्त्वस्थ धान्यें; एक बी पेरली कीं, एका पिढीस सहस्रावधि रसाळ

फळें पुरविणारीं हीं फळझाडें; हे फणस, पपनस, अननस, द्राक्षें, डाळिंबें, या गवतासारख्या, उगव म्हणतांच उगविणाऱ्या अति रुचकर बहुगुणी, विविधरस शाकभाज्या, फळभाज्या; ज्या जगांत पुरून उरताहेत, ज्याचा गाभाच गोड आहे, तो साखरेच्या पाकानें ओतप्रोत भरलेला ऊंस देखील ज्या जगांत इतका पिकतो कीं, त्याचे मळेचे मळे माणसांना नकोसे झाले म्हणजे बैल खाऊन टाकतात—त्या जगास निर्मिण्यांत देवानें मनुष्यावर जी अमर्याद दया केली आहे तीविषयीं मनुष्य त्याचा उतराई होणार तरी कसा!!

तशीच ही मनुष्याच्या देहाची रचना! पायाच्या तळव्यापासून तों मज्जांतील सूक्ष्मातिसूक्ष्म पिंडानुपिंडापर्यंत ह्या शरीराची रचना मनुष्याला सुखदायी होईल अशीच सुसंवादी करतांना हे मनुष्याच्या देवा, तूं जी केसानु-केसागणिक काळजी घेत आला आहेस ती कुठवर सांगावी! मनुष्याचा हा एक डोळा जरी घेतला तरी, किती युगें, किती प्रयोग, किती अनवरत अवधानें करून तूं हा आज आहे तसा घडवूं शकलास! प्रथम प्रकाशाला किंचित् संवादी असा एक नुसता त्वग्बिंदु; प्रकाशाला नव्हे तर त्याच्या सावलीला तेवढा जाणणारा, अंधेर नी उजेड इतकाच फरक काय तो जाणणारा तो पहिला त्वग्बिंदु; त्याच्यांत सुधारणा करतां करतां किती प्रयोग करून, किती रद्द करून, पुन्हा प्रयोग करून रचतां रचतां शेवटीं आज मनुष्याचा सुंदर, टपोरा, पाणीदार, महत्त्वाकांक्षी डोळा तूं घडविलास! इतका महत्त्वाकांक्षी डोळसपणा त्या मनुष्याच्या डोळ्यांत मुसमुसत आहे कीं, देवा, तुझ्याच कलेंत तुझाच पाडाव करण्यासाठीं दुर्बिणीचे प्रतिनेत्र निर्मून तो तुझ्या त्या आकाशांतील प्रयोगशाळेचेंच अंतरंग पाहूं इच्छीत आहे! नव्हे, तुलाही त्या दुर्बिणीच्या टप्प्यांत गांठून कुठेंतरी प्रत्यक्ष पाहतां येतें कीं नाहीं याचे प्रयोग करूं म्हणत आहे!!!

आणि त्या मनुष्याच्या डोळ्यास प्रसादविण्यास्तव सौंदर्याचा नी सुरंगांचा जो महोत्सव तूं त्रिभुवनांत चालूं केलास त्याची आरास तरी काय वर्णावी! हें पारिजाताचें सुकोमल फूल, तें सोनचांफ्याचें सुवासमत्त सुमन! हा मोराचा पिसारा पहा. अहाहा! एकेका पिसाची ती ठेवण, तें रंगकाम, ती जिवंत चमक, तें तरल नटवेपण! आद्य कलावन्त! तशा अनेक सुंदर पिसांचा तो पिसारा पसरून तो तुझा मोर जों जों आनंदानें उन्मत्त होऊन नाचूं लागतो,

तों तों देवा, तुझी ती ललित कलाकुसरी पाहून ' धन्य, देवा धन्य तुझी ! वारे वा ! ' असें वारंवार उद्‌गारत माझें हृदयही नाचूं लागतें ! आणि असा पिसारा मनुष्यांसही तूं कां दिला नाहींस म्हणून किंचित् रुसूंही लागतें ! हे नयनाल्हादक रंगांचे नी श्रवणाल्हादक गोड लकेऱ्या घेणारे शतावधि पक्ष्यांचे थवेच्या थवे ज्या जगांत मंजुळ आनंदाचे किलबिलाट करीत आहेत; गुलाब, चमेली, बकुळ, जाईजुई, चंपक, चंदन, केतक, केवड्यांचीं बनेंचीं बनें सुंदर फुलांचे सडे पाडीत आहेत आणि सुगंधानें सारा आसमंत दरवळून सोडीत आहेत; मानसांतून ह्या प्रीतिरति आणि मानससरोवरांतून ह्या कमलिनी, कुमुदिनी विकसत, विलसत आहेत, ज्या जगांत रात्रीं चांदण्या आहेत, उषःकाल गुलाबी आहेत, तारुण्य टवटवीत आहे, निद्रा गाढ आहे, भोगांत रुचि आहे, योगांत समाधि आहे—देवा ! तें हें जग ज्या तूं आम्हां मनुजांना इतकें सुखमय होऊं दिलेंस, होऊं देत आहेस, त्या तूं तें आमच्या सुखासाठींच असें निर्मिलेंस असें आम्हांस कां वाटूं नये ! आम्हांला जशी आमच्या लेंकरांची माया आहे म्हणूनच आम्ही त्यांच्या सुखासाठीं जपतों, तसेंच आमच्या सुखासाठीं इतकें जपणाऱ्या देवा, तुला आम्हां मनुष्यांची माया असलीच पाहिजे. आम्ही माणसें, देवा, तुझीं लेंकरें आहोंत; तूं आमची खरी आई आहेस ! आईला देखील दूध येतें—तूं दिलेंस म्हणून ! आम्ही मनुष्यें तुझे भक्त आहोंत, आणि देवा, तूं आम्हां मनुष्यांचा देव आहेस.

इतकेंच नव्हे, तर तूं आम्हां मनुष्यांचाच देव असून तुझ्यावांचून दुसरा देव नाहीं ! हें सारें जगत् तूं आमच्या सुखसोयीसाठींच घडविलें आहेस ! !

मनुष्याच्या इच्छेस जुळेशी ही विचारसरणी सत्यास जुळेल अशीही ठरली असती—जर ह्या जगांतील प्रत्येक वस्तु नी प्रत्येक वस्तुस्थिति मनुष्याला सुखकारक नी उपकारक अशीच असती तर ! पण मनुष्याच्या दुर्दैवानें या साऱ्या जगांतील तर राहोतच, पण ज्या पृथ्वीस तो मनुष्य प्रथम प्रथम तरी ' सारें जग ' म्हणून स्वाभाविकपणेंच संबोधित होता, जिला विश्वंभरा, भूतधात्री, अशा नांवानें तो अजूनही गौरवितो, त्या पृथ्वीवरील वस्तुजातही वा वस्तुस्थितीही मनुष्यास सर्वस्वीं अनुकूल नाहीं; इतकेंच नव्हे, तर उलट अनेक प्रकरणीं मारकच आहे.

ज्या सूर्याचे नी समुद्राचे मनुष्यावर झालेले उपकार आठवून आठवून आपण आतांच त्यांचीं स्तोत्रें गाइलीं तो सूर्य नी तोच समुद्रच पहा! उन्हानें तापून चक्कर येऊं लागलेल्या अवश वाटसरूवर, लाठीच्या पहिल्या दोन-चार तडाक्यांनीं अर्धमेला होऊन गेलेल्या सापावर आपण जसा शेवटचा टोला मारून तो साप पुरता ठार करतों तसा, हा सूर्य आपल्या प्रखर किरणांचा शेवटचा तडाका मारून त्या मनुष्यांना ठिकच्या ठिकाणीं ठार करण्यास चुकत नाहीं! ज्या भारतांत त्या सूर्यास लक्षावधि ब्राह्मण, सकाळ-संध्याकाळ अर्घ्या देण्यास उभे असत, त्याच भारतांत, त्या धर्मशील काळींही दुर्गादेवीच्या दुष्काळांचा 'सुकाळ' करून बारा बारा वर्षे आपली प्रखर आग सारखी वर्षत लाखों जीवांस जिवंत भाजून काढीत आला आहे! कुराणांत, तौलिदांत, भाविक पैगंबरांनीं स्तुति केली आहे कीं 'मनुष्यासाठीं, हे देवा, हे किती असंख्य मासे, किती रुचकर अन्नाचा हा केवढा अखंड सांठा तूं या समुद्रांत ठेवला आहेस!' पण तोच समुद्र मनुष्यास जशाचा तसाच गिळून पचवून टाकणाऱ्या अजस्र सुसरींना आणि प्रचंड हिंस्र माशांनाही तसेंच निःपक्षपातानें पाळीत आहे! मनुष्यांचीं तारवें पाठीवर वाहून नेतां नेतां, सदय वाटाड्याचें सोंग घेऊन चाललेला वाटमाऱ्या जसा भररानांत त्याच बायाबापड्या वाटसरूवर उलटून त्यांचे गळे कापतो, तसा हा समुद्र अकस्मात् हजारों माणसांनीं भरलेलीं तीं तारवें नी त्या प्रचंड टिटानिका बोटी आपल्या पाठीवरून फेकून आपल्या भयंकर जबड्यांत ढकलतो–गटकन् गिळून टाकतो! एखादी राक्षसीण रागावली तर एखाद्या लेकराची मानगुटी नदींत दाबून, त्याचा गुदमरून जीव जाईतों धरील! एखादी हिंस्र सुसर फार तर दोनतीन सुरेख कुमारिकांना, नदींत उतरून लाजत लाजत स्नान करीत असतां त्यांचे काकडीसारखे कोवळे लुसलुशीत पाय दांतांत धरून हिसडून गट्कन् गिळून टाकील; पण ही गंगामाय, ही जमनाजी, ही देवनदी जार्डन, हा फादर थेम्स, हजारों कुमारींची–मुलां-लेकरांची–मान एका मानेसारखी, आपल्या पाण्यांत यांचा अवश जीव गुदमरून ठार होईतों दाबील, नगरेंचीं नगरें त्यांचा पाया हिसडून गिळून टाकील.

इंजिलकुराणादिक धर्मग्रंथांत भाबडी भक्ति लिहून गेली कीं, बोकड,

कोंबडी, ससा, शेळी, हरीण हेही नानाविध प्राणी मनुष्यांना पुष्कळ मांस मिळावें म्हणून, हे दयाळू देवा, तूं निर्मिलेस! पण त्यांच्या रुचकर मांसानें, स्मरणानें तोंडास पाणी सुटलेल्या त्या भक्तीस ह्याचें अगदींच कसें विस्मरण पडतें कीं, ह्याच जगांत त्याच देवानें मनुष्याचेंही मांस खाण्यासाठीं सिंह, वाघ, चित्ते, लांगडे हेहि निर्मिलेले आहेत. हे दयाळू देवा, तूं माणसांची कोवळीं कोवळीं मुलें अशाचसाठीं निर्मिलींस कीं, आम्हांस काकडीसारखी मुखशुद्धि सदोदित मिळावी. अशी मनुष्यास फाडून चिरफाडून खाल्ल्यानंतर त्याच्या हाडावर ढेंकर देत बसलेल्या सिंहांच्या नी लांडग्यांच्या रक्ताळलेल्या तोंडांतली कृतज्ञ स्तुतीही त्याच देवास पावत आहे! आशिया आणि आफ्रिका यांस जोडणारे खंडच्या खंड ज्या दिवशीं महासागरांत, त्या खंडावरील वरमाला घेऊन उभ्या असलेल्या लक्षावधि कुमारिकांसह, दूधपाजत्या आयालेकरांसह, अर्धभुक्त प्रणयीजनांसह, पूजांजलि वाहत्या भक्तांसह, त्याच देवाची स्तुति चाललेल्या लाखों देवालयांसह तें खंडच्या खंड त्याच देवानें ज्या दिवशीं त्या महासागरांत गणपति डबकन् बुडवावा तसें बुडविलें. त्याच्या दुसऱ्या दिवशीं हीच उषा, हीच वेदांनीं गाइलेली उषा, असेंच गोड गुलाबी हास्य हसत त्या शुकशुकाट दृश्याकडे पाहात होती! कुराणांत म्हटलें आहे कीं, चंद्र निर्मिला, अशासाठीं कीं, मनुष्याला नमाज पढावयाच्या वेळा कळाव्या! पण जो जो नमाज पढे त्या त्या इस्लामियांची, त्या मुल्लामौलवीमशिदीसुद्धां कत्तल करून खलिफाच्या घराण्याची राखरांगोळी उडवून त्या लाखों मुस्लीमांच्या कापलेल्या डोक्यांच्या ढिगावर ज्या दिवशीं तो निजामाचा कट्टर शत्रु चेंगिझखान चढून जाऊन शांतपणें बसला, त्या रात्रीं त्या बगदाद नगरीं हाच चंद्र त्या चेंगिझखानालाही त्याच्या वेळा पलें पलें मोजून असाच बिनचूक दाखवीत शांतपणें आपली कौमुदी वितरीत होता.

हीं सुगंधी फुलें, हे सुस्वर पक्षी, तो मनोहर पिसारा पसरून नाचणारे हे सुंदर मोरांचे थवे, रानचें रान अकस्मात् पेटून भडकलेल्या वणव्यांत, चुलींत वांगें भाजावें तसें, फडफड करतात न करतात तोंच भाजून राख करून टाकतो—तो कोण? गाय दिली तो दयाळू, तर त्याच गाईचें दूध पिऊन तिच्याच गोठ्यांत बीळ करून राहणारा तो विषारी साप, त्या गाईचें दूध देवाच्या नैवेद्यासाठीं काढावयास येणाऱ्या व्रतस्थ साध्वीला कडकडून तिचा

जीव घेणारा तो साप, तो ज्यानें दिला तो कोण? प्रत्येक भोगामागें रोग, केसागणिक ठणठणणारे केसतोड, नखानखांचे रोग, दांतादांतांचे रोग, ते कण्ह, त्या कळा, ती आग, त्या सांथी, ती महामारी, ते प्लेग, ती अतिवृष्टि, ती अनावृष्टि, ते उल्कापात! जिच्या मांडीवर विश्वासानें मान ठेवली ती भुईच अकस्मात् उलटून मनुष्यांनीं गजबजलेलें प्रांतचे प्रांत पाताळांत जिवंत पुरून गडप करून टाकणारे ते भूमिकंप!! आणि कापसाच्या राशीवर जळती मशाल कोसळावी तसें ह्या पृथ्वीच्या अंगावर कोसळून एखाद्या गवताच्या गंजीसारखी भडभड पेटवून देणारे ते दुष्ट धूमकेतु—ते कोणीं केले?

जर ह्या विश्वांतील यच्चावत् वस्तुजातांच्या मुळाशीं त्यांना धारण करणारी, चालन करणारी, किंवा जिच्या क्रमविकासाचे ते परिणाम होत आले आहेत अशी जी शक्ति आहे तिला देव म्हणावयाचें असेल तर त्या देवानें हें सारें विश्व, मनुष्यास त्याचा मध्यबिंदु कल्पून केवळ मनुष्याच्या सुखसोयीसाठींच निर्मिलें ही भावना अगदीं भाबडी, खुळी आणि खोटी आहे असें मानल्यावांचून वरील विसंगतीचा उलगडा होऊंच शकत नाहीं.

कोणत्या हेतूनें वा हेतूवांचून हें जगड्व्याळ विश्व प्रेरित झालें तें मनुष्याला तर्कितां देखील येणें शक्य नाहीं. जाणतां येणें शक्य आहे तें इतकेंच कीं, कांहीं झालें तरी मनुष्य हा ह्या विश्वाच्या देवाच्या खिसगणतींतही नाहीं. जशी कीड, मुंगी, माशी, तशाच ह्या अनादिअनंत कालाच्या असंख्य उलाढालींतील हा मनुष्यही एक अत्यंत तात्पुरता आणि अत्यंत तुच्छ परिणाम होय. त्याला खायला मिळावें म्हणून धान्य उगवत नाहीं, फळें पिकत नाहींत, कोथिंबीर खमंग झालेली नाहीं. धान्य पिकतें म्हणून तो खाऊं शकतो, इतकेंच काय तें. त्याला पाणी मिळावें म्हणून वाहात नाहींत. नद्या वाहतात म्हणून पाणी मिळतें इतकेंच काय तें. या पृथ्वीवर जेव्हां नुसत्या प्रचंड सुसरीच सुसरी नांदत होत्या नी मनुष्याचा मागमूसही नव्हता तेव्हांही नद्या वाहात होत्या, झाडें फुलत होतीं, वेली फुलत होत्या. मनुष्यावांचून तर काय, पृथ्वी नव्हती तेव्हांही हा सूर्य असाच आकाशांत भटकत फिरण्यास भीत नव्हता, आणि हा सूर्यही जरी त्याच्या साऱ्या ग्रहोपग्रहांसुद्धां हरवला तरी, एक काजवा मेला तर पृथ्वीला जितकें चुकलेंसें वाटतें तितकें देखील या सुविशाल विश्वाला चुकलेंसें वाटणार नाहीं. ह्या विश्वाच्या देवाला एका पलाचेंही सुतक, असे

शंभर सूर्य एखाद्या मांर्थीत एका दिवसांत जरी मरूं लागले तरी, घरावें लागणार नाहीं ! !

तरीदेखील ज्या कोणच्या हेतूनें वा हेतूवांचून ही विश्वाची प्रचंड जगड्-व्याळ उलाढाल चालू आहे तींत एक अत्यंत तात्पुरता नी अत्यंत तुच्छ परिणाम म्हणून का होईना, पण मनुष्याला त्याच्या लांबीरुंदीच्या गजानें मापतां यावें असें, त्याच्या संख्येंत मोजतां यावें असें, इतकें सुख नी इतक्या सोयी उपभोगितां येतात हा मात्र आणि एवढाच काय तो ह्या विश्वाच्या देवाचा मनुष्यावर झालेला उपकार होय ! मनुष्याला ह्या जगांत जें सुख मिळूं शकतें तेवढेंही न मिळूं देण्यासारखीच जर ह्या विश्वाची रचना ह्या विश्वाच्या देवानें केली असती, तर त्याचा हात कोण धरणार होता ! हे सुगंध, हे सुस्वर, हे सुखस्पर्श, हें सौंदर्य, हें सुख, ह्या रुची, ह्या सोयी आहेत, त्याही अमूप आहेत ! ज्या योगायोगानें मनुष्यास ह्या सर्व लाभत आहेत त्या योगायोगाला शतशः धन्यवाद असोत ! ज्या विश्वशक्तींनीं कळत न कळत असा योगायोग जुळवून आणला त्यांना त्या अंशापुरतें मनुष्याचा देव म्हणून संबोधिल्याचें समाधान आपणांस उपभोगितां येईल, उपकृत भक्तीचें फूल वाहून त्यास पूजितांही येईल !

परंतु त्यापलीकडे ह्या विश्वाच्या देवांशीं, वाटच्या भिकारड्यानें सम्राटाशीं जोडूं पहावा तसा कोणचाही बादरायणसंबंध जोडण्याची लचाळ हाव मनुष्यानें आमूलात् सोडून द्यावी हेंच इष्ट ! कारण तेंच सत्य आहे ! आपलें चांगलें तें देव करील, देव चांगलें करील तर मी सत्यनारायण करीन, ही आशा, हा अवलंब, अगदीं खुळचट आहे ! कारण तो अगदीं असत्य आहे. ज्या ज्या संकटांतून आपणांस सोडविलें म्हणून आपण देवाचा सत्यनारायण करतों, त्या त्या संकटांत प्रथम आपणांस ढकलतो कोण ? तोच सत्यनारायण, तोच देव ! जो प्रथम आपला गळा कापतो आणि नंतर त्यास मलम लावतो त्याची मलम लावण्यासाठीं पूजा करावयाची तर प्रथम गळा कां कापलास म्हणून त्याची आधीं यथेच्छ शोभाही करावयास नको काय ? विश्वाच्या देवाच्या ठायीं ह्या दोन्हीही भावना अनाठायीं नी असमंजस आहेत.

ती विश्वाची आद्यशक्ति ज्या कांहीं ठराविक नियमांनीं वर्तते आहे ते तिचे नियम समजतील ते समजून घेऊन त्यांतल्यात्यांत आपल्या मनुष्य-

जातीच्या हिताला नी सुखाला पोषक होईल तसा त्यांचा साधेल तितका उपयोग करून घेणें इतकेंच मनुष्याच्या हातांत आहे. मनुष्यजातीच्या सुखाला अनुकूल तें चांगलें, प्रतिकूल तें वाईट, अशी नीति-अनीतीची स्पष्ट मानवी व्याख्या केली पाहिजे. देवास आवडतें तें चांगलें, आणि मनुष्यास जें सुख-दायी तें देवास आवडतें ह्या दोन्ही समजुती खुळचट आहेत, कारण त्या असत्य आहेत. विश्वांत आपण आहोंत पण विश्व आपलें नाहीं; फार फार थोड्या अंशीं तें आपणांस अनुकूल आहे; फार फार मोठ्या अंशीं तें आपणांस प्रतिकूल आहे. असें जें आहे तें नीटपणें, धीटपणें, समजून घेऊन त्याला बेधडकपणें तोंड देणें हीच खरी माणुसकी आहे ! आणि विश्वाच्या देवाची खरी खरी तीच पूजा ! !



श्री. व्यं. केतकर ( १८८४-१९३७ )

# १६. समाजाचें धर्मनियमन व तें करणारा वर्ग

समाजांतील व्यक्तींस कांहीं नियमानुसार वागावें लागतें. जे नियम आपण पाळतों त्यांपैकीं कांहीं नियमांस आपण कायदा म्हणतों. 'कायदा' या सदराखालीं ज्या नियमांचा अंतर्भाव होतो त्यांचें सामान्य लक्षण एवढेंच कीं, ज्या नियमाचा भंग केला असतां राजाकडून शिक्षा होते त्यांस आपण 'कायदा' म्हणतों. या कायद्याखेरीज आपण दुसरे कांहीं नियम पाळतों. उदाहरणार्थ कुलाचार, संस्कार, शिष्टसंप्रदाय इत्यादि. आपण कुलाचार पाळतों याचें कारण असें आहे कीं, ते पाळणें आपलें कर्तव्यकर्म आहे असें आपणांस वाटतें, व ते जर पाळले नाहींत तर आपणांस अगर आपल्या पितरांस इष्ट पारलौकिक गति मिळणार नाहीं, अशी आपली समजूत आहे. मौंजीबंधनादि संस्कार आपण पाळतों याचें कारण कांहीं अंशीं पारलौकिक आहे, व कांहीं अंशीं सामाजिक देखील आहे. ज्याची मुंज झाली नाहीं तो समाजांत, व कायद्यानें शूद्र ठरतो; व ब्राह्मणापेक्षां तें हलक्या प्रतीचें स्थान आहे अशी आपली समजूत असल्यामुळें, शूद्रत्व स्वीकारण्यास ब्राह्मण तयार नाहींत. कांहीं भोळ्या, संस्कारास मूर्खपणा समजणाऱ्या व जानवें तोडून टाकणाऱ्या सुधारकांनीं, आपल्या मुलांच्या मुंजीकडे प्रथम दुर्लक्ष केलें, व पुढें वीस बावीसाव्या वर्षी त्यांस प्रायश्चित्त देऊन मुंज करून घेतली अशीं आपण कांहीं उदाहरणें पाहतों. अर्थात् संस्कार पाळण्यांत आपला केवळ पारलौकिक व पारमार्थिक हेतु नसून कांहीं लोकांच्या बाबतींत तरी सामाजिक व स्वार्थाचा देखील असतो. कुलाचार पाळणें, एकादशी करणें यांतही एक तऱ्हेचा लौकिक हेतु असतोच. पुष्कळ लोक असल्या तऱ्हेचा आचार पाळतात याचें कारण एवढेंच असतें कीं, ज्या वर्गांत आचार पाळणें चांगलें म्हणून समजलें जातें त्या भागांत मान्यता व्हावी.

मनुष्यास अमुक एक प्रकारें वर्तन ठेवण्यास लावणारीं जीं सामाजिक कारणें आहेत, त्यांतील मुख्य येणेंप्रमाणें—

१. सरकारच्या शिक्षेचें अगर अमान्यतेचें भय.

२. समाजांतील ठराविक पदवी नष्ट होण्याचें ऊर्फ बहिष्काराचें भय.

३. लोकनिंदेचें भय व लोकस्तुतीची आकांक्षा.

या तीन प्रकारच्या भयांमुळें मनुष्य नियमानुसारी बनतो. वर सांगितल्यापैकीं पहिलें कलम विशेष स्पष्ट करून दाखविलें पाहिजे. जेथें 'अमान्यतेचें' हे शब्द जे वापरले ते सरकारी अधिकाऱ्याची मर्जी जाण्याचें, अगर इतराजीचें भय, या अर्थानें वापरले नाहींत. उद्दिष्ट प्रकारच्या अमान्यतेचें स्वरूप लक्षांत येण्यासाठीं एक उदाहरण घेतों. जर आपण एखादा ठराव केला, व तो कायद्यानें म्हणजे सरकारनें सांगितलेल्या पद्धतीप्रमाणें नसला तर तो ठराव अंमलांत आणण्यांत मदत करण्यास सरकार तयार होत नाहीं व यासाठीं आपणांस तो विशिष्ट पद्धतीप्रमाणेंच करणें भाग पडतें.

जे नियम वरील तीन प्रकारच्या भयांमुळें अस्तित्वांत येतात त्यांस आपण सरकारी कायदा, सामाजिक कायदा आणि शिष्टाचार अशीं नांवें देऊं व यांपैकीं प्रत्येक कारणावर समाजांतील विचारी व विद्वान् मंडळींच्या मतांचा परिणाम कसा काय होतो तें पाहूं, व शिवाय समाजांतील कोणच्या वर्गाच्या मतांचा परिणाम वरील नियमसमूहावर होतो याची देखील तपासणी करूं. अमुक एक धर्मनियम 'कायदा' आहे अगर केवळ शिष्टसंप्रदाय आहे, याचें महत्त्व या वादविवादांत नाहीं. विचारप्रवर्तक ऊर्फ समाजाचे अंतिम शास्ते आपणांस शोधावयाचे आहेत व त्यासाठीं, प्रथमतः, लोकनिंदा व लोकस्तुति यांचींच कारणें पाहूं. समजा, एखाद्या मनुष्यानें परजातीबरोबर लग्न केलें तर त्याची स्तुति होईल अगर निंदा होईल बरें ? आपला अनुभव असा आहे कीं, या प्रकारचीं उदाहरणें झालीं म्हणजे समाजांतील कांहीं वर्ग स्तुति करितो व कांहीं निंदा करितो. जुन्या मतांच्या मनुष्यांस तें गर्ह्य वाटतें व कांहीं लोकांस तें योग्य वाटतें. एकाच कृत्यासंबंधानें समाजास या प्रकारचीं भिन्न प्रकारचीं मतें असण्याचें कारण एवढेंच कीं, चांगलें काय व वाईट काय या संबंधानें भिन्न प्रकारच्या विचारमालिका सध्यां प्रचलित आहेत, व जो तो आपल्या आवडत्या विचारमालिकेनुसार ह्या कृत्यांविषयीं मत प्रदर्शित करितो.

ज्या विचारमालिका देशांत प्रचलित आहेत म्हणून सांगितलेल्या, त्यांपैकीं प्रत्येकीचा प्रतिनिधि व वक्ता असा निराळा वर्ग आहे. या वर्गाचें शिक्षण,

ज्ञान व गुरुपरंपरा भिन्न आहेत. या भिन्न परंपरेमुळें निरनिराळे विचार देशांत वागत आहेत. यांपैकीं एखादी विचारमालिका सार्वत्रिक झाली व दुसऱ्या प्रकारची विचारमालिका अत्यंत कमजोर ठरली, तर अमुक एक प्रकारचें वर्तन जनतेच्या दृष्टीनें स्तुत्य अगर निंद्य ठरेल हें निश्चयानें सांगतां येईल.

पुनर्विवाह व अन्यजातिविवाह यासंबंधानें ज्यांचें विरुद्ध मत आहे त्या लोकांच्या मनावर पूर्वपरंपरागत विचारांचा दृढ संस्कार आहे असें म्हणतां येईल. एका काळीं समाजस्थितीसंबंधानें विचार करणाऱ्या कांहीं लोकांचें या उपर्युक्त विवाहांच्या विरुद्ध मत झालें. त्यांचें तें मत ग्रंथीं अवतीर्ण झालें, व त्यांनीं प्रसिद्ध केलेलीं मतें लोकांवर अत्यंत परिणामकारक झालीं. त्यांच्या-प्रमाणें म्हणजे त्यांनीं घालून दिलेल्या नियमांप्रमाणें वागणें हें कर्तव्यकर्म आहे असें लोकांस वाटूं लागलें. अमुक एक गोष्ट धर्मशास्त्राच्या विरुद्ध आहे याचा अर्थ एवढाच कीं, समाजाचें व व्यक्तीचें ऐहिक व पारलौकिक हित ज्या प्रकारच्या वर्तनानें साध्य होईल म्हणून पूर्वसूरींची कल्पना होती त्या वर्तनाशीं तें जुळणारें नाहीं. आज, आपण धर्मशास्त्रानुसार वागतों, याचा अर्थ असा कीं, पूर्वागत विचारी मंडळीच्या मतानें वागणें अवश्य आहे असें आपणांस वाटतें.

आपणांत असा एक वर्ग आहे कीं, पूर्वींच्या धर्मकारांविषयीं त्यास आदर-बुद्धि नाहीं, तथापि त्या वर्गास देखील धर्मशास्त्रकारांनीं घातलेल्या नियमांचें अवलंबन करणें भाग पडतें. उदाहरणार्थ, आपल्यांतील लग्नप्रसंगीं होणारे विधि केवळ मूर्खपणाचे आहेत असें जरी आपल्यापैकीं कांहीं शहाण्यास वाटत असलें तरी त्या नियमांस बहुजनसमूहाची मान्यता असल्यामुळें त्या भिन्न विचारी लोकांस पूर्वागत नियम मान्य करणें भाग पडतें. यास कारणें दोन प्रकारचीं आहेत. एक कारण म्हटलें म्हणजे जनतेच्या अनादराचें भय व दुसरें कारण म्हटलें म्हणजे पूर्वोक्त योग्यायोग्यतेचे विचार कायद्याच्या स्वरूपांत कायम राहून आपणांस अजूनही त्यांचें अवलंबन करण्यास भाग पाडीत आहेत हें होय.

योग्यायोग्यतेचे विचार कायद्याच्या स्वरूपानें प्राविष्ट होवोत, अगर शिष्ट-संप्रदायाच्या नियमानें जगांत कायम राहोत, अगर त्यांचें अवलंबन लोक पारमार्थिक हिताकरितां करोत, ते सर्व समाजांतील विचारी व आचाराच्या

दृष्टीनें श्रेष्ठ म्हणून ठरलेल्या लोकांपासून प्रसृत होतात. ह्या वर्गास आपला 'धर्मनियामक वर्ग' असें आपण म्हणूं. प्राचीन काळीं म्हणजे हिंदुस्थानांत मुसलमानांचा प्रवेश होण्यापूर्वी, ब्राह्मण हे धर्माचे अधिकारी म्हणून समजले जात असत. याचा अर्थ एवढाच कीं 'उत्तम आचार म्हणजे काय' याचें उद्बोधन ब्राह्मणांकडून होई. त्यांनीं उत्पन्न केलेल्या विचारांचा शासनतंत्रावर परिणाम घडवून आणण्याचें काम पुढें आपोआपच होत असे. राजे व राजपुरुष ब्राह्मणांचे शिष्यच होते व प्रजा देखील ब्राह्मणांच्या उपदेशास मान देणारी असे, व येणेंकरून राज्यांत राजा व प्रजा ह्यांच्यामध्यें एकवृत्ति उत्पन्न होई. राष्ट्र सुरळीतपणें चालण्यास एक गोष्ट अवश्य आहे ती ही कीं, राज्य करणारे व प्रजा यांच्यामध्यें विचारसाम्य लागतें. तें पूर्वकालीं वरील कारणानें घडून येई. राष्ट्रामध्यें सामान्य विचार उत्पन्न करून त्यांचा परिणाम प्रजेचीं मनें व शासनतंत्र यांच्यावर जो वर्ग घडवून आणतो तो खरोखरच एका दृष्टीनें पाहिलें असतां समाजाचा अंतिम शास्ता होय. एखादें राज्य अनेक प्रसंगीं लोकांस परकें वाटतें याचें विचारभेद हेंच महत्त्वाचें कारण आहे. देशांतील तत्त्वेत्यांकडून जे विचार उत्पन्न होतात त्यांचा परिणाम लोकांवर व शासनतंत्रावर होऊं लागला म्हणजे परक्या सत्तेचा परकेपणाच जाऊं लागतो व परकें शासकमंडळ राष्ट्राचाच भाग होतें.

विचारभेदामुळें सरकार व प्रजा यांमध्यें होणारी दुफळी कमी राहावी या साठीं इंग्रज सरकारनें जे उपाय केले त्यांत दोन मुख्य होत. पहिला उपाय म्हटला म्हणजे आपल्यांतील कांहीं लोकांस इंग्रजी शिकविलें. प्रतिनिधि पाठविण्याचे हक्क लोकांनीं मागितले व ब्रिटिश सरकारनें निरनिराळ्या प्रांतांस दिले. याचें मुख्य कारण हेंच आहे कीं, हिंदुस्थानांतील लोकांमध्यें जे विचार उत्पन्न होतील त्यांचा परिणाम शासनतंत्रावर व्हावा, व हिंदी जनता, सुशिक्षित हिंदी लोकांत जे योग्यायोग्यतेचे विचार उत्पन्न होतील त्या विचारांनीं शासित व्हावी. प्रतिनिधित्वाचे हक्क लोकांस देणें हा सरकारचा वर सांगितलेल्या दुफळीविरुद्ध उपाय होय. आतां आपण हिंदुस्थानच्या आधुनिक स्थितीकडे वळूं, व समाजांतील शिष्ट विचारांचा परिणाम, कायदे, रूढि आणि शिष्टाचार यांच्यावर कसा काय होतो हें व कोणत्या वर्गातून ते शिष्टाचार उत्पन्न होतात हें पाहूं.

सरकारला जे कायदे करावयाचे असतात ते शिष्ट विचारांचे परिणाम होत. जें चांगलें असेल तें पाळण्यासाठीं, व जें वाईट असेल तें टाकण्यास लोकांस भाग पाडण्यासाठीं सरकार कायदे करितें. सरकार कायदे करितें म्हणजे राजमान्य लोकांचें 'चांगलें काय' यासंबंधाचें मत लोकांस पाळावयास लावतें. मतें लोकांत उत्पन्न होतात, कालांतरानें तीं लोकांत पसरतात व पुढें त्यास राजमान्यता मिळते. ब्यँकांसंबंधानें, स्वच्छतेसंबंधानें वगैरे ज्या गोष्टी इष्ट आहेत असें राजमान्य राजश्रीस वाटेल, त्याच गोष्टी सरकार करतें. आपण राजमान्य राजश्रींच्या वर्गाचें आतां पृथक्करण करूं. या वर्गांत दोन तीन प्रकारचे लोक मोडतात. एक वर्ग म्हटला म्हणजे इंग्रज विद्वानांचा. इंग्रज विद्वान् आपल्या देशांत ज्या कल्पना प्रसृत करतात त्या कल्पना इंग्रज अधिकाऱ्यांच्या डोक्यांत शिरतात, व त्यामुळें इकडे कायदे होतात. आपल्या देशी संस्थानांच्या राज्यकारभारांत व इंग्रजांच्या राज्यकारभारांत जो फरक दिसतो त्याचें बीज हेंच आहे. उदार मनाच्या इंग्रज राजनीतिज्ञांनीं ज्या कल्पना प्रसृत केल्या त्यांचा परिणाम हिंदी शासनसूत्रांवर व कायद्यांवर झाला आहे व होत आहे. हिंदुस्थानांतील राज्याधिकारी होईल तितकें करून इंग्लंडांत उत्पन्न होणारीं शासनध्येयें अवलंबितात व जर तीं त्यांनीं अवलंबिलीं नाहींत तर उदार मनाचे इंग्रज लेखक त्यांचेवर तुटून पडतात व पार्लमेंटातील सभासद सरकारास प्रश्न विचारतात.

आपल्या लोकांतील कांहीं वर्गांत वागत असलेल्यांच्या मतांचा परिणाम शासनतंत्रावर होतो. तो वर्ग म्हटला म्हणजे इंग्रजी शिकलेल्यांचा होय. धर्मशास्त्रदृष्ट्या इंग्रजशासनविषयक लेखकांचें जें महत्त्व आहे तें या वर्गाचें नाहीं. हा वर्ग मुनींचा नसून आग्रही शिष्यांचा आहे. या वर्गाचें आजपर्यंत जें काम झालें तें थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे येणेंप्रमाणें:— इंग्रज मुनींच्या ग्रंथांच्या परिशीलनानें जीं ध्येयें या आमच्या सुशिक्षितांस समजलीं व आवडलीं तीं जर सरकारनें शासनव्यवहारांत पाळलीं नाहींत तर ओरड करणें, व जेव्हां पाळलीं नसतील ते प्रसंग शोधून काढणें. या वर्गाचें सामाजिक कार्य झालें तें एवढेंच. पूर्व-संस्कृतीचें अध्ययन करून व स्वतंत्र वृत्तीनें विचार करून, राष्ट्राच्या परिस्थितीचें सूक्ष्म ज्ञान मिळवून राष्ट्रशासनासंबंधानें तत्त्वें उत्पन्न करणारा मुनींचा वर्ग या वर्गांत अजून

उत्पन्न झाला नाहीं. आमचा सुशिक्षितांचा वर्ग म्हणजे इंग्रज तत्त्ववेत्त्यांचा हस्तक आहे, व समाजाचे बौद्धिक शास्ते या दृष्टीनें त्यांची किंमत कांहीं एक नाहीं.

आतां आणखी एक वर्ग उरला, तो जुन्या विद्येचे प्रतिनिधि जे शास्त्री व भिक्षुक त्यांचा होय. विचारशास्ते या दृष्टीनें या वर्गाची किंमत अल्प आहे, व या वर्गाकडून सध्यां सामाजिक कार्य होतें तें एवढेंच कीं, जे विचार पूर्वी व्यक्त झाले त्यांचीच " पौनःपुन्येन प्रवृत्ति " होते. एवढेंच करणारा हा वर्ग आहे. समाजाचें प्रत्येक अंग घेऊन त्याविषयीं योग्या-योग्यतेचे विचार प्रसृत करणारा असा हा अगर दुसरा कोणता तरी वर्ग झाला पाहिजे.

आपल्या समाजाच्या धर्मनियमनाची आधुनिक स्थिति थोडक्यांत वर्णन करावयाची म्हटली म्हणजे समाजाच्या बऱ्याचशा भागास व अंगांस धर्म-नियमनच नाहीं. या बाबतींत आपल्यापैकीं कांहींचें नियमन ज्या धर्मानें म्हणजे योग्यायोग्यतेच्या विचारांनीं होत आहे त्या धर्माचे प्रवर्तक म्हणजे केवळ दोन आहेत. एक प्राचीन संस्कृत ग्रंथकार व दुसरे म्हटले म्हणजे अर्वाचीन इंग्रज ग्रंथकार. बौद्धिक दृष्ट्या अर्वाचीन हिंदु समाज मेलेलाच आहे.

प्राचीन ब्राह्मणांचे धर्मविचार, व अर्वाचीन इंग्रजांचे योग्यायोग्यतेचे विचार यांची सांगड घालून निराळें स्वतंत्र धर्मशास्त्र निर्माण करणारे तत्त्ववेत्ते समाजांत अजून झाले नाहींत व सामान्यजन दोन प्रकारच्या उपदेशांची सांगड आपापल्या बुद्धीनें कशीबशी घालीत आहे.



## १७. समाजशास्त्र आणि धर्मशास्त्र यांचा परस्पर संबंध

हिंदुस्थानास समाजशास्त्राचे अभ्यासाची फारच आवश्यकता आहे; सामाजिक परिस्थितीचा शास्त्रीय पद्धतीनें अभ्यास करण्याची पद्धत आपल्या देशांत अजून पडली नाहीं. समाजशास्त्र्यांचा वर्ग उत्पन्न होण्यापूर्वी सुधारकांचा वर्ग निर्माण झाला आहे व ही परिस्थिति जरी फारशी स्वाभाविक नसली, तरी समाजसुधारक गेलीं तीस चाळीस वर्षे वाग्युद्ध करीत असतां शास्त्रीय पद्धतीनें आपल्या समाजाचा अभ्यास करणारा वर्ग देशांत उत्पन्न होऊं नये ही मोठी खेदाची गोष्ट आहे. पुष्कळ प्रसंगीं असेंही आढळतें कीं, ज्या लोकांस आपल्या समाजाचें यत्किंचितही ज्ञान नाहीं, असलेच लोक आपला समाज सुधारूं पाहतात. उदाहरणार्थ मिशनरी लोक वगैरे. समाजाचें ज्ञान नसणारे सुधारक लोकोपहासास याच त्यांच्या गुणांमुळें पात्र होतात. समाजसुधारकांपैकीं बहुतेक लोक तर धर्मशास्त्रासारख्या समाजशास्त्रांतर्गत एका महत्त्वाच्या शास्त्रास पूर्णपणें पारखे असतात, आणि कित्येक स्वयंमन्य विद्वान् अगर “ बॉम्बे युनिव्हर्सिटीमान्य ” विद्वान् तर असें म्हणूं लागले आहेत कीं, धर्मशास्त्र हें लवकर नष्ट होईल तितकें चांगलें. तें जितक्या लौकर बुडेल तितकी समाज-सुधारणा लौकर होईल. समाजशास्त्राविषयीं उपेक्षा व धर्मशास्त्राविषयीं अनुदारता आज जी लोकांत दिसत आहे तिचें महत्त्वाचें कारण म्हटलें म्हणजे दोन्ही शास्त्रांसंबंधानें लोकांत असलेलें अज्ञान होय. पूर्वी पुण्याच्या “ काळ ” नांवाच्या एका पत्रांत “ सगळेच नरसू ” या नांवाची एक मजेदार गोष्ट आली होती. सुधारकांचा बौद्धिक इतिहास लक्षांत घेतला म्हणजे त्या गोष्टींत पुष्कळ तथ्य होतें असें वाटूं लागतें. “ नरसूनें ” सुधारक बनण्याचा विचार केला, व तो आपल्या मित्रास कळविला. नरसू दोन चार इयत्ता इंग्रजी शिकलेला होता, व यामुळें त्याचा मित्र त्यास म्हणाला कीं, सुधारक होणें सोपें नाहीं. देशाचे सुधारक बनण्यास पुष्कळ ज्ञान लागतें. यावर नरसू उत्तर करतो, “ छे ! हें सगळें चुकलें ! मला देशाचें जें ज्ञान आहे तेंच मी कसें विसरून जावें याच्या फिकीरींत मी पडलों आहें. ” काळ पत्राचा हा अंक मजजवळ सध्यां नसल्यामुळें नरसूच्या गोष्टीचा सारांश केवळ स्मृतीवर भिस्त ठेवून दिला आहे. महाराष्ट्रांतील प्रमुख सुधारकांत कोणी इतिहासकार नाहीं, समाजशास्त्री नाहीं, व धर्मशास्त्रवेत्ताही नाहीं. रानडे व चंदावरकर हे दोघे

गृहस्थ सुधारकांचे अग्रणी होते. दोघांनाही धर्मशास्त्राशीं अतिशय संबद्ध असलेलें जें कायद्याचें क्षेत्र त्या क्षेत्राशीं त्यांचा निकट संबंध आला होता; पण त्या दोघांसही पाश्चिमात्य कायदेशास्त्र अवगत होतें असें दिसत नाहीं. व धर्मशास्त्रास ते दोघेही पूर्णपणें पारखे होते. सुधारणेचे जे अग्रणी त्यांची स्थिति या प्रकारची तर मग इतरेजनांची स्थिति काय असणार ?

'समाजशास्त्राचें अध्ययन म्हणजे काय,' याची थोडक्यांत कल्पना देतों व धर्मशास्त्र म्हणजे काय व त्याचा समाजशास्त्राशीं संबंध कोठें कसा काय येतो हें थोडक्यांत येथें सांगतों. शास्त्र म्हणजे व्यवस्थित केलेलें ज्ञान, व समाजशास्त्र म्हणजे समाजाच्या संबंधाचें बरेंचसें जमविलेलें व चांगल्या तऱ्हेनें रचना केलेलें ज्ञान. येथें 'समाज' म्हणजे 'हिंदी समाज' धरून समाज-शास्त्राचें ज्ञान असावयास पाहिजे म्हणजे हिंदुस्थानसंबंधाचें कोणत्या प्रकारचें ज्ञान असावयास पाहिजे, हें सांगतों.

एकतर हिंदुस्थानच्या अर्वाचीन स्थितीचें ज्ञान. या ज्ञानामध्यें हिंदुस्थानांत ज्या निरनिराळ्या जाती आहेत त्यांचे आचार, विचार, मनोधर्म, अभिरुचि, महत्त्वाकांक्षा, इत्यादिकांचें ज्ञान.

दुसरें महत्त्वाचें ज्ञान म्हटलें म्हणजे हिंदुस्थानच्या, विशेषेंकरून हिंदूंच्या समाजाच्या पूर्वेतिहासाचें ज्ञान. आज जी सामाजिक परिस्थिति आहे, आज देशांत जीं जीं बंधनें आहेत, जे जे विरोध आहेत, समाजाचे जे निराळे तुकडे दिसत आहेत, त्यांचीं कारणें काय आहेत इत्यादि विषयासंबंधाचें ज्ञान.

तिसरें महत्त्वाचें ज्ञान म्हटलें म्हणजे हिंदुस्थानच्या, बौद्धिक इतिहासाचें ज्ञान, म्हणजे आज जीं लोकांचीं अनेक मतें आहेत. त्यांचा पूर्वेतिहास काय या विषयाचें ज्ञान.

चौथें एक महत्त्वाचें ज्ञान म्हणजे सामाजिक कार्यकारणसंबंधाचें ज्ञान. म्हणजे कोणत्या सामाजिक कृत्याचा काय परिणाम होतो, व संस्थांच्या स्वरूपांमध्यें फेरबदल कसे होतात इत्यादि सामाजिक सृष्टिनियमाचें ज्ञान.

आतां आपण धर्मशास्त्र म्हणजे काय तें पाहूं व त्याचा समाजशास्त्राच्या ज्ञानाशीं काय संबंध येतो याचा विचार करूं.

धर्मशास्त्र म्हणजे ज्या गोष्टी मनुष्यास योग्य आदरणीय व कर्तव्य आहेत त्यासंबंधाचें सुव्यवस्थित केलेलें ज्ञान. मनुष्यास काय करणें योग्य आहे हें त्याच्या परिणामांवरून निश्चित होतें. उदाहरणार्थ, धर्मशास्त्रकारांचा दारूविषयींचा निषेध घ्या. अर्थात् या प्रकारचा निषेध दारू प्याल्यानें होणाऱ्या परिणामाचें ज्ञान असल्यामुळें संभवतो.

तसाच मौंजीबंधनादि संस्कार करण्यासंबंधाचा उपदेश घ्या. या उपदेशाचें कारण लोकांस संस्कारहीनत्वामुळें समाजांत इष्ट नसलेली गति कशी प्राप्त होते, याविषयींचें त्यांस ज्ञान होतें हें होय. पत्नीस घरीं कसें वागवावें यासंबंधाचा धर्मशास्त्रकारांचा उपदेश लक्षांत घ्या. अर्थात् त्यांचा तो उपदेश उत्कृष्ट गृहसौख्य कसें प्राप्त होईल याविषयासंबंधानें त्यांचें जें ज्ञान होतें (अगर कल्पना होत्या) त्याचाच परिणाम होय. धर्मशास्त्रानें जे अनेक श्राद्धादि विधि सांगितले अगर कर्मं उपदेशिलीं त्याचें कारण पारलौकिक उत्कृष्ट गति मनुष्यास अगर त्याच्या पितरांस कशानें प्राप्त होईल यासंबंधाचें त्यांचें ज्ञान (अगर कल्पना) होय. अर्थात् धर्मज्ञान हें अनेक प्रकारच्या ज्ञानांवर अवलंबून असतें. व ज्या ज्ञानाच्या साहाय्यावर धर्मशास्त्रकार आपला उपदेश बसावितात त्या ज्ञानाच्या शुद्धतेवर धर्मशास्त्राच्या ज्ञानाची शुद्धता अवलंबून असते. जर एखाद्या समजुतीवर धर्मशास्त्रकारांनीं आपला एखादा नियम घालून दिला व ती समजूत चुकीची घडली, तर धर्मशास्त्राचा नियमही अर्थात् चुकीचा ठरणार. परलोकासारख्या अदृश्य व अज्ञात गोष्टींसंबंधानें आपलें जें काय असावयाचें तें अनुमानच असणार, व परलोकासंबंधाच्या कालच्या अनुमानांत व आजच्या अनुमानांत जर फरक झाला, तर त्याचा परिणाम देखील धर्मशास्त्रावर होणार.

मनुष्याचें आचरण सामान्यतः ऐहिक आणि पारलौकिक ध्येयांनीं नियमित केलें जातें. कधींकधीं असें होतें कीं, ऐहिक ध्येय मनुष्याच्या अगर राष्ट्राच्या मनांत तीव्र असतें, व कधींकधीं पारलौकिक ध्येय तीव्र होतें. येथें ऐहिक शब्द जो वापरला तो केवळ व्यक्तिविषयक नसून व्यक्ति व व्यक्तींचा समूह—मग तो समूह राष्ट्र असो अगर राष्ट्राहून अधिक महत्त्वाचा जो मानवसमूह आहे तो असो—या दोहोंसही उद्देशून वापरला आहे. सामाजिक ध्येय, अर्थशास्त्रविषयक ध्येय, राजकीय अगर शासनाविषयक ध्येय, इत्यादि सर्व

ध्येयांचा समावेश ऐहिक या शब्दांत केला आहे. ऐहिक ध्येयानें वागणारा मनुष्य म्हणजे केवळ पोटभरू, स्वतांच्या पोळीवर तूप ओढून घेणारा, अगर इंद्रियांचें कोड पुरवून घेणारा नव्हे. ऐहिक ध्येयानें जो मनुष्य प्रेरित होईल व पारलौकिक ध्येयानें जो प्रेरित होईल त्या दोघांचें पुष्कळ सामाजिक बाबतींत मतैक्य होईल. उदाहरणार्थ, चोरी करूं नये, व्यभिचार करूं नये, इत्यादि गोष्टी दोघांसही मान्य असतील, तथापि दोघांची चोरी व व्याभिचार या कृत्यांचा निषेध करण्यांत कारणें निरानिराळीं असतील.

पारलौकिक ध्येय बेसुमार झालें म्हणजे मात्र पुष्कळदां ऐहिक ध्येयानें प्रेरित झालेला मनुष्य पारलौकिक ध्येयानें प्रेरित झालेल्या मनुष्याचा निषेध करील. उदाहरणार्थ, पारलौकिक इष्टस्थिति मनुष्यानें जी कल्पिली असेल ती मिळविण्यासाठीं केवळ कर्मांत आणि उपासनांत मनुष्य गढून गेला म्हणजे ऐहिक ध्येयवादी त्याचा निषेध करील. समजा, एखाद्या राष्ट्रावर परचक्र आलें व राष्ट्रांतील लोक शत्रूंशीं लढण्याची तयारी न करितां "आमच्यावर कोणी कां राजा येईना आम्हांला त्याच्याशीं काय करावयाचें आहे," असें म्हणून संध्या, पूजा, वैश्वदेव, होमहवनें, उपासना इत्यादिकांत जर गढून गेले तर या सर्व लोकांच्या पाठीवर कोरडा ओढावा असें ऐहिकध्येयवादी मनुष्यास वाटेल. ज्याप्रमाणें युद्धास प्रवृत्त न होतां वैश्वदेवास आणि उपासनांस प्रवृत्त झालेल्या लोकांचा सामाजिक मुत्सद्दी धिक्कार करतील त्याप्रमाणेंच राष्ट्राच्या बलवृद्धीसाठीं अवश्य असलेल्या अर्थवृद्धींत व उद्यमांत न गुंततां राष्ट्रांतलीं मनुष्यें इष्ट परलोकांत उडी मारण्यासाठीं धडपडतील तरी देखील ऐहिकध्येयवादी पारमार्थिकांचा धिक्कार करील.

धर्मशास्त्रांत फेरबदल होण्यास दोन गोष्टी कारण होतात. त्या म्हटल्या म्हणजे ज्ञानांत झालेला फेरबदल व ऐहिक व पारलौकिक ध्येयांच्या परस्पर-प्रमाणांत झालेला फेरबदल होय, हें वर केलेल्या विवेचनांवरून लक्षांत येईल.

ज्ञानप्रगतीचा कर्तव्यबुद्धीशीं व धर्मशास्त्राशीं संबंध येथवर व्यक्त केला. समाजशास्त्राचें ज्ञान हें सर्व ज्ञानाचा केवळ एक भाग आहे. तर या समाजशास्त्राच्या ज्ञानाचा परिणाम धर्मशास्त्रावर कसा होतो तें आपण वैशिष्ट्यानें पाहूं. समाजशास्त्राचें ज्ञान पुष्कळ व व्यवस्थित होण्याच्या अगोदर

मनुष्य आपल्या अल्पबुद्धीप्रमाणें विचार करूं लागतो. जेव्हां समाजाचा इतिहास अवगत नसतो तेव्हां मनुष्याचे विचार अगदीं कोते असतात. व समाजांत ज्या घडामोडी होतात त्या घडामोडींचें व त्या घडामोडींवरून दृश्य होणाऱ्या वृद्धि, घटना, नाशादि स्थित्यंतरांचें ज्ञान नसलें म्हणजे समाजानें आपलें पुढील आयुष्य कसें क्रमावें हें मनुष्यास स्पष्टपणें समजत नाहीं. ज्या वेळेस सामाजिक ज्ञानच कोतें असतें त्या वेळेस सामाजिक ध्येयें अस्पष्ट असतात. समाजाच्या इतिहासाचें व त्याबरोबर सामाजिक कृत्यांच्या व घडामोडीच्या कार्यकारणसंबंधाचें ज्ञान मनुष्यास होऊं लागलें म्हणजे त्याच्या सामाजिक कर्तव्याची भावना त्यास तीव्रत्वानें होऊं लागते. जोंपर्यंत प्रगतीचे नियमच समजलेले नसतात व जोंपर्यंत कोणत्या मार्गानें समाज गेला म्हणजे त्यास प्रगति म्हणावें यासंबंधानें अज्ञान असतें तोंपर्यंत आपल्या ऐहिक कर्तव्याचेंच त्यास ज्ञान नसतें. पारलौकिक इष्टगतीच्या ध्येयानेंच मनुष्याचें आयुष्यानियमन होतें. सामाजिक विचारांची मालिका तत्त्ववेत्त्यांनीं देशासमोर ठेवली, व सामाजिक ध्येयें लोकांस कशीं बशीं जरी समजूं लागलीं, तरी त्याचा एक महत्त्वाचा परिणाम होता तो हा कीं, अदृष्ट व पारलौकिक कल्पनांमुळें मनुष्य बहकून जात नाहीं, व अतींद्रियद्रष्टयांचा सुकाळ जरासा कमी होतो. सामाजिक सुधारणा करण्यासाठीं ईश्वरासंबंधानें व त्याच्या इच्छेसंबंधानें वेडगळ अगर शहाणपणाचे सिद्धान्त ठोकून देणारे, व त्यावर म्हणजे अतींद्रिय स्थितीबद्दलच्या कल्पनांवर, एखादा संप्रदाय उत्पन्न करणारे लोक उदाहरणार्थ प्रार्थनासमाज, ब्राह्मसमाज, इत्यादि संस्थांचे उत्पादक, सामाजिक सुधारणांचे खरोखर मित्र नसून शत्रु आहेत असें मला वाटतें. याचें व असल्या संस्थाविरुद्ध मीं वारंवार टीका केली आहे तिचें एक महत्त्वाचें कारण आहे. तें हें कीं, या लोकांनीं अतींद्रिय विषयांवरच चळवळ करून पारलौकिक गोष्टींकडे लक्ष लावण्याचा प्रयत्न केला. "संक्रांतीच्या तिळगुळां-" तील प्रार्थनासमाजावरील डॉ॰ भांडारकर यांनीं लिहिलेल्या लेखांत प्रार्थना-समाजाचें सामाजिक धोरण स्पष्ट केलें आहे. तो लेख म्हणजे सामाजिक सुधारणेशीं या समाजाचें सख्खेपणाचें नातें नाहीं यासंबंधाचा एक कबुलीजबाब आहे. सामाजिक सुधारणा करण्यासाठीं आपण प्रत्यक्ष सामाजिक, राजकीय, धर्मशास्त्रीय विचार प्रसृत केला असतां जितकें लोकांचें लक्ष विसरलेल्या आयुष्यक्रमाच्या पुनरुज्जीवनाकडे लागेल, तितकें परमेश्वराच्या स्वरूपाविषयीं

व परलोकीं नेमकें जाऊन पडण्याच्या युक्त्यासंबंधानें चर्वितचर्वण केल्यानें लागणार नाहीं. मनुष्याच्या मनाची भावनाशक्ति नियमित असते; भावमूलक कर्तृत्वशक्ति देखील नियमित असते. मनुष्याचें मन आनंददुःखादि विकारांचें व अनेक प्रकारच्या इच्छांचें क्रीडास्थान आहे. कोणत्या विचारांचें अगर विकारांचें अगर इच्छांचें प्रामुख्य जनतेच्या मनावर कितपत ठेवावें हें पुष्कळांशीं समाजाच्या धुरीणांवर अवलंबून असतें. समाजाचे धुरीण जोंपर्यंत जागृत व कर्तव्यदक्ष आहेत तोंपर्यंत समाज दुर्गतीस पोंचणार नाहीं. समाजांत ज्या अनेक क्रिया घडत आहेत त्या क्रिया नेहमीं माणसांच्या हातूनच व्हावयाच्या. समाज सुस्थितींत राहण्यासाठीं प्रत्येक क्रियांचे पुढारी समाजांत पाहिजेत. समाजांत औद्योगिक पुढारी पाहिजेत, नीतिवेत्ते पाहिजेत; व समाजाच्या कामकरी वर्गाचे, अनेक जातींचे पुढारी समाजास अवश्य आहेत. सामाजिक पुढारी म्हणजे समाजाच्या सर्वांगीण स्वरूपाकडे लक्ष देऊन, समाज एकांगी होऊं नये, यासाठीं समाजास सर्व तऱ्हेनें चलन देणारे लोक. यांचें एक मुख्य कर्तव्यकर्म म्हटलें म्हटलें म्हणजे सर्व तऱ्हेनें सामाजिक विचार जागृत राखणें. पारलौकिक विचार कांहीं अंशीं सामाजिकच आहे, कारण परलोकासंबंधाच्या कल्पना लोकांस कांहीं अंशीं इष्ट तऱ्हेचें आचरण ठेवण्यास प्रवृत्त करितात, व सामाजिकांस व धर्मशास्त्री यांस पारमार्थिक विचारांचें महत्त्व एवढेंच. देशांत राजकीय चळवळी व विचार, व अर्थशास्त्रीय चळवळी आणि विचार, शासनविषयक अनेक खटपटी, कला व शास्त्र यांच्या प्रगतीसाठीं खटपटी, सामाजिक परिस्थितीचें सूक्ष्म संशोधन, योग्य सामाजिक स्थिति म्हणजे काय यासंबंधीं अनेक दर्शनें; हीं सर्व चाललीं असतां, पारमार्थिक विचार जर प्रस्तुत केले तर त्यापासून फारसा अपाय होणार नाहीं; तथापि या सर्व गोष्टींकडे दुर्लक्ष करून केवळ परमार्थैकटक् बनविण्यास लोकांस जे प्रवृत्त करितात ते लोक मूढ होत. सामाजिक व राजकीय विचार देशांत अत्यंत अल्प असतां जेव्हां पारमार्थिक विचार उचल खातो तेव्हां तो लोकांस धर्ममूढ बनवितो, आणि शास्त्रीय ज्ञान देशांत ज्या वेळेस अत्यंत अल्प असतें, तेव्हां प्रसृत होणारें पारमार्थिक ज्ञान देशास पूर्णपणें मूढ बनावितें. थिऑसफी नांवाचें जें थोतांड एक हुशार इंग्रज वृद्धा आपल्या देशांत माजवीत आहे त्याच्या योगानें सध्यां देशांत मूढपणा वाढत आहे. या थोतांडाच्या प्रसाराचें मुख्य कारण

एक हें आहे कीं, शास्त्रीय ज्ञानाच्या पायावर आमचे सिद्धान्त उभारले गेले आहेत असें हें लोकांस भासावितें. शास्त्रीय परिभाषेनें युक्त तथापि ज्यांत वेडगळपणाच बराचसा भरला आहे असे ग्रंथ रेम्याडोक्या थिऑसफिस्ट शास्त्रज्ञांनीं प्रसिद्ध केले आहेत. मूर्खपणाचे ग्रंथ देशांत उत्पन्न झाले तर त्यापासून देशाचें तादृश नुकसान नाहीं तथापि मूर्खपणाच्या ग्रंथामुळें देशाचें बौद्धिक नुकसान न होण्यास एक दोन गोष्टी अवश्य असतात. त्या म्हटल्या म्हणजे देशांत तीव्रबुद्धीचे शास्त्रज्ञ बरेच असावे लागतात, व त्या वर्गाचें वजन देशावर पडत असावें लागतें. थिऑसफीचा प्रचार इंग्रज चिकित्सक व शास्त्रज्ञ मंडळींत नाहीं व अमेरिकेंतील सामान्य सुशिक्षितांतही नाहीं. बऱ्याच सुशिक्षितांस " थिऑसफी " हा शब्दच ठाऊक असेल कीं नसेल याची वानवाच आहे. तेथील युनिव्हर्सिट्यांच्या ज्या लायब्रऱ्यांमध्यें पांच लाखांवर पुस्तकें असतात, व हिंदुस्थानीय गीर्वाणाचे दहा हजारांपर्यंत ग्रंथ असतात त्या लायब्रऱ्यांत थिऑसफीचें पुस्तक एकही नसेल. कार्नेल युनिव्हर्सिटीच्या लायब्ररींत थिऑसफीवर जें पुस्तक गेलें तें मीं नजर केलें होतें. एखादें मूर्खमत पसरविण्याचा प्रयत्न अमेरिकेंत जर कोणी करूं लागला तर तेथील शास्त्रज्ञांचा वर्ग त्या मताचें परीक्षण करील. लोकांचा त्यांच्या विद्यापीठांतील शास्त्रज्ञांवर विश्वास असतो, व रेम्याडोक्या शास्त्रज्ञांच्या मताची किंमत त्या राष्ट्रांत ठाऊक असते. अमुक अमुक प्रयोग केला म्हणजे अमुक अमुक दिसतें अगर होतें अशा कोणी गप्पा मारल्या तर इतर शास्त्रज्ञ तो प्रयोग करून पाहतात व खऱ्याखोट्याचा निवाडा करितात. जर एखादा मनुष्य आपल्या अतींद्रियद्रष्टेपणाचें ( Occult sight ) स्तोम माजवूं लागला तर, सुशिक्षित लोक त्या बरळण्याकडे दुर्लक्ष करितात, व भोळसर मंडळी व बायका याच मनुष्याच्या नादीं लागतात.

हिंदुस्थानामध्यें देशांत परक्यानें पसरविलेल्या मताचें शास्त्रीय दृष्टीनें परीक्षण करणारा वर्ग नाहीं. शुद्ध ज्ञान असलें म्हणजे भ्रष्ट ज्ञान ओळखतां येतें. शुद्ध ज्ञानाचा संग्रह देशांतील लोकांत नाहीं, व तो संग्रह वाढविण्याचीं साधनें म्हणजे, ग्रंथालयें ( लायब्रऱ्या ) व शास्त्रकार्यमंदिरें ( लेबोरेटऱ्या ) देशांत नाहींत व त्यामुळें पाश्चात्य ज्ञानावर रचलेला मूर्खपणा तपासून पाहणें लोकांस शक्य नाहीं. पाश्चात्य देशांतील शास्त्रीवर्गाच्या विद्वत्तेसंबंधानें एखादें कवन

गाऊन त्यांच्या नांवानें कांहीं बोललें तरी येथें चालेल. पाश्चात्य तत्त्ववेत्त्याचें अगर संशोधकाचें नांव सांगितलें अगर आपल्या मताच्या पुष्टीकरणार्थ पाश्चात्यांच्या मताचा उतारा दिला म्हणजे आपलें मत आपण सिद्ध केलें असें वाटतें. आपल्या मनाची खात्री करून घ्यावयाचें कारण नाहीं. "माझ्या मनाची खात्री झाल्याशिवाय मला जगांतील सर्व विद्वानांच्या मताची किंमत नाहीं" अशा प्रकारचा मनाचा खंबीरपणा आपल्या देशांत आला नाहीं.

देशांतील ज्ञानवृद्धीचा सामान्य परिणाम म्हटला म्हणजे पारमार्थिकांच्या व अतींद्रियद्रष्टयांच्या प्रयत्नावर एक तऱ्हेचें दडपण राहतें. समाज व राष्ट्र याविषयीं विचार जागृत झाल्यानें, पारलौकिक विचार मनुष्याच्या मनाचा पूर्णपणें ताबा घेत नाहींत, व सामाजिक नीति पारमार्थिक विचारांनीं निश्चित न होतां सामाजिक व राजकीय विचारांनीं निश्चित होते.

समाज, व त्याचें शासन यासंबंधीं जो विचार व्हावयाचा तो केवळ समाजाच्या वरवर अवलोकनानें न होतां अधिक सूक्ष्म दृष्टीनें व समाजाच्या परिपक्व ज्ञानानें व्हावा, हें कोणीही कबूल करील. समाजाचें उत्तम प्रकारचें ज्ञान म्हणजेच समाजशास्त्र होय. समाजाचें शासन उत्तम प्रकारें व्हावें यासाठीं जीं शास्त्रें निर्माण होतात, त्यांपैकींच धर्मशास्त्र हें एक होय. धर्मशास्त्रशोधन करण्यासाठीं समाजशास्त्रांत शोध करणें हें आपलें कर्तव्यकर्म होय.



श्री. म. माटे ( १८८६ )

# १८. जातीच्या हरळीचें मूळ

जातिसंस्थेच्या विरुद्ध लोक आज कितीतरी दिवस बोलत आले आहेत, आजही बोलत आहेत, आणि अंदाज असा आहे कीं, पुढें कित्येक वर्षें बोलत राहतील. कोणा लोकांचा असा समज आहे कीं, इंग्रजी राज्य सुरू झालें आणि मिशनरी लोकांचें ऐकून आपले सुधारक जातिसंस्थेच्या विरुद्ध बोलूं लागले. खरी गोष्ट अशी आहे कीं, ही संस्था जितकीं हजारों वर्षें हिंदुस्थानांत नांदत आली आहे तितकीं हजारों वर्षें अनेक लोक तिच्या विरुद्ध बोलत आले आहेत. किंबहुना प्रत्येक युगमानांतल्या समाजसुधारकांची, धर्मप्रवर्तकांची आणि उदारमतवाद्यांची ही एक ठराविक पट्टी आहे; तिच्यावर बोट ठेवल्याशिवाय यांपैकीं कोणाचेंही संगीत संपलेलें नाहीं आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं, हा प्रकार आज इतकीं शतकें चालू असूनही पुनः ही संस्था जवळजवळ जशीच्या तशी कायमच आहे. जों जों हिच्या विरुद्ध बोलावें तों तों तिला बळ चढतेंसें दिसतें. हिला निंदेचें विष किती जरी पाजलें तरी त्या विषाचा च्यवनप्राशच बनतो आणि ही संस्था पूर्वींपेक्षांही रसरशीत दिसूं लागते. जातिसंस्थेच्या विरुद्ध बोललेलें सर्वांना आवडतें; फक्त त्यांच्या स्वतःच्या जातीच्या संबंधानें मात्र कोणी बोलतां कामा नये ! जर का कोणी तसें बोललें किंवा नुसता त्या जातीचा उच्चार केला तर हे भले लोक सर्पाप्रमाणें फूत्कार करून तुमच्या अंगावर येतील. ते जेव्हां जातीच्या विरुद्ध बोलतात तेव्हां त्यांच्या मनांत दुसऱ्याची जात असते. असले समाज-विचारी लोक जिकडे तिकडे पसरलेले असल्यामुळें ही संस्था कित्येक शतकांची बुढ्ढी असूनही आपला संसार मोठ्या सुखानें चालवीत आहे. जातिसंस्थेच्या संबंधानें जर का तुम्ही कांहीं विवेचन केलेंत आणि तें कितीही सौम्य आणि तात्त्विक स्वरूपाचें असलें तरी उदाहरणादाखल घेतलेल्या जातींचीं नांवें वाचतांच त्या त्या जातीचे लोक चवताळून उठतील आणि ‘ तुम्हांला कोर्टांत कां खेचूं नये ’ अशा नोटीसा तुमच्यावर बजावतील. म्हणून कोणाला मनस्ताप होऊं नये, मलाही उपसर्ग पोचूं नये आणि

विषयाचें तर विवेचन व्हावें यासाठीं कोणाचींही नांवें न घालतां शीर्षकांत दिलेल्या विषयाचें विवेचन मी करतों.

वर्ण आणि जात ही मुळांत एकच असावी असा माझा समज आहे. वर्ण हे गुणांवर आधारलेले होते असें कोणी कोणी पंडित सांगतात. परंतु पूर्वीच्या कोणच्या युगांत ही व्यवस्था चालू होती हें ठरवावयास मला तरी पुरेसें साहित्य सांपडलेलें नाहीं. माणसाचा वर्ण गुणांवरून ठरवीत होतें असें क्षणभर गृहीत धरलें तर आपल्या मनाशीं अनेक प्रश्न उपस्थित होतात. ही गुणांची पारख कोण करीत असे? समाजांत उत्पन्न होणाऱ्या प्रत्येक स्त्री-पुरुषाच्या गुणांची पारख कोणच्या वयांत होत असे? कोट्यवधि लोकांच्या गुणांची पारख करणारी ही जगड्व्याळ संस्था गांवोगांवीं आपलें काम करीत असे कीं आपल्या गुणांची परीक्षा करून घेऊन आपला वर्ण ठरविण्यासाठीं माणसांना देशाधिकाऱ्यांच्या कचेरींत जावें लागत असे? अशा प्रकारची नोंद जुन्या वाङ्मयांत कोठें सांपडते काय? गुणांची संख्या कोणीं ठरविली होती? ती सर्वमान्य झालेली होती काय? आपल्या पोटीं आलेलीं मुलें, देशाधिकारी किंवा गांवचे पाटील दुसऱ्या कोणच्या तरी वर्णांत नेऊन घालीत आहेत हें पाहून सुद्धां त्या मुलांचे आईबाप गप्पच बसत होते काय? कुटुंबव्यवस्था एवढी लवचीक होती अशाबद्दलचा पुरावा कोठें उपलब्ध आहे काय? बरें गुणांप्रमाणें वर्ण ठरत होते असें वादासाठीं मानलें तरी कोणच्या युगांत आणि कोणच्या प्रसंगीं ही पद्धति माणसांनीं टाकली असेल याची तरी आठवण इतिहासाला आहे काय? जर ती पद्धत समाजानें टाकली असेल तर ती अत्यंत अवजड आणि सामाजिक बेदिली उत्पन्न करणारी आहे म्हणून समाजानें टाकली काय? जे कोणी अशा तऱ्हेचें विधान करतात कीं, पूर्वीं एकदां समाजांत गुणांवरून वर्ण ठरवीत होते त्यांना वरील प्रश्नांचीं उत्तरें द्यावीं लागतील. माझा तर असा समज आहे कीं, गुणांवरूनच जर माणसाचा वर्ण ठरवावयाचा झाला तर, तो तो माणूस मेल्यानंतरच वर्णनिर्णय-समिती बसवितां येईल. माणसाचे गुण ठरवावयाचें ते कांहीं त्याच्या अंगांत टेस्ट-टयूब म्हणजे कसोटीची नळी घालून ठरवितां येण्यासारखे नाहींत. त्याच्या बोलण्यावरून किंवा कृत्यांवरून त्याच्या गुणांची किंमत ठरवितां येणें शक्य आहे. आणि हें त्याचें बोलणें आणि हीं त्याचीं

कृत्यें तो मरेतोंपर्यंत चालूंच राहणार. हीं सर्व एकाच गुणाचीं दर्शक असतील असें केव्हांही म्हणतां येणार नाहीं. आज एखाद्यानें एक चांगलें कृत्य केलें तर उद्यां त्याच्या हातून एखादें वाईट कृत्य होण्याचा संभव असतो; आणि आज जो तोंडानें अभद्र वाणी काढीत असेल तो उद्यां सात्त्विक आणि मंगल वचनें बोलेल. मग अशा माणसांचे वर्ण ते पूर्वींचे देशाधिकारी किंवा पाटील, कुळकर्णी केव्हां ठरवीत होते ? का ज्या दिवशीं एखाद्या माणसाच्या तोंडून चांगला शब्द निघत असेल किंवा त्याच्या हातून एकादें चांगलें कृत्य झालें असेल त्या दिवशीं त्याला उंच वर्णाचा ठरवीत असतील आणि कांहीं दिवसांनीं त्याच माणसाच्या तोंडून वाईट शब्द निघाला किंवा त्याच्या हातून विपरीत वर्तन झालें तर त्याला नीच वर्णाचा ठरवीत असतील ? आणि हा सारा गोंधळ, म्हणजे गुणांची परीक्षा चालू ठेवण्याचें खातें, कोण सांभाळीत होतें ? आणि त्यांचे निकाल कोण मानीत होते ? हे वर्णठरवे अधिकारी कोण नेमत असे ? आणि ते स्वतः कोणच्या वर्णाचे असत ? शिवाय स्त्रियांचे वर्ण ठरविण्याची त्यांच्यापाशीं कोणती सोय होती ? बापड्या स्त्रियांना फारसें बोलण्याचीहि चोरीच होती. आणि सैंपाकपाण्याच्या आणि मुलें–लेंकरें संभाळण्याच्या पलीकडे त्यांना कांहीं कृत्येंही करतां येत नव्हती. मग या स्त्रियांच्या गुणांची पारख त्या सुवर्णयुगांतील परीक्षक कोणच्या साधनांनीं करीत ? आणि त्यांना कोणचे वर्ण बहाल करीत ? पूर्वी एकदां गुणांनीं वर्ण ठरत असे ही किंवदन्ति, सामाजिक इतिहास म्हणून आवर्जून सांगणाऱ्या लोकांना या प्रश्नांचीं उत्तरें द्यावीं लागतील. माझा असा समज आहे कीं, भूतकालाच्या गर्द सांवल्यांत चांचपून पाहणाऱ्या संशोधकाच्या हाताला या कामीं अवश्य असलेला पुरावा सांपडणार नाहीं. ही गुणपरीक्षा आणि वर्णव्यवस्था पूर्वी चालू होती अशी वार्ता आपण कैक दिवस ऐकत आलों आहोंत; परंतु ती पुराव्यानें कोणीही सिद्ध केलेली नाहीं. गुणांप्रमाणें माणसांच्या प्रती पडाव्या हा विचार शेंकडों लोकांना संमत असल्यामुळें, पूर्वी वर्ण नांवानें ज्या प्रती समाजांत पडलेल्या होत्या त्या, या सूत्राला अनुसरूनच पडलेल्या असतील, असें मानण्याकडे अनेक लोकांचा कल असतो आणि यामुळेंच ही उपपत्ति कोणाकोणाच्या तोंडून ऐकूं येते.

माझ्या मतें वर्ण म्हणजेच पूर्वी मोठाल्या जाती होत्या आणि या पांचसहा

वर्णांच्या सहस्रावधि जाती झालेल्या आहेत. वंश, उपवंश, धंदा, प्रादेशिकता, धार्मिक उपपंथ, तत्त्वपंथ, आहारविहार, संकर, अभिसरण न्याय अशीं अनेक कारणें खचीं पडून पोटजाती उत्पन्न झालेल्या आहेत. या मूळ वर्णांना कांहीं कांहीं ठराविक कामें लावून दिलेलीं होतीं. हीं कामें लावून देण्याचें काम ब्राह्मणांनींच केलें होतें असें समजणें म्हणजे जुनी समाजव्यवस्था न समजण्यासारखेंच आहे. ब्राह्मण आणि क्षत्रिय हे दोघे या कामाला प्रत्यक्ष जबाबदार होते. आणि वैश्य हे अप्रत्यक्षरीत्या जबाबदार होते. क्षत्रियांना आणि वैश्यांना वर्णव्यवस्था जर पसंत नसती तर ब्राह्मणांच्या देवानें सांगितलें असतें तरी सुद्धां क्षत्रिय-वैश्यांनीं ती पत्करली नसती. पांच वर्णांपैकीं पाहिले तीन वर्ण या कामीं जबाबदार होते. जीवितावरची सगळी मलई, मग ती कल्पनारूप असो, वैभवरूप असो किंवा भोगरूप असो, हे तीन वर्णच खात होते. परंतु या नवीन काळांत समत्वाचा घोष सर्वत्र उठत असल्यामुळें, आणि हिंदुसमाजव्यवस्थेंतील उतरता अनुक्रम त्याज्य ठरत असल्यामुळें, क्षत्रिय आणि वैश्य हे भित्रेपणानें या जबाबदारींतून आपलें अंग काढून घेत आहेत आणि खिस्ती मिशनऱ्यांनीं, राजकर्त्यांनीं व भोळसट सुधारकांनीं फांशी द्यावयास काढलेला ब्राह्मणच या कामाला जबाबदार होता, असें ते बेलाशक सांगत आहेत. पूर्वीची हिंदुसमाजरचना ही पंचतंत्रांतल्या तीन धूर्तांची गोष्ट आहे; आणि हे तीन धूर्त म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य हे होत. अधिकार, सुखें व वैभवें भोगावयास सांपडत होतीं तेव्हां क्षत्रिय-वैश्यांनीं ब्राह्मणांशीं संगनमत केलें; पण आधुनिक काळांत ही बलामत अंगावर येत आहे असें दिसूं लागतांच ते अंग झाडीत आहेत; आणि आपण जणूं कांहीं त्या गांवचेच नव्हों व ही सारी जबाबदारी त्या ब्राह्मणांचीच आहे असें ते सांगत फिरत आहेत. या हिंदुसमाजांत जे खरे हाल झाले ते शूद्र आणि अतिशूद्र यांचे झाले आणि ते पाहिल्या तिघांनीं केले, एकानें नव्हे.

परंतु जरी या वर्णांना निरनिराळीं कामें लावून दिलेलीं होतीं तरी त्या त्या वर्णांतील लोक केवळ शास्त्रानेंच लावून दिलेलीं कामें करीत असत, असें समजणें हा भ्रम आहे. खुद्द वेदकाळांत वेदविद्येशिवाय इतर सत्तावीस प्रकारचे धंदे ब्राह्मण लोक करीत असत. सगळेच्या सगळे संख्येनें समृद्ध असलेले क्षत्रिय बारा महिने आणि तिन्ही त्रिकाळ तलवारी फेकीतच बसले

असतील असें समजणें चूक आहे. शास्त्रांनीं जरी त्या त्या वर्णांतील बहुतेक लोकांच्या मनाचा कल ठरवून देण्याला मदत केलेली असली तरी शास्त्रानें सांगितलेलीं कामें करावयास अपात्र असलेले हजारों लोक त्या त्या वर्णांत राहात असत. सगळे ब्राह्मण अध्ययन–अध्यापन करण्यास लायक होते, सगळे क्षत्रिय लढावयास समर्थ होते किंवा प्रत्येक वैश्य धनोत्पादनाचें कसब जाणत असे, असें समजणें अगदीं चूक आहे. सामाजिक गरजा आणि सर्वत्र माणसांच्या मनाची स्वयंभू प्रवृत्ति ही शास्त्राच्या चाकोरींतून अखंड चालत राहावी हें मानवी स्वभावाच्या विरुद्ध होतें; आणि म्हणून त्या त्या वर्णांतील मोठा गट जरी लावून दिलेले व्यवसाय किंवा तत्सम इतर कांहीं धंदे करीत असला तरी या प्रत्येक वर्णांतून धंद्यासाठीं अनेक लोक बाजूला सरकत होते. आणि हेंच स्वाभाविक होतें. शास्त्रानें म्हटलें म्हणून विद्येची प्रवृत्ति असलेले लोकच ब्राह्मण वर्णाच्या पोटीं घालावेत, लढण्यास व धनोत्पादनास समर्थ असलेली प्रजाच क्षत्रिय–वैश्यांच्या घरीं जन्मास घालावी हा न्याय सृष्टीनें काय म्हणून संभाळावा ! रुचि, सामर्थ्य, कल इत्यादि सर्व बाबतींत आनुवंशिकता व जीवनकलह हीं संभाळतांना विविधताही उत्पन्न करण्यांत आनंद मानणारी सृष्टि शास्त्रांच्या मर्यादेच्या आंतच वावरत राहील हें कसें बरें शक्य होतें ! अर्थात् राजाच्या दरबारांत लेखन–व्यवसाय करणें, कारकुनी करणें, मंत्रिपदें चालविणें, शिरस्तेदाऱ्या करणें, कर गोळा करणें, त्याच्या वजावाटीची नोंद करणें अशीं जीं विद्येच्या आसपासचीं कामें होतीं तींही ब्राह्मण लोक करूं लागले. ब्राह्मण लोकांचीं आडनांवें तपासून पाहावीं म्हणजे त्यांत अध्ययन–अध्यापनाचा धंदा दर्शविणारीं किती आणि इतर प्रकारचे धंदे दाखविणारीं किती याचा निकाल लागेल ! पाठक त्रिवेदी, चतुर्वेदी, दीक्षित अशांसारखीं नांवें अध्ययन–अध्यापनाचीं दर्शक आहेत. पण देशमुख, देशपांडे, देसाई, सरदेशपांडे, डांगे, जकाते, हडप, बिनीवाले, पेशवे अशांसारखीं आडनांवें काय दर्शवितात बरें ! यांत अध्ययन–अध्यापन कोठें येतें ! क्षत्रियांनींही असेंच केलें. लढाईच्या पेशांत सगळाच्या सगळा क्षत्रिय वर्ण, मानवी मनाची प्रवृत्ति लक्षांत घेतां सामावणें अशक्य होतें. तलवारी बाजूस ठेवून त्यांनीं इतरऱ्हेचे लहान मोठे धंदे सुरू केले. तीच गोष्ट वैश्यांच्या संबंधानेंही झाली. यांनीं तर फारच मोठी चलाखी केली. खरें खरें धनोत्पादन त्यांनीं सोडून दिलें आणि दुसऱ्यांनीं उत्पन्न केलेल्या धनाची चाळवाचाळव व पुंजी करण्याचा

धंदा सुरू केला. म्हणजे शास्त्रानें लावून दिलेले व्यवसाय ज्यांना परवडले ते त्यांनीं उचलले. पण बाकीच्या लोकांनीं जें करतां आलें तें करावयास सुरुवात केली. पण आम्ही मूळ अमुक वर्णाचे हें त्यांचें स्मरण मात्र शिल्लक राहिलें. ब्राह्मण–क्षत्रिय–वैश्यांनीं आपल्या तिघांच्या बाबतींत जरी ही सोडवणूक करून घेतली तरी शूद्र आणि अतिशूद्र यांना मात्र त्यांनीं त्यांच्या त्यांच्या सेवारूप धंद्यांत, राबावयाच्या धनोत्पादक कामांत, आणि क्षुल्लक व्यवसायांत शास्त्राच्या बळावरून डांबून ठेविलें. या तिघांनीं शास्त्र मोडलें तें स्वतःच्या सोयीसाठीं होय. आणि शूद्रातिशूद्रांना शास्त्र लावून ठेविलें तें सुद्धां स्वतःच्या सोयी-साठींच होय ! हे सर्व वर्ण निरनिराळ्या व्यवसायांत शिरले पण त्यांची वर्णाची आठवण मात्र कायम राहिली. आणि मौज ही कीं, बारीक बारीक वंशभेद, व्यवसाय, धर्माचे उपपंथ, प्रादेशिकता, तत्त्वज्ञान, रूढि इत्यादि अनेक कारणें खर्चीं पडून वर सांगितल्याप्रमाणें यांच्या हजारों जाति बनल्या आणि त्याच आज सगळीकडे शिल्लक आहेत.

या जाति मोडावयाच्या कशा ? हा एक जबरदस्त प्रश्न सर्व लोकांच्या डोळ्यांसमोर उभा आहे. बुद्धानें जाति मोडल्या असें म्हणण्याची वहिवाट आहे. परंतु बुद्धाचें बंड वर्ण–कर्म–कल्पनेविरुद्ध होतें. तो स्वतः क्षत्रिय असल्यामुळें ब्राह्मणांच्या वर्चस्वाविरुद्ध त्याचें बंड होतें. त्यानें जर जाती खरो-खरच मोडल्या असल्या तर पांच हजार जातींचा सध्यांचा हा नवा जंजाळ पुन्हा उत्पन्न करणारे सोशिआलॉजिस्ट त्याच्यामागून कोणीं उत्पन्न केले ! त्यांनीं हा पराक्रम तरी केव्हां केला ! इतिहासकारांना कांहीं जाब देतां येतो का ? आणि जातीची उच्चनीचता मुरगळून टाकलेल्या समाजांत ती नव्यानेंच उत्पन्न करणाऱ्यांचें बाकीच्या सर्व लोकांनीं कसें व काय म्हणून ऐकलें ? याचा कोणीं संशोधकांनीं तलास लावून दिला तर इतिहासावर मोठे उपकार होतील ! खरी गोष्ट अशी आहे कीं, बुद्धाच्या प्रयत्नानें जाती मोडलेल्या नसल्या पाहिजेत. जैनांनीं जाती मोडल्या असें एक श्रेय त्यांनाही अर्पण करण्याची चाल आहे. पण खुद्द लहानशा जैन समाजांत ज्या अनेक बेटीबंद जाती आज सगळीकडे दिसून येतात त्या पाहिल्या म्हणजे जातिभेदाविध्वंसनाचा त्यांचा तो पराक्रम संशयास्पद वाटतो. लिंगायतांनीं जातिभेदावर शास्त्र उचललें खरें, पण आजच्या काळांत हिंदुसमाजांतला जातीचा संच लिंगायत हें उपपद

लावून त्याही समाजांत आपलें ठाण मांडून बसला आहे असें माहीतगार लोक सांगतात. शिखांनीं जातिभेद नष्ट करावयाचा असें ठरविलें; पण ब्राह्मण–क्षत्रियांतून शीख बनलेल्या लोकांच्या जोडीला जेव्हां शेतकरी जाटांतून शीख बनलेले लोक येऊन बसले तेव्हां त्यांची कोण तारांबळ उडाली याचा इतिहासही वाचण्यासारखा आहे. ख्रिस्ती धर्मांत जातिभेद मानीत नाहींत असें मत ख्रिस्ती पाद्र्यांनीं रूढ करून ठेविलें आहे. पण दक्षिण हिंदुस्थानांतील ख्रिस्ती समाजाच्या गणनाकोशांतील हकीकती एकदां वाचा म्हणजे जात त्याही ठिकाणीं कशी टिकून आहे हें दिसून येईल. मुसलमानांविषयीं बोलावयाचें सध्यां टाळलें पाहिजे. कारण ' हाईक ' म्हणतां ब्रह्महत्या होण्याचा संभव आहे. वर दिलेल्या सर्व लोकांचे हेतु चांगले होते. पण जातिभेद मोडावयास त्यांनीं जीं साधनें योजलीं तीं अगदीं भोळेपणाचीं होतीं. त्या त्या पंथाचे उत्पादक व प्रचारक लोकांना सांगूं लागले कीं, " परमेश्वराच्या घरीं आपण सगळे सारखेच आहोंत. देव थोर आहे, त्याच्या दारांत श्रेष्ठ-कनिष्ठ भाव कसलाहि नाहीं; तो ब्राह्मणाची प्रार्थना ऐकतो आणि शूद्राची ऐकत नाहीं असें कांहींच नाहीं; म्हणून आपण सर्वजण सारखेच आहोंत." या महात्म्यांचा हा उदार संदेश कोणालाही पटण्यासारखा होता. परमेश्वराच्या दारांत ब्राह्मण काय आणि शूद्र काय सारे सारखेच. या विचाराच्या औदार्यानें अनेक लोकांचीं मनें भरून गेलीं आणि त्यांनीं परस्परांशीं समत्व मानलें. पण " परमेश्वराच्या दारांत आपण सगळे सारखे आहोंत " या वाक्यांतील ' परमेश्वराच्या दारांत' हे शब्द वरील उदार प्रचारक जेव्हां रद्द करूं लागले आणि आपण सगळेजण सारखेच आहोंत, म्हणजे एकच आहोंत, म्हणजे एकमेकांशीं आपण रक्त-संबंधानें बांधले जाणें योग्य आहे एवढेच शब्द जेव्हां त्यांच्या तोंडून येऊं लागले, तेव्हां वर दिलेल्या प्रत्येक पंथांतील मिश्र अनुयायी–वर्ग आपापल्या ठिकाणीं चपापला आणि ' आपण सगळे सारखे आहों याचा हा नवा अर्थ आपल्याला मान्य नाहीं ' असें प्रत्यक्ष वर्तनानेंच दर्शवूं लागला ! परमेश्वराच्या दारांतील समत्व सर्वांना मान्य होतें. पण हें सामाजिक संबंधांतील समत्व म्हणजे एकत्व मान्य करणें त्यांना कठीण जाऊं लागलें. आणि मग यांतील बहुतेक सर्व पंथांत जातिभेदाचा आखाडा जसाच्या तसा शिल्लक राहिला ! म्हणून देवाचें नांव घेऊन जातिभेद मोडणें या फंदांत आतां कोणी पडूं नये. त्यानें जातिभेद मोडत नाहींत हें मागेंच सिद्ध झालें आहे. आतां सुद्धां

एकधर्मत्वाचें नांव घेऊन जात मोडण्याचा कोणी कोणी उपदेश करतात. पण तोही वायां जाणार आहे. एका धर्मांत असलें म्हणजे त्या सर्व लोकांनीं एका जातीचेंच असावें लागतें हाही अपसिद्धान्त आहे. काळ्या निग्रो लोकांपासून तों नार्वेतील शुभ्र माणसांपर्यंत सर्व लोक ख्रिस्ती आहेत पण म्हणून ते एका जातीचे आहेत असें मानणें आणि सांगणें म्हणजे आपली आणि लोकांची फसवणूक आहे. मग या इतक्या थोरल्या जाती नाहींशा तरी कशा व्हावयाच्या ? त्या नाहींशा करावयास कोणता इलाज करावयाचा ? या प्रश्नाचें उत्तर गेलीं पंचवीस वर्षें मी जें देत आहें आणि ज्याचा प्रपंच ' परशुराम–चरित्र ' या पुस्तकांत शेवटच्या प्रकरणीं मीं केला आहे तेंच उत्तर येथें साक्षेपानें देतों.

सध्यां हिंदु समाजानें जें करावयास हवें तें हें कीं, त्यानें संधिसमानत्वाचें तत्त्व पत्करावें. सर्व लोकांना, मग ते ब्राह्मण असोत, न्हावी असोत, तेली असोत, कोळी असोत, मांग असोत, महार असोत, त्यांच्या अंगांत असलेल्या गुणांचा विकास करण्याची संधि द्यावी. प्रत्येक हिंदुमात्राच्या मनांत आणि बुद्धींत कांहीं शक्तींचीं बीजें सृष्टीनें खोचून ठेवलेलीं आहेत. या बीजांचा विकास करण्याची संधि प्रत्येक हिंदुमात्राला कसलाही भेदभाव न करतां समाजानें दिली पाहिजे. हें समत्व आपण पत्करलें पाहिजे. ही संधि मिळाली म्हणजे प्रत्येकाच्या गुणांचा आणि सामर्थ्याचा पूर्ण विकास होईल. आणि प्रत्येकाची खरी खरी किंमत काय आहे याचा निकाल होईल. माणसाच्या किंमतीच नव्यानें ठरतील. सध्यां असें होतें कीं, अमूक मनुष्य अमक्या कुळांत जन्माला आला आहे म्हणून त्याची अमकी किंमत असलीच पाहिजे असें आपण धरून चालतों. म्हणजे जो पहिल्या तीन वर्णांत जन्माला आलेला असेल तो प्रत्यक्ष व्यवहारांत किती जरी नालायक दिसला तरी त्याला कांहीं एक किंमत असलीच पाहिजे असें लोक धरून चालतात. आणि शूद्रातिशूद्रांत जरी कोणाच्या अंगीं कांहीं गुण असले तरी ते त्या वर्णांतील म्हणून वाया जातात. हें सर्व चूक आहे. सामर्थ्य-विकासाची संधि दिली म्हणजे कोण किती किंमतीचा आहे हें ठरूं लागेल. आणि ज्या जातींत विशेष प्रकारचीं समर्थ माणसें उत्पन्न होत आहेत असें दिसेल त्या पुढारलेल्या जाती ठरतील. आणि अशा या पुढारलेल्या जाती तुल्यबल म्हणजे किंमतीनें सारख्या ठरल्यामुळें एकमेकींत कालेंकरून मिसळून जातील. पण मिसळण्याच्या आधीं आपण सामर्थ्यानें समान आहोंत असें त्यांना जातिशः दिसून आलें पाहिजे. ज्या जाती ज्या सामर्थ्याच्या असतील

त्या जाती तेवढ्याच सामर्थ्याच्या इतर जातींशीं एक होऊं लागतील आणि जातीची संख्या भराभर कमी होऊं लागेल. व्यक्तिस्वातंत्र्याला पुढील काळांत पुष्कळच अवसर राहणार असल्यामुळें सारख्या सामर्थ्याचीं पण विषम जातींतील दोन स्त्रीपुरुषेंसुद्धां विवाहबद्ध होऊं शकतील. आणि अशाही रीतीनें जातींतील दुजा भाव कमी होत जाईल.

माणसाची जात आपण समजतों त्यापेक्षां जास्त जाणीक आणि आग्रही आहे. गुणांचें समत्व जरी दिसून आलें तरी पुष्कळांना मागल्या पीठिकेची ओढ राहील. पुष्कळ जाती आपल्या त्वचेचा रंग गमाविण्यास तयार होणार नाहींत. ज्या जातींना सृष्टीनें चांगलें रूप दिलेलें आहे त्यांना हें रूप गमावूं नये असें वाटेल. तत्त्वज्ञान व मतसंप्रदाय हीं सोडावयास कोणी कोणी तयार होणार नाहीं. हे सूक्ष्म अडथळे शिल्लक राहतीलच. पण वर सांगितल्याप्रमाणें माणसाच्या गुणविकासनाला आणि त्याच्याच जोडीला विकसित गुणाच्या वापराला संधि मिळाली म्हणजे सर्वच माणसांच्या नैसर्गिक किंमती काय आहेत हें नव्यानें प्रस्थापित होईल. सध्यांच्या ठराविक छापाच्या किंमती लोक मानणार नाहींत. आणि अशा रीतीनें समत्वाची जाणीव सर्वत्र पसरल्यामुळें त्या त्या दर्जाचीं माणसें एकत्र होऊं लागतील. जातिभेद मोडण्यास माझ्या मनानें हा एकच इलाज आहे. आणि हा क्रमाक्रमानें अमलांत येणारा इलाज आहे. कारण राजकीय शासनसंस्थेपेक्षांही जातिसंस्था आपलें संरक्षण आपत्काळीं जास्त करते या ऐतिहासिक स्मृतीचा विसर लवकर पडणार नाहीं; आणि शासनसंस्थेचा अस्थिरपणा व पक्षपातित्व हीं तर अनेकदां प्रत्ययास येतात. समाज-सुधारकांचे आणि देशभक्तांचे निषेध व आघात आजवर वायां गेलेले आहेत. याचें कारण असें कीं, त्यांनीं योजिलेलीं आणि ते योजित असलेलीं साधनें गैरलागू होतीं व आहेत. म्हणून जिवाचा कहार करून न घेतां आणि एकमेकांना शिव्याशाप न देतां वर सांगितलेला इलाज जर अमलांत आला तर हवी असलेली गोष्ट खचित घडून येईल. दरम्यानच्या काळांत सर्व जातींनीं देशाच्या आणि समाजाच्या सामुदायिक हितासाठीं झटण्याची पराकाष्ठा केली, आपले स्वार्थ साधण्यासाठीं दुसऱ्यांच्या हितांची आहुति दिली नाहीं, आणि परस्परांच्या उन्नतीला साहाय्यभूत असें आपलें वर्तन ठेविलें तर वर सांगितलेल्या इलाजाचा उपयोगसुद्धां फार त्वरेनें होईल.

* * *

इरावती कर्वे ( १९०५ )

## १९. वाटचाल

रोज महाराष्ट्राची नव्यानें ओळख होत होती. पुण्याहून पालखी निघाली तेव्हां पुणें, जुन्नर, मोगलाई, सातारा, वगैरेकडचे लोक होते; दर मुक्कामाला नवे नवे लोक येऊन मिळत होते. खानदेश, सोलापूर, नाशिक, वऱ्हाड सगळीकडून प्रवाह येऊन-येऊन जसजशी पंढरी जवळ येत चालली तसतशी यात्रा वाढत चालली. सगळीं माणसें मराठी होतीं. निरनिराळ्या जातींचीं होतीं, पण एकाच वारकरी पंथाचे अभंग म्हणत होतीं, एकमेकांशीं बोलत होतीं, एकमेकांना मदत करीत होतीं. एकमेकांना गाणीं म्हणून दाखवीत होतीं. फक्त मंडळी दिसत नव्हती कोंकणची. मीं चौकशी केली तर मला कळलें, आषाढीला यात्रा देशावरची, तर कार्तिकीला पंढरीला सबंध कोंकण लोटतें. आतां त्यांची घाताची वेळ, ते शेत सोडून कसचे येतात ! देशावर शेतें नांगरून पडलीं होतीं, पण पेरें होण्यास अवकाश होता. त्यांची भक्ति पूर्ण होती, पण आत्मघातकी खासच नव्हती. मी जवळजवळ सगळा महाराष्ट्रभर फिरलें आहें, पण सर्व देशाचें एका वेळीं, एका ठायीं होणारें हें दर्शन मला अद्भुत वाटलें. " ज्या देशांतले लोक पंढरीला येतात तो महाराष्ट्र " अशी महाराष्ट्राची एक नवी व्याख्या मला कळून आली.

त्याचप्रमाणें निरक्षर लोकांत सांस्कृतिक परंपरा कशी पसरते व दृढमूल होते ह्याचा एक धडा नऊ-दहा दिवस रोज मला मिळत होता. ज्ञानेश्वरांचा हरिपाठ, नाथांच्या ओव्या, नामदेवाचे व तुकारामाचे अभंग, जनाई-मुक्ताईचें कारुण्यपूर्ण गोड काव्य अशीं मराठ्यांचीं उत्तमोत्तम काव्यें म्हणत लोक आपली वाणी गोड व शुद्ध करीत होते व मनें सुसंस्कृत करीत होते. ते आपला मार्ग हंसत-खेळत आक्रमीत होते. लोकांनीं यावें म्हणून त्यांचा आग्रह नव्हता. पालखी जाणार म्हणून जाहिराती लागल्या नव्हत्या. त्यांना बाहेरच्या जगाची पर्वा नव्हती. ते आपल्यांतच धुंद होते, मस्त होते. ज्याला अंतःकरण असेल, ज्याला सौंदर्यदृष्टि असेल त्याला हा आनंद लुटायची मोकळीक होती.

सुसंस्कृतता व साक्षरता ह्यांतील फरक एका दिवशीं मला विशेष जाणवला. आमच्या दुपारच्या मुक्कामीं बसलों असतां सहज रस्त्याकडे दृष्टि गेली तों एक पाद्र्याचें जोडपें दिसलें. त्यांच्या हातांत लहान-लहान पुस्तकें होतीं. प्रभु येशूच्या धर्माचा प्रचार व प्रसार करण्यासाठीं तीं आलीं होतीं. दोन-तीन दिवसांनीं कंटाळून तीं निघून गेलीं असावीं, कारण तीं पुढें दिसलीं नाहींत. मला त्यांची चीड आली होती, पण आमच्या मंडळींनीं सर्व हंसून घालवलें. तें जोडपें साक्षर खात्रीनें होतें, पण संस्कृतीचा लवलेशही त्यांचेजवळ नव्हता. निरानिराळे मानवसमाज आपल्या अंतःकरणांतील काव्य, मांगल्य, सद्भाव निरानिराळ्या तऱ्हेनें प्रगट करतात व ह्या बहुरूपांत त्याची ओळख करून घेणें—आपलें तेंच खरें हा आग्रह धरण्याआधीं लोकांचें काय हें अगदीं मनापासून समजून घेऊन त्यांच्याशीं समरस होणें—हेंच नव्हे का संस्कृतीचें लक्षण ! ' ऐशी कळवळ्याची जाती। करी लाभावीण प्रीति "-अंतिम लाभाची आशा न धरतां सर्व मानवतेविषयीं जिव्हाळा वाटणें—हीच नव्हे का संस्कृति ! पण एकेश्वरी पंथाच्या—मग तो राजकीय, सामाजिक वा नैतिक असो—अनुयायांना हें पटणार कसें ! सबंध दोन—तीन शतकें सर्व जगांतील लहानमोठ्या समाजांवर स्वामित्व गाजवून त्यांचीं मूल्यें पायदळीं तुडविणाऱ्या ख्रिस्तसेवकांना तर हें पटण्याचा सुतराम् संभव नाहीं.

ह्या निरक्षर बायांना किती गाणीं, अभंग, भारुडें पाठ होतीं त्याचा तर मला पत्ताच लागला नाहीं. सबंध प्रवासांत तेंच गाणें कांहीं मीं परत ऐकलें नाहीं. गाणीं उतरवून घेण्याचा सारखा मोह होता, पण कागद, पेन्सिल वा पुस्तक ह्यांना हातांत धरायचें नाहीं असा निश्चय करून निघालें होतें ना! तरीं बायकी गाणीं कांहीं सोडलीं तर सर्व गाणीं वारकरी पंथाचींच होतीं. त्यांचे प्रकार तरी किती ! गोंधळ, खेळिये, गौळणी सगळें कांहीं त्यांत होतें. एक बाई मला म्हणाल्या, " अहो, ही युनिव्हर्सिटी आहे. तुमच्या विद्यार्थ्यांना तरी हें शिक्षण व ही शिस्त आहे का ! " त्यांचें बोलणें मला कबूल नव्हतें, पण युनिव्हर्सिटी नाहीं तरी पारंपरिक ज्ञानाची जोपासना, संवर्धन व पुढच्या पिढींत संक्रांति हीं शिक्षणाचीं तीन अंगें प्रकर्षानें त्यांत होतीं ह्यांत संशयच नाहीं. हें शिक्षणसुद्धां अनेकविध होतें. धर्म व तत्त्वज्ञान ह्याखेरीज गायन, नर्तन व नाट्य ह्या तिन्ही कलांचा

समावेश त्यांत होता, शिवाय सर्व समाजाचें एकत्र जीवनही त्यांत होतें. गायन विशेष उच्च दर्जाचें होतें असें नाहीं, पण पारंपरिक भजनी चालींखेरीज मृदंगाच्या तालांत किती तरी निरनिराळ्या रागांत अभंग म्हणत असत. भैरवी, काफी, सारंग, भूप जयजयवंती, दुर्गा, मालकंस असे किती राग कानावरून गेले! फलटणहून निघालों त्या दिवशीं पहाटे पाऊस पडत होता. फलटणचे एक गायक आमचे दिंडीबरोबर मैल-दोन मैल आले होते. सकाळचे अभंग विशेषच गोड असतात व त्यांनीं आळवलेले व भजनी मंडळींनीं त्यांच्या पाठोपाठ म्हटलेले जयजयवंतीचे सूर व अभंगाचे शब्द अजून माझ्या कानांत घुमत आहेत. वरून येणारा पाऊस, खालचा चिखल, इकडे मुळीं लक्षच गेलें नाहीं. ते गाणारे निघून गेल्यावर समजलें कीं, इतका वेळ आपण पावसांत चालत होतों म्हणून!

पालखीच्या वाटेवर पांच वेळां रंगण व बहुधा रोज भारुडें होतात. गोल रंगण पाहण्यासाठीं व भारुडें ऐकण्यासाठीं आजूबाजूच्या खेड्यांतून विशेष गर्दी लोटते. पालखी ठरलेल्या एका मोठ्या वावराच्या मध्यभागीं नेतात. पालखीभोंवतीं रंगण पाहणारे स्त्री-पुरुष हजारोंनीं बसतात. त्यांच्या वाटली १०।१५ फूट जागा मोकळी सोडतात व त्याच्याभोंवतीं समस्त भजनी वारकरी मंडळी आपापल्या दिंडींत टाळ वाजवीत "ज्ञानबा तुकाराम" वा "जय जय विठोबा रखुमाई" चा गजर करीत उभी असतात. मोकळ्या वर्तुळांतून दोन्ही घोडे तीन किंवा पांच खेपा भरधांव घालून देवाच्या पालखीसमोर येऊन देवापुढें मान वांकवून निघून जातात. मग खेडेगांवांतील आलेले लोक ज्ञानेश्वरांच्या पादुकांचें दर्शन करितात व दिंडींतील मंडळी मनमुराद खेळ खेळतात. कुणी तालावर भजन करीत नाचतात, कुणी झिम्मा खेळतात, कुणी फुगड्या खेळतात, कुणी खो-खो, बेडुक-उडी, वगैरे खेळतात. बायका आपापसांत फेर धरतात. क्वचित् बायका-पुरुष मिळून फुगडी व झिम्मा चालू असतो. पुरुषांच्या खेळांत बायकांना फारसा वाव नसतो, कारण त्यांचे खेळ खूप झपाट्यानें व आडदांडपणें चाललेले असतात. खो-खोच्या खेळांत व पटापट ओणव्या गड्यावरून उड्या मारीत जातांना किती पडतात, पण नांगरलेल्या वावरांत विशेष लागत नाहीं. शेवटीं सर्व दिंडीवाले नाचत, फेर धरीत, उड्या मारीत पालखीभोंवतीं प्रदक्षिणा करितात व पालखी

हालते. भारूडही मोकळ्या वावरांतच होतें. भारूड हा एक लोकनाट्याचाच प्रकार आहे. भारुडांत असतो वेदान्त, पण तो निरनिराळ्या भूमिकांनीं सांगितलेला असतो. भारूड करणारेही बहुधा ठरलेले असतात. "अहो, मी राजाचा जोशी" अशी सुरुवात करून, चाळिशी घालून, दोन फूट परिघाचें पागोटें चढवून जोशाचें सोंग संपलें कीं, तोच माणूस "हमामा पोरा हमामा" म्हणून पागोटें फेकून क्षणांत वेष बदलून दुसऱ्या भारुडास सुरुवात करतो. प्रत्यक्ष एकनाथांच्या शब्दांखेरीज इतर शब्द व हावभाव खूपच असतात व पुष्कळदां अश्लीलतेचा कळस होतो. शब्दापेक्षांही हावभाव अतिशयच अश्लील असतात. हें नाट्य कधींही अर्धा तासापेक्षां जास्त चालत नाहीं. बायका-पुरुष सर्व ऐकतात, पोटभर हंसतात, रस्त्याला लागलीं कीं सर्व विसरतात. धार्मिक उत्सवांत कामुक प्रतीकें व लोकनाट्य अतिप्राचीन काळापासून चालत आलीं आहेत. पूर्वीच्या काळीं दिवसन् दिवस, महिनेच्या महिने जीं सत्रें चालत त्यांतही असे कांहीं निवळ गमतीचे, कांहीं शृंगारिक, वगैरे करमणुकीचे प्रकार असत. किंबहुना, सर्व नाट्याचा उगम धार्मिक उत्सवांत व जादुटोण्यांत आहे असाही कांहींचा दावा आहे. हा करमणुकीचा प्रकार अश्लील असावा का? नसला तरी चालेल. मोठमोठे संभावित व विद्वान् कीर्तनकार किंवा प्रवचनकार कांहीं भारुडांत काम करीत नाहींत. तें बरेंचसें अर्धवट शिक्षित व अशिक्षित लोकच करतात. लोकांना हंसवायाला सर्वांत सोपें साधन म्हणजे निर्लज्ज हावभाव व द्व्यर्थी वाक्यें; हीं फार सनातन कालापासून चालू आहेत. सबंध पंधरवडा होणाऱ्या अखंड भजनांत थोडासा हा प्रकार झाला—व तोही खरोखरच थोडासा झाला—तर हरकत नसावी. सर्वांच्या मनांत वसणाऱ्या अश्लीलतेला वा बीभत्सपणाला इतक्या थोड्या वेळांत इतक्या थोड्या सामुग्रीवर वाट करून देऊन जर ती इतर वेळीं, इतर जीवनांत दृढनिद्रा घेईल तर ही दिलेली किंमत थोडीच वाटते.

वैराग्यपर कवितेंत बीभत्सपणाला वाव पुष्कळच असतो. वासनामय संसाराचा त्याग करायला सांगतांना त्या संसाराचें जितकें किळसवाणें वर्णन करतां येईल तितकें करायचें हा फार जुना प्रघात आहे. वारकरी संप्रदायहि त्याला अपवाद नाहीं. अशाच कित्येक कवनांपैकीं मदालसा नांवानें ओळखलें जाणारें एक बरेंच लांबलचक काव्य आहे. कोणी एक मदालसा नांवाची

राजस्त्री आपल्या पुत्रांना पाळण्यांतच वैराग्याचा उपदेश करते व ते पुत्र पूर्ण विरागी होतात अशी एक कथा आहे. त्यांतले मदालसेनें आपल्या मुलांना केलेले उपदेश ह्या काव्यांत गोवलेले आहेत. "उपदेशे मदालसा। सोऽहं जो जो रे पुत्रा" हें त्याचें ध्रुवपद. हें गाणें मीं दोन-चारदां तरी ऐकलें. वारकऱ्यांच्या मनांत वैराग्यपर भावना त्यामुळें कदाचित् उसळत असतील, पण माझें मन संसाराला नाहीं पण त्या काव्याला विटलें हें बरीक खास. "मनुष्याच्या सुंदर त्वचेच्या आंत रक्त, मांस, वगैरे कशीं द्रव्यें आहेत, मलमूत्र कसे त्याच्या शरीरांत आहेत, त्याच्या नाकांत शेंबूड किती आहे—त्याचप्रमाणें व्याधि व जरेनें हें सुंदर शरीर कसें कुरूप होऊन जातें, म्हणून, हे प्राण्या, ह्या शरीराचे व्याप सोड, ब्रह्मचर्याचा स्वीकार कर व संसारापासून निवृत्त हो." हा उपदेश पुरुषांना केलेला असतो. आणि तें ठीकच आहे. बाया, ना रंग ना रूप अशा मांसाच्या गोळ्याला जन्म देतात त्या खादाड जीवाची दर तीन चार तासांनीं भूक भागवितात. तीन-चार तासांनीं त्याचे मुताचे कपडे बदलतात. त्याचें गुवानें भरलेलें ढुंगण व अंग धुवून काढतात. व ह्या सगळ्या खस्ता खातां खातां त्या गोळ्याला हळुहळू रंगरूप येऊं लागलें व हंसून त्यानें पाहिलें म्हणजे आपल्याला धन्यधन्य मानतात. अशा ह्या आयांना मानवी शरीर कसलें केलें आहे त्याची पूर्ण जाणीव असते. त्याचें वर्णन करून का त्यांचें मन संसारांतून उठून जाणार आहे? पुरुष ब्रह्मचारी असेल तरी एका स्त्रीसंगाखेरीज शरीराचे सर्व व्यवहार अगदीं नीट आस्थेनें चाललेले असतातच. खाण्यापिण्याची चोख व्यवस्था बायको नसली तरी होत असतेच. अशांची नीट व्यवस्था करण्याचा भार गृहस्थाश्रमी लोकांवरच असतो. त्यांची जेवणखाण्याची सोय कुणीतरी रक्ताची नाहींतर धर्माची आई-बहीण करीत असते. ब्रह्मचाऱ्याची सेवा करण्यास निष्ठेनें व भक्तीनें स्त्रियाच पुढें सरसावत. जिवंतपणीं त्यांची सेवा होतेच, पण मेल्यावरही त्यांची भक्ति स्त्रिया पुढें चालवितात ह्याचें एक मजेदार उदाहरण वाटेनेंच पाहिलें. पंढरपूर जसजसें जवळजवळ येऊं लागलें तसतशा सर्व महाराष्ट्रांतून पालख्या येऊन ज्ञानदेवांच्या पालखीला भेटूं लागल्या. पंढरपूरच्या अलीकडील मुक्कामाला तर पालख्या व दिंड्या ह्यांचें एक नगरच वसतें. तेथें सर्व महाराष्ट्राची हजेरी लागते. देहूहून तुकाराममहाराज, सासवडहून सोपानकाका, खानदेशांतून मुक्ताबाई, उमरावतीहून खुद्द रखुमाई अशा कितीतरी पालख्या

येतात. पैकीं कांहीं वाटेंतच भेटतात. त्यांपैकीं यंदा सज्जनगडाहून रामदासांची पालखी आली. तिची गांठ वाटेंत पडली. पालखी वाहणारे पुरुष होते, पण बरोबरीस चालणाऱ्या, चवरी ढाळणाऱ्या बायाच होत्या. 'सावधान' म्हणताक्षणीं जिवंतपणीं पळून जाणारे साधु रामदासबुवा मेल्यावर स्त्रियांच्या गराड्यांत सांपडलेले पाहून मला हसूं आलें. स्त्रियाच अशा साधुपुरुषांचें काम करण्यासाठीं अहमहमिकेनें पुढें येतात. ही भक्ति पुष्कळदां सर्वस्वी निष्काम अशी असते. जिला ना पोर ना बाळ, जिचा संसार लहानपणींच उधळला गेला अशी कोणी बाई, बुवांना नीट खायला मिळावें, तें अन्न सुग्रास असावें, तें खाणाऱ्याच्या ताटांत ऊन–ऊन पडावें म्हणून धडपड करतांना पाहिली म्हणजे बुवांच्या कडकडीत ब्रह्मचर्यापेक्षां बाईच्या वत्सल हृदयाचीच किंमत मला भारी वाटायची. "ऐशी कळवळ्याची जाती । करी लाभावीण प्रीति ! ।

मदालसा एकदां पूर्ण ऐकल्यावर माझें मन त्यांत रमेनासें झालें. हिंदूंच्या समाजजीवनांत गृहस्थाश्रमाचें महत्त्व कमी होऊन ब्रह्मचर्याचा व संन्यासधर्माचा बडेजाव कसकसा वाढत गेला ह्याबद्दल माझे विचार भरकटत जायचे. निर्गुण निराकार ब्रह्माचें आकलन होणें कठीण म्हणून देवाला सगुणत्व देणारा, इतकेंच काय तर ती सगुण गोजिरी मूर्तीच श्रेष्ठ असा अट्टाहास बाळगणारा, वारकरी पंथ, अनेक स्त्रियांचा उपभोक्ता श्रीकृष्ण त्यांचा देव, तोंडानें 'जय जय विठोबा रखुमाई" असा दांपत्यनामाचा घोष, अर्जुनाला प्रवृत्तिपर बनाविण्यास कारणीभूत झालेली गीता यांचा आधारभूत ग्रंथ, आणि शिकवण काय तर ब्रह्मचर्याची–निवृत्ति मार्गाची–हा मेळ कसा घालायचा ? "प्रजाभिः प्रजायस्व ।" ("प्रजेच्या रूपानें परत जन्म घे. प्रजेच्या रूपानें अमर हो.") –ही वेदाची शिकवण होती. पुत्रकामेष्टी करणारे असंख्य यजमान धुरानें कुरु पांचालांची पवित्र भूमि अंधारीत होते. औरस संतति नसली तर निरनिराळे चांगलेवाईट मार्ग पुत्रप्राप्तीसाठीं मनूनें सांगितले; एवढेंच काय तर, "उपनयनविधीपासून बारा वर्षें ब्रह्मचर्यानें राहून, गुरुगृहीं विद्या शिकावी. एखाद्या शाखेंत विशेष पारंगत व्हावयाचें असेल तर आणखी कांहीं वर्षें व्रतस्थ राहून वेदाभ्यास करावा. पण ह्यापुढें ब्रह्मचर्याचा उपदेश करणारे लोक बहुधा नपुंसकच असावे" असें अगदीं स्पष्ट मत शबरस्वामींनीं दिलें आहे. पण गृहस्थाश्रमाची थोरवी वर्णन केली जात असतां एकीकडे अरण्यवास

व उपनिषदांतील तत्त्वज्ञान परिणत होत होतें. बुद्ध व जैन संप्रदाय ह्या तत्त्वज्ञानाच्या आधारें कर्ममार्गाचा हीनपणा दाखवून संन्यासमार्गाचा प्रसार करीत होते. पण संन्यासमार्गाची भरभराट एका सामाजिक विरोधावर अवलंबून असते. भिक्षावृत्तीनें संन्यस्त अवस्थेंत राहणाऱ्या सांप्रदायिक स्त्री-पुरुषांची (मग तो जोगी, संन्यासी, भिक्षू, श्रमण कोणीही असोत) उपजीविका संपन्न राजकुळें किंवा वैशाली, श्रावस्ति व चंपा अशा समृद्ध शहरांत राहणाऱ्या श्रीमान् व्यापाऱ्यांकडूनच होते. समृद्ध व सुखी गृहस्थाश्रमावरच संन्यासधर्माची उभारणी शक्य होते! हिंदूंच्या सामाजिक जीवनांत ही जी मूल्यविषयक क्रान्ति झाली त्याचा इतिहास जितका महत्त्वाचा तितकाच मनोरंजकही आहे, पण मदालसेसारखीं गाणीं मनोरंजक नाहींत व उदात्तही नाहींत.

मदालसा संपून कांहीं वेळ लोटला होता. एकंदर वातावरणांत मला फार फरक वाटला. क्षणभरांत ठेक्यावर नाचत खुल्या गळ्यानें म्हटलेले शब्द ऐकूं आले, "बोलरे काऊ, तुझे सोन्यानें मढवीन पाऊ," कारण काय तर तूं "पाहुणा पंढरिराऊ" आणीत आहेस. ज्ञानेश्वरांची ओवी चालली होती. मदालसेचें जड वातावरण जाऊन हवा निवळली मन परत प्रसन्न झालें. आमचे दिंडींतले मुख्य नेहमींच हा विवेक दाखवीत. एकदां मदालसेनंतर त्यांनीं मुक्ताबाईचे ताटीचे अभंग सुरू केले. "ताटी उघडा, ज्ञानेश्वरा" ह्या पालुपदानें अशीच मी माझ्या उदासीनतेंतून जागी झालें होतें. एकदां संध्याकाळचा टप्पा बराच लांब होता. सूर्य कलला तेव्हां भर उन्हांत चालून-चालून माणसें थकलीं होतीं. हरिपाठ होऊन इतर किरकोळ अभंग झाले होते, पण श्रमानें म्हणा, उन्हानें म्हणा, नेहमींचा आनंद वाटत नव्हता, तोंच बुवांनीं "आम्ही लटकें ना बोलूं वर्तमान खोटें" सुरू केलें. सगळ्यांचीं तोंडें खुललीं, आणि लहानपणापासून ऐकलेलें असंभाव्य घटनांनीं भरलेलें तें पद म्हणतां म्हणतां, हंसतां-हंसतां वाट कधीं सरली तें कळलें नाहीं.

रंगणें चाललीं म्हणजे सर्कशीचा भास होई. खेळ सुरू झाले म्हणजे उत्साहानें वाटचालीचें दुःख नाहींसें होई. भारुडांचें नाट्य मधूनमधून चाले व कधीं वैराग्यपर कविता, तर कधीं देवाचा धावा, तर कधीं "लटकें ना बोलूं" सारखीं नितांत असंभाव्य पदें व अखंड हरिनामाचा गजर ह्यांमुळें सारखी वाटचाल करूनही मन प्रसन्न होतें.

म्हणजे काय सर्व वाटसरू आनंदांत होते! मुळींच नाहीं. ही भागीदारी, हें सहजीवन आनंदाचेंच नव्हे तर दु:खाचेंही होतें. किती दु:खीकष्टी माणसें पंढरीच्या वाटेवर चालत होतीं! ह्या वाटेवर नेहमीं हृदयांत बाळगलेलीं दुःखें तीं दुसऱ्यांजवळ सांगत होतीं, भरलेलें अंतःकरण हलकें करीत होतीं, वेदना सहन करण्याचें सामर्थ्य आणीत होतीं. आणि दुःखें तरी किती! प्रत्येकाचें दुःख निराळें आणि प्रत्येकाचें दुसऱ्यासारखें.

किती सुरेख होती ती बाई! किती गोड बोलणें! एक दिवस आम्ही झाडाखालीं सुखदु:खाच्या गोष्टी बोलत बसलों होतों. बायांच्या गोष्टी काय असणार! तुमचे मालक काय करतात? तुम्हांला मुलें किती? असल्याच प्रश्नांचीं उत्तरें दिल्यावर मीपण तेच प्रश्न विचारले. भरल्या डोळ्यांनीं तिनें सांगितलें, "नाहीं हो, माझ्या घरीं मुलं नाहीं हो खेळत! एवढा मोठा वाडा-एकीकडे मालक, एकीकडे मी. भांडण नाहीं, कांहीं नाहीं. पण बोलणार तरी काय एकमेकांशीं! जातें झालं पांडुरंगाच्या पायाशीं." मीं हळूच विचारलें, "देवाच्या पायाशीं गाऱ्हाणं घालायला जातां का?" "छेः! छेः त्याला काय ठाऊक नाहीं? त्याच्या मनांत असेल तें तो करील. त्यानं ठेवलं! तसं राह्यला पाहिजे."

एकदां दुपारच्या जरा विसावलों होतों. शेजारींच दोन-चार बाया-पुरुष व एक तान्हें मूल अशीं होतीं. एका बाईनें मुलाला प्यायला घेतलें होतें आणि सारखी रडत होती. "बाई, काय झालें? कांहीं दुखतें का?" "मले नव्हे हो, पोराले" ती म्हणाली. ती बाई बीडची. महिनाभर प्रवास चालला होता. दोन दिवस झाले, तें वर्षाचें मूल तापानें फणफणलें होतें. उन्हापावसांत, वाऱ्यांत चालायचें; मूल सारखें पाठीशीं. त्याला बाधलें तर काय नवल? "एवढ्या लहान मुलाला घेऊन कशा निघाल्यात?" "अहो, काय सांगूं! शेजारच्या चार-पांच गांवांचीं माणसं निघालीं. शेजारणी म्हणाल्या, 'तुझा सारा जीव संसारांत. नाहीं तरी घरीं राहून राहून पोरं काय मरायचीं थांबलीं आहेत? चल, पांडुरंगाच्या पायाशीं चल, चालवत आहे तोंवर, म्हणून आलें. पण आज दोन दिवस पोर डोळा उघडीत नाहीं हो." वारीबरोबर सरकारी डॉक्टर व दवाखान्याची मोटार होती ती दाखवून तिला म्हटलें, "जा तिकडे, तुला फुकट औषध मिळेल." ती रोज दूध घेऊन

मुलाला द्यायची. तें उकळून घे म्हणून काय सांगणार ? मीं म्हटलें, " मुलाला दुधाचा 'चा' ऊन ऊन दे, घाम येऊन ताप जाईल. विठ्ठल नाहीं तुला अंतर देणार." ती बरोबरच्या माणसांना घेऊन दवाखान्याकडे गेली. पलीकडेच एक म्हातारा पागोटें उशाशीं घेऊन पडला होता. तो उठून बसला व मला म्हणाला, " ही कसली वारी करते ? पोराला ताप आला कीं लागली रडायला. देव ठेवील तसं राह्यला पाहिजे." मला ह्या शिष्टपणाचा राग आला. मीं जरा रागानेंच उत्तरलें, " तुम्हांला काय जातं बोलायला ? ज्याचं दुःख त्याला ठाऊक." म्हातारा म्हणतो, अहो, तो विठ्ठल मोठा कठीण देव हाये बरं. तुमचं मन दुसरीकडे गुंतलं तर तो तें सोडवून टाकतो. मीच पहा ना. बायको होती. मुलं होतीं. घर होतं. एका सांथींत चार दिवसांत सगळीं खलास. घर टाकलं विकून, पैसे टाकले संपवून. आतां म्हणतों, देवा, तुझ्याशिवाय कोणी नाहीं !" त्याच्या हातावर चहासाठीं पैसे टाकून दिंडी जवळ आली म्हणून मी उठलें. " देवा, तुझ्या मनांत मला 'चा' द्यावा असं आलं रे ! पाण्डुरंगा नारायणा !" हे शब्द ऐकूं आले.

अशीच एक म्हातारी आजीबाई अधूनमधून दिसायची. एकदां तिला कोणीं विचारलें, " आजीबाई, तुमचीं मुलं, नातवंडं काय करतात, कुठं असतात ?" म्हातारीनें प्रश्न ऐकला मात्र तिचे डोळे मिटले, तोंड भेसूर दिसूं लागलें व ती आपादमस्तक थरथर कांपूं लागली. तिचें डोकें लटलट हालूं लागलें व ती शरीर घुसळूं लागली. आम्ही घाबरलों व झट्दिशीं तिच्याजवळ जाऊन तिला बिलगून तिच्या अंगाभोंवतीं हात टाकले. " आजीबाई, सावध व्हा. पाणी देऊं का ?" अशी विचारणा झाली. माझ्या बाहूंत म्हातारीचा देह थरथरत होता. मला आठवण झाली. माझी एक कुत्री होती. तिचें पिलूं जनावर चावून मेलें, तेव्हां ती थरथरत उभी होती. मी अशीच तिला जवळ घेतली होती व असाच तिच्या शरीराचा कंप मला जाणवत होता. मनांत आलें, " आपण माणसें जनावरांच्या किती जवळ !" म्हातारी थोड्या वेळानें कांपायची थांबली. वेदनेची जाणीव व आविष्कार पाशवी पायरीवरून मानवी पायरीवर आलीं. तिच्या मिटल्या डोळ्यांतून धारा वाहूं लागल्या. मुक्या दुःखाला वाचा फुटली. तिनें आपली हकीकत सांगितली. दुःख काय ? जें इतरांचें तेंच तिचें. तिचा एकुलता एक

मुलगा भर पंचविशींत गेला होता. हीं दुःखें सामाजिक विषमतेमुळें उत्पन्न झालीं नव्हतीं; राजकीय दंगली वा युद्ध त्यांच्या बुडाशीं नव्हतीं. तीं मानवांबरोबर आलेलीं व मानवांबरोबर नष्ट होणारीं अशीं होतीं. तीं रावाला होतीं. रंकाला होतीं. तरण्याला होतीं. वृद्धाला होतीं. सर्व मनुष्यसमाजाला व्यापून राहिलेलीं होतीं. म्हातारी आपली हकीकत सांगून क्षणभर थांबली, व एक खोल सुस्कारा टाकून म्हणाली, " पांडुरंगा, तूं ठेवशील तसं राह्यचं–" दांत-ओठ खाऊन मींपण मनांत म्हटलें, " तेन त्यक्तेन भुञ्जीथाः । " ह्या लोभी, सर्वग्राही मालकाच्या हातून जें सुटेल तें आमचें–" पांडुरंग मोठा कठीण देव आहे बरं. तुमचं मन कुठं गुंतलं तर तो तें सोडवून टाकतो. " पण देवा, तें मन आधीं ठायीं–ठायीं गुंतवतोस का ? तें पुरें गुरफटवून टाकतोस आणि मग क्रूरपणें ओरबाडून त्याच्या चिंध्या चिंध्या करतोस. ह्यांत काय तुझा मोठेपणा ? ह्या असल्या श्रमलेल्या, फाटलेल्या रक्ताश्रु गळणाऱ्या हृदयाला फरफटत तुझ्या पायाशीं आणण्यांत तुला काय धन्यता वाटते ? त्यापेक्षां आयुष्याच्या प्रभातकाळीं सुखाच्या कोवळ्या उन्हांत फुललेलें आमचें जीवनपुष्प तुझ्या पूजेसाठीं कां खुडून नेत नाहींस ?

आतां मात्र मला पुरें वेड लागलें ! त्या म्हातारीच्या तळतळाटानें क्षणभर मला वस्तुस्थितीचा विसर पडला. कोण कोणाला ओढून पायाशीं आणणार ? सगळा मनुष्याच्या मनाचा खेळ आहे झालें ! निराकार, निर्गुण व सर्वस्वीं उदासीन तत्त्वांतून सगुण परमेश्वर निर्माण करावयाचा, सर्व कर्तृत्व त्याच्या माथीं मारायचें, त्याला जगाचा मालक बनवायचें आणि मग म्हणावयाचें, " तेन त्यक्तेन भुञ्जीथाः ! "

आम्ही सर्वच आपापल्या दुःखदायक विचारांत गुरफटलों होतों. इतक्यांत एकीनें अभंग म्हणावयास सुरुवात केली, " देह जावो अथवा राहो, पांडुरंगीं माझा भावो. " तिच्या भजनांत सगळ्यांनीं आपला सूर मिसळला. म्हातारीही बघतां बघतां आमच्यांत सामील झाली. तिच्या कांपऱ्या आवाजानें सांथ दिली, " आण तुझी पंढरीरावो. " थोड्या वेळानें दुःखाच्या सावल्या जाऊन परत प्रसन्नता आली. सर्वांना दुःखें होतीं, पण सारींजणें एकमेकांच्या साहाय्यानें आनंदमय वातावरण कसें निर्माण करीत कोण जाणे !

धर्म ही एक अफू आहे. मानवी संस्कृतीनें अशी कित्येक तऱ्हेची अफू

व दारू निर्माण केली आहे. अफू खाऊन मनुष्य गुंगून पडतें–दारू पिऊन मस्त होतें. वास्तवता विसरण्याचाच सर्व प्रयत्न. कोणी देव निर्माण करतें, कोणी शास्त्र निर्माण करतें, तर कोणी राजकीय पंथ निर्माण करतात. शास्त्राच्या अभ्यासांत सर्वस्व विसरणारे सहस्रावधि शास्त्रज्ञ अफू प्यायलेलेच नाहींत का ? अर्वाचीन शास्त्रामुळें मानवांचें आयुष्य आनंदमय झालें ही घोषणा करणारे ज्ञानमदिरेनें धुंद झालेलेच ना ? समाजाची पुनर्रचना करून समाजाचीं दुःखें नाहींसे करणारे महान् तत्त्ववेत्ते बुद्धापासून मार्क्सपर्यंत होऊन गेले, पण जुनीं दुःखें तर नाहींशीं होत नाहींतच, नव्यांची मात्र भर पडत जाते व मनुष्य अफूनें का दारूनें तीं विसरून म्हणतो, " आमची प्रगति झाली. आनंदमय संसाराची पहाट उगवली–"

तो वाटचालीचा शेवटचा दिवस. संध्याकाळीं इतक्या दिवसांची सोबत सुटणार, जे ते गांवांत आपापल्या मुक्कामाला जाणार. मला हुरहूर लागली होती. माझे डोळे परत–परत भरून येत होते. हौशी मला म्हणाली होती, ' बाई, शेवटच्या माळाला ' रडवा माळ ' म्हणतात." " कां ग? " "त्यावर चालायला लागलं कीं आपलं रडूंचं येतं बघा. " सगळीकडे निरोप घेणें चाललें होतें. माझ्या तोंडानें शब्द फुटत नव्हता. मी मानेनेंच दिंडींतल्या मंडळींचा निरोप घेऊन पुढें निघालें. गांवाची शीव आली. मला चुकल्या–चुकल्यासारखें वाटत होतें. इतके दिवस दिंडींत कधीं पुढें, तर कधीं मागें, तर कधीं झाडाखालीं, तर कधीं ओढ्यावर, सर्वांबरोबर असणारा ' तो ' जवळ दिसेना. मीं वळून पाहिलें तों तो पाठ फिरवून मागें निघाला होता. मीं म्हटलें " काळ्या बाबा, तूं पण सोडून चाललास का रे ? पंढरपुरांत नाहीं का येणार ? " त्यानें हसून मान हालवली. " मग चाललास कुठें ? " कांहीं न बोलतां त्यानें सभोंवार हात फिरवला व तो झपाट्यानें चालूं लागला. खालचीं नांगरलेलीं काळीं शेतें, वर ढगांनीं भरलेलें काळें आकाश, खांद्यावर घोंगडी घेतलेली ती गोजिरी, सांवळी मूर्ति त्यांत कधींच दिसेनाशी झाली. मीं श्रमल्या पायांनीं, भरल्या अंतःकरणानें व वाहत्या डोळ्यांनीं पंढरपूरच्या वेशींत पाय टाकला.

× × ×

# टीपा

**लोकहितवादी : गोपाळ हरि देशमुख.** ( १८२३-१८९२ ). अव्वल इंग्रजींत हे सरकारी नोकरींत रावबहादुर होण्याइतकी मान्यता पावले. परंतु रावबहादुर देशमुख या नांवापेक्षां 'लोकहितवादी' याच नांवानें ते प्रसिद्ध आहेत. सरकारी नोकरींत असतांनाच त्यांनीं मुंबई येथील 'प्रभाकर' या साप्ताहिकांत 'लोकहितवादी' या सहीनें 'पत्रें' लिहिण्यास इ. स. १८४८ पासून आरंभ केला. तीं '**शतपत्रें**' प्रसिद्ध आहेत. शतपत्रांखेरीज त्यांनीं बरेच ग्रंथ व निबंध लिहिले आहेत. त्यांतील बहुतेक आज दुर्मिळ आहेत.

लोकहितवादींचे हे तीन लेख म्हणजे शतपत्रांतील पत्र नं. २८, १८ व ४४ हीं होत. श्री. श्री. रा. टिकेकर यांनीं, शिळाप्रेसवर छापलेल्या प्रतीवरून नक्लून शतपत्रें छापिलीं आहेत. मूळचीं पत्रें जशींच्या तशींच नव्या शुद्धलेखनाप्रमाणें श्री. टिकेकर यांनीं छापिलीं आहेत. ( लोकहितवादींचीं शतपत्रें; सं. श्री. रा. टिकेकर, प्रकाशन जून १९४० ) तशींच तीं येथें छापिलीं आहेत. १०० वर्षांपूर्वींच्या गद्याचा नमुना या पत्रांत दिसेल.

## १. विधिनिषेधरूप धर्माचें मूळ

पृ. १ **मुजाईम : मुजाहीम** ( फारशी ) प्रतिबंध करणारा.

## २. आर्जवीपणा व डौलीपणा

पृ. ७. **पंक्तीबारगीर** : ( बारगीर—बार्गीर. बारा ( फा० ) घोडा, धन्यानें दिलेला घोडा ठेवणारा शिपाई. ) भोजनभाऊ या अर्थी येथें हा शब्द योजिला आहे.

पृ. ८. **नाझरी** : ( नाझिर—न्यायाधीशाचा चिटणीस ); चिटणीशी.

९. **नेटिव** : ( Native ) हा शब्द एतद्देशीय अशा अर्थानें येथें योजिला आहे. इंग्रजी अंमलांत नेटिव्ह हा शब्द हिंदी अशा अर्थानें योजिला जात असे. या शब्दाचा मूळ अर्थ 'मूळचा' असा आहे. त्याचप्रमाणें मागासलेल्या युरोपेतर देशांतील रहिवाशी असाहि अर्थ ऑक्सफर्ड-कोशांत दिला आहे.

**न्यायमूर्ति महादेव ऊर्फ माधव गोविंद रानडे : (१८४२–१९०१)** १८९७ सालापासून न्यायमूर्ति रानडे यांनीं मराठ्यांच्या इतिहासासंबंधीं जे लेख लिहिले व व्याख्यानें दिलीं त्यांचें संकलन The Rise of the Maratha Power या ग्रंथरूपानें प्रसिद्ध झालें. त्या पुस्तकाचें मराठी भाषांतर रामचंद्र मोरेश्वर आपटे व रामचंद्र नरसिंह इनामदार यांनीं केलें. तें **मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष** या नांवानें प्रसिद्ध आहे. १९२५ सालीं मराठी भाषांतराची दुसरी आवृत्ति वि. गो. विजापुरकर यांनीं सुधारली. प्रस्तुत उतारा त्या सुधारलेल्या आवृत्तींतून पृ. १११ पासून घेतला आहे.

मराठी पुस्तकाच्या प्रस्तावनेंत विजापूरकर म्हणतात : (या पुस्तकानंतर) "स्वधर्म, स्वदेश व स्वभाषा यांविषयीं लोकांच्या मनांत अधिक उदात्त कल्पना आल्या आहेत. भागवत, रामायण, महाभारत, यांसारख्या प्रचंड ग्रंथांचें मराठींत खास भाषांतर झालें; श्रीसमर्थ रामदासांचे व मोरोपंतांचे ग्रंथ मूळ स्वरूपांत लोकांस मिळूं लागले; ज्ञानेश्वराच्या वेळची ज्ञानेश्वरी लोकांच्या पुढें आली."

भाषांतराविषयीं उपोद्घातांत म्हटलें आहे : "मूळाबरहुकूम बरोबर शब्दशः भाषांतरच देण्याचा आमचा विचार नाहीं. तर त्यांतील विषय सुगम करण्या-साठीं कांहीं थोडाफार भाग अधिक घालण्यांत येईल. तथापि विचारसरणी जशीच्या तशी राहील."

विलायतेंतील लॉंगमन् कंपनीच्या 'ईपॉक सीरीज' (Epoch Series) नामक पुस्तकावलीकरितां त्यांच्या विनंतीस मान देऊन न्यायमूर्तींनीं हें काम हातीं घेतलें होतें. त्या वेळीं महाराष्ट्राच्या व हिंदुस्थानच्या इतिहासाविषयीं 'भयंकर' समज इंग्रज इतिहासकारांनीं प्रसृत केले होते. म्हणून 'प्रस्तुत ग्रंथ लिहावयाचा तो मुख्यत्वेंकरून इंग्रज लोकांकरितां' असें न्यायमूर्तींनीं मूळ प्रस्तावनेंत नमूद केलें आहे.

## ४. महाराष्ट्रांतील साधुसंत

**पृ. १४. रामदास यांनीं संभाजीस केलेला उपदेश :**

**संभाजीस उद्देशून रामदासांनीं शके १६०३ मध्यें एक पत्र लिहिलें. रामदासांचें हें अखेरचें ऐतिहासिक निवेदन होय. 'आपल्या राज्यारोहणास**

समर्थांनीं रायगडीं यावें अशी संभाजीची इच्छा होती. परंतु समर्थांनीं ती अमान्य करून त्यास एक उपदेशपर 'लिखित' मात्र पाठविलें. त्यांत समर्थांच्या राजकारणाचें सार सांठविलेलें आहे.' (पांच संतकवी, शं. गो. तुळपुळे पृ. ४५३)

प्रस्तुत उताऱ्यांत दिलेला 'मराठा तितुका मेळवावा। महाराष्ट्र धर्म वाढवावा' हा चरण संभाजीस लिहिलेल्या पत्रांतील नसून शिवाजीस लिहिलेल्या पत्रांतील आहे. संभाजीस लिहिलेल्या पत्रांतील कांहीं भाग—

बहुत लोक मेळवावे। एकविचारें भरावें।
कष्टें करूनि घसरावें। म्लेंछांवरी।
आहे तितुकें जतन करावें। पुढें आणिक मिळवावें।
मऱ्हाष्ट्रराज्य करावें। जिकडे तिकडे॥
लोकीं हिंमत धरावी। शर्तीची तरवार करावी।
चढती वाढती पदवी। पावाल येणें॥
शिवराजास आठवावें। जीवित्व तृणवत् मानावें।
इहलोकीं परलोकीं राहावें। कीर्तिरूपें॥

**महाराष्ट्रधर्म :** शिवाजीस उद्देशून लिहिलेल्या प्रकरणांत महाराष्ट्रधर्माचें स्वरूप वर्णिलें आहे. शके १५७१ मध्यें म्हणजे शिवाजीस अनुग्रह करण्यापूर्वीच रामदासांनीं सांगितलें :

तीर्थक्षेत्रें मोडिलीं। ब्राह्मणस्थानें भ्रष्ट झालीं।
सकळ पृथ्वी आंदोळली। धर्म गेला॥
देवधर्मगोब्राह्मण। करावया संरक्षण।
हृदयस्थ जाला नारायण। प्रेरणा केली।
या भूमंडळाचे ठायीं। धर्म रक्षी ऐसा नाहीं।
महाराष्ट्रधर्म राहिला कांहीं। तुम्हांकरितां॥
उदंड राजकारण तटलें। तेणें चित्त विभागिलें।
प्रसंग नसतां लिहिलें। क्षमा केली पाहिजे॥

नंतर शिवाजीची भेट झाल्यावर त्यास उद्देशून 'क्षात्रधर्म' प्रकरण लिहिलें. त्यांत सांगितलें :

म्लेंच्छ दुर्जन उदंड । बहुतां दिसांचें माजलें बंड ।
या कारणें अखंड । सावधान असावें ॥
मारितां मारितां मरावें । येणें गतीस पावावें ।
फिरोनि येतां भोगावें । महद्भाग्य ॥
देवमात्र उच्छेदिला । जित्यापरिस मृत्यु भला ।
आपुला स्वधर्म बुडविला । ऐसें समजावें ॥
मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्रधर्म वाढवावा ।
येविषयीं न करितां तकवा । पूर्वज हांसती ॥
देवद्रोही तितुके कुत्ते । मारूनि घालावे परते ।
देवदास पावती फत्ते । यदर्थीं संशय नाहीं ॥
देव मस्तकीं धरावा । अवघा हलकल्लोळ करावा ।
मुलुखबडवा कां बुडवावा । धर्मसंस्थापनेसाठीं ॥

'समर्थांनीं ज्याला महाराष्ट्रधर्म म्हणून संज्ञा दिली तो केवळ हिंदुधर्मच नव्हे. महाराष्ट्रधर्मांत स्वराज्यस्थापनेचा व गोब्राह्मणप्रतिपालनाचाही अंतर्भाव होतो.' ( राजवाडे )

पृ. १५. **महीपती :** महीपतीबुवा ताराबादकर ( १७१५ – १७९० ) मराठी कवि व संतचरित्रकार. नगर जिल्ह्यांत राहुरी तालुक्यांतील ताराबाद गांवचा राहणारा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. तुकाराम महाराजांनीं संतचरित्रें लिहिण्याबद्दल त्यास स्वप्नांत येऊन दृष्टान्त दिला. त्यानें भक्तविजय, भक्तलीलामृत, संतविजय हे चरित्रग्रंथ लिहिले.

**देवगिरीचे यादव राजे :** रामदेवराय यादव याची कारकीर्द इ. स. १२७१ ते १३०९ अशी झाली. ज्ञानेश्वरांचा जीवनकाल इ. स. १२७५ ते १२९६. ज्ञानेश्वरी इ. स. १२९० मध्यें लिहिली. रामदेवराबद्दल ज्ञानेश्वरींत अठराव्या अध्यायांत पुढील उल्लेख आहे.

तेथ यदुवंशविलासु । जो सकळकलानिवासु ।
न्यायातें पोषी क्षितीषु । श्रीरामचंद्र ॥ १८०५ ॥

**बल्लाळराजांचे वेळीं मुकुंदराज०** मुकुंदराज (इ. स. ११२८-११९८) हा मराठींतला आद्य कवि होय. त्याचा विवेकसिंधु हा मराठींत संपूर्ण लिहिलेला असा पहिला ग्रंथ होय. तो शके अकरा दाहोत्तरू (श. १११० ) मध्यें लिहिलेला आहे. त्या वेळीं यादवांपैकीं जैत्रपाळ किंवा जयंतपाळ राज्य करीत होता. बल्लाळराजा हा जयंतपाळाचा बाप होय. (विवेकसिंधु पूर्वार्ध अ.७·१५५).

पृ. १६. **नानक :** (१४६९–१५३८) दिल्लीस लोदी घराण्याची कारकीर्द चालू होती त्या वेळीं या शीखधर्म संस्थापकाचा जन्म झाला. याच्या मृत्यु-समयीं, हुमायुनानें आग्रा येथून पळ काढल्यावर शेरशहाची सत्ता सुरू होत होती.

**चैतन्य :** कृष्ण चैतन्य ( १४०५–१५३३ ) बंगालमध्यें होऊन गेलेला भगवद्भक्त. बंगालमध्यें यानें वैष्णवधर्माची स्थापना केली. त्याचा बहुतेक काळ ओरिसांत गेला. त्याच्या कृष्णभक्तीचें मुसलमानांनाही आकर्षण वाटलें.

**शाक्तधर्म :** शिवाची पत्नी काली हीच शक्ति. तिची उपासना करणारा हा धर्मपंथ विश्वांतील स्त्रीतत्त्वास पूज्य मानतो. स्त्रीतत्त्वपूजनांतूनच या पंथांत वामाचाराचा अतिरेक झाला. शाक्त मद्य, मांस, हा शक्तीचा प्रसाद म्हणून सेवन करीत.

**रामानंद :** ( १३००–१४११ ) वैष्णव पंथाचा प्रवर्तक. रामानुज, कबीर हे रामानंदाचे शिष्य होत.

**रोहिदास :** साध्वी मिराबाई हिचा हा गुरु. हा कबीराचा समकालीन असावा. हा जातीचा चांभार होता. त्याचा जन्म उत्तर हिंदुस्थानांत झाला. रैदास, रविदास असेंही यास म्हणतात..

**शेख महंमद :** चांभारगोंद्याजवळ सईवाहिरें या गांवीं होऊन गेलेला साधुपुरुष. हा जातीनें मुसलमान असून यानें भागवत धर्म स्वीकारला. यानें मराठीमध्यें अध्यात्मग्रंथ लिहिले आहेत.

**बोधलेबुवा :** ( सुमारें १६२५ ). तुकारामाचा समकालीन, सोलापूर जिल्ह्यांतील धामणगांवचा पाटील, माणकोजी बोधले. याचें आडनांव जगताप.

१७. **लेकी साहेबांनीं म्हटल्याप्रमाणें** : मूळ लेखांत पुढील वाक्य आहे: As Mr. Lecky has remarked it is the atmosphere of child-like credulity which predisposes men to require and accept these wonders and miracles as events of ordinary occurrence. लेकी ( १८३८–१९०३ ) हा प्रसिद्ध आयरिश इतिहासलेखक होता.

१८. **धर्मसंशोधनाची चळवळ** : लोकांच्या अज्ञानाचा फायदा घेऊन त्यांच्यावर आपल्या आज्ञा लादण्याच्या धर्मगुरूंच्या अरेरावीविरुद्ध युरोपांत झालेली चळवळ. तिचा आरंभ लूथरनें १५१७ मध्यें केला. त्या चळवळींतून प्रॉटेस्टंट पंथ निघाला. या चळवळीस 'रेफर्मेशन' म्हणतात.

**इंडल्जन्स** : धर्मगुरूंजवळ आपलीं पापें सांगून पापविमोचन मिळविणें हा ख्रिस्ती धर्मांत एक विधि आहे. असें पापनिवेदन करणारास धर्मगुरु पापमुक्तीचा एक परवाना देत असत. त्या मुक्तिपत्रास इंडल्जन्स म्हणत.

**मार्टिन लूथर** : (१४८३–१५४६) जर्मन प्रॉटेस्टंट सुधारक. पोपच्या पापविमोचनपत्राचा धिक्कार करून यानें धर्मक्रांतीस आरंभ केला. १५२१ पासून बायबलचें जर्मन भाषेंत भाषांतर करण्यास आरंभ करून १३ वर्षें अखंड श्रम करून त्यानें हें कार्य पूर्ण केलें.

**मालोपंतः** (सुमारें १६८६) संतचरित्र नांवाचा ग्रंथ यानें लिहिला. हा विजापुरास मादण्णा या कर्तबगार कारभाऱ्याच्या हाताखालीं होता.

पृ. २१. **माणिकप्रभु** : ( १८२१–१८६५ ). अलौकिक सामर्थ्याबद्दल यांची लहानपणींच प्रसिद्ध झाली. राजविलासीं राहणी व वैराग्य यांचें अलौकिक मिश्रण यांच्या ठिकाणीं होतें. ते हिंदु व मुसलमान यांस सारखेंच वागवीत.

२५. **मोठ्या खाडीस पूल बांधणें** : To bridge the gulf या वाक्प्रचाराचें भाषांतर !

२८. **उद्धव** : ( १६०४–१६९३ ) रामदासाचा पहिला शिष्य.

**गो. ग. आगरकर ( १८५६–१८९५ )**

## ५. सामाजिक सुधारणा आणि कायदा

( हा उतारा संपूर्ण आगरकर निबंध संग्रह भाग २ पूर्वार्ध या पुस्तकांतून– पृ. ७२ ते ८३–घेतला आहे. मूळ निबंधांतील कांहीं भाग गाळला हें फुल्यांनीं सूचित केलें आहे )

३१. **सतीची चाल बंद करण्याचा कायदा :** हा कायदा ५ डिसेंबर १८२९ रोजीं झाला. ही चाल बंद करण्याबद्दल राममोहन रॉय इत्यादिकांनीं सरकारला विनंतीअर्ज पाठविले होते.

**पुनर्विवाह कायदेशीर ठरला :** १८५६ मध्यें विधवापुनर्विवाह कायदा झाला. त्या कामीं पं. ईश्वरचंद्र विद्यासागर यांनीं चळवळ केली होती.

३५. **कृतांतकटकामल :** मोरोपंतांच्या केकावलींतील एका 'केके'तील चरण.

३७. **कायदा फार झालें तर :** संमतिवयाचा कायदा : १९ मार्च १८९१ रोजीं हा कायदा झाला. या कायद्यानें असें ठरलें कीं, मुलीच्या वयाच्या १२ व्या वर्षापूर्वी संभोग करणें तें तिच्या संमतिविरुद्ध कृत्य ठरतें व तो गुन्हा होतो. अर्थात् मुलीचा १२ व्या वर्षापूर्वी विवाह या कायद्यानें गुन्हा ठरून बालविवाहास बंदी झाली.

३९. **ब्रॅड्लॉ :** (१८३३–१८९१). हे पार्लमेंटचे सभासद हिंदुस्थानचे कैवारी होते. ते १८८९ सालीं राष्ट्रीय सभेस हजर होते.

**ह्यूम.** ए. ओ. ह्यूम (१८२९–१९१२) हे एक सरकारी अधिकारी होते. १८८२ मध्यें सेवानिवृत्त झाल्यावर ह्यांनीं हिंदी जनतेचे विचार सरकारला कळविण्यासाठीं एखादी संस्था स्थापण्याची खटपट केली आणि ती कल्पना लॉर्ड डफरिन यांना पटविली. त्यांच्या प्रयत्नाचें फळ म्हणजे कलकत्त्यास इंडियन नॅशनल लीग स्थापन झाली. (१८८३) आणि तिच्यातर्फे २८ डिसेंबर १८८५ रोजीं राष्ट्रीय सभेचें पहिलें अधिवेशन झालें.

## ६. गुलामांचें राष्ट्र

(हा उतारा संपूर्ण आगरकर—निबंधसंग्रह भा. १ ला या ग्रंथांतून याच नांवाच्या निबंधांतून घेतला आहे. उताऱ्यास आरंभ वरील पुस्तकांत पृ. १९१ वर झाला आहे.)

४३. **जास्टिनियन :** (४८३–५६५) रोमन बादशाहा. कायद्याच्या ग्रंथामुळें (कोड) त्याची विशेष प्रसिद्धि झाली. तो इ. स. ५२७ मध्यें बादशहा झाला.

४३. **सायणाचार्य :** ( मृत्यु १३८७. ) विजयनगरच्या संस्थापकांपैकीं बुक्क याचा हा आश्रित होता. यानें चारही वेदांवर भाष्यें लिहिलीं.

**मम्मट :** ( सुमारें ११०० ) काश्मीरांत जन्मलेला हा महापंडित काव्य-प्रकाश या ग्रंथामुळें प्रसिद्धि पावला.

**चरक :** ( इ. स. तिसरें शतक ) प्रसिद्ध आयुर्वेदाचार्य. तो कनिष्काचा राजवैद्य होता. चरकसंहिता हा त्याचा ग्रंथ प्रसिद्ध आहे.

**सुश्रुत :** यानें आयुर्वेदावर अतिशय मूल्यवान् ग्रंथ लिहिला. तो सुश्रुत याच नांवानें ओळखला जातो. त्या ग्रंथांत शस्त्रक्रियेचाही विचार केला आहे.

४८. **ख्रिस्त्याच्या हातचें चहाच्या पाण्यासारखें** इ० पुण्यांत गाजलेल्या पंचहौद मिशनमधील चहाप्रकरणाचा हा उल्लेख आहे. १८९१ च्या आक्टो-बरमध्यें पुण्यास वेताळ पेठेंतील पंचहौद मिशन शाळेंत पुण्यांतील कांहीं विद्वानांना बोलावण्यांत आलें. तेथें व्याख्यानानंतर चहापान झालें. त्याप्रसंगीं न्या. मू. रानडे व टिकळही होते. ख्रिस्त्याच्या हातचा चहा घेतल्याबद्दल लगेंच या मंडळीविरुद्ध पुणेंवैभव या वृत्तपत्रांत वादळ उठलें. हें प्रकरण शंकराचार्यापर्यंत गेलें. श्रींनीं प्रायश्चित्ताची शिक्षा सांगितली. त्याप्रमाणें टिळकांनीं काशीस जाऊन प्रायश्चित्त घेतलें ! रानडे यांनींही प्रायश्चित्त घेतलें. परंतु ज्यांनीं प्रायश्चित्त घेण्याचें नाकारलें त्यांच्यावर बहिष्कार घालण्यांत आला ! सुधारणावादी सुशिक्षितांना पेंचांत आणण्यासाठीं गोपाळराव जोशी नांवाच्या गृहस्थांनीं हा सर्व बनाव घडवून आणला होता. ( टिळकचरित्र भा. १– २८६ ते ३१२ पाहा. )

**म. शि. गोळे ( १८५८–१९०७ )**

## ७ न बुद्धिभेदं जनयेत्

[ गोळे यांच्या हिंदुधर्म आणि सुधारणा या ग्रंथांतून भा. ४१ वा ( पृ. २७६ ते २८३ ) ‘ सुधारणा सुचविण्यांत केवढी सावधगिरी राखणें जरूर असते ’ या प्रकरणांतून या उताऱ्याचा पृ. ६४ पर्यंतचा भाग घेतला आहे. आणि पृ. ६४ ते ६७ हा भाग वरील पुस्तकांतील भाग ३५ वा ‘ समाजाचें साहजिक स्थित्यंतर ’ या प्रकरणांतून घेतला आहे. ]

पृ. ५६. इमर्सन्चा मूळ उतारा मूळ पुस्तकांत पृ. २७६ व २७७ या पृष्ठांवर पायटीपेंत दिला आहे. तो On the Sovereignty of Ethic या इमर्सन्च्या पुस्तकांतील आहे. त्यांतील महत्त्वाचा भाग.

Worship is the regard for what is above us. Men are respectable only as they respect..................

Superstitious persons we see with respect, because their whole existence is not bounded by their hats and their shoes, but they walk attended by pictures of the imagination, to which they pay homage. You connot impoverish a man by taking away these objects above him without ruin. It is very sad to see men who think their goodness made of themselves. It is very greatful to see those who hold an opinion the reverse of this.

All ages of belief have been great; all of unbelief have been mean. The Orientals believe in Fate. That which shall befall them is written on the iron leaf. They will not turn on their heel to avoid famine, plague or the sword of the enemy. That is great and gives a great air to the people.

इमर्सन् : ( १८०३–१८८२ ) प्रसिद्ध अमेरिकन तत्त्वज्ञ, निबंधकार आणि कवि.

५९. काल्व्हिन् जॉन : ( १५०९–१५६४ ). प्रॉटेस्टंट पंथाचा फ्रान्स मधील पुरस्कर्ता. फ्रान्समध्यें कॅथॉलिक पंथाविरुद्ध चळवळ केल्यानें त्यास देशांतर करावें लागलें. तो जिनेव्हास गेला. त्याच्यामुळें जिनेव्हा हें त्या पंथाचें मुख्य पीठ झालें.

६२. धर्मसंस्थापनार्थाय० गीता ४—८

६४. न बुद्धिभेद जनयेत्० गीता ३—२६

धोंडो केशव कर्वे ( १८५८ )

## ८ माझ्या जीवनाचें तात्त्विक अधिष्ठान

( हा लेख ‘ नवभारत ’ मासिकाच्या जाने. १९४८ च्या अंकांत आलेला होता. )

६५. जो सर्वां० ज्ञानेश्वरी १२–१४३

कीं गाईची तृषा० ज्ञानेश्वरी १२–१४६. वरील ओव्या गीता अ. १२ श्लोक १३ यावर भाष्य करतांना ज्ञानेश्वरांनीं लिहिल्या आहेत. तो मूळ श्लोक :

अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।
निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ।।

६६. मुंबईत झालेला पुनर्विवाह : मुंबईस पहिला पुनर्विवाह १८३५ सालीं गौडसारस्वतांत झाला. १८६५ सालीं कोंकणस्थांत पहिला पुनर्विवाह झाला.

पुण्यांतील पहिला पुनर्विवाह १८७४ सालीं अण्णासाहेब भांडारकर यांच्या घरीं झाला. त्याच घरीं अण्णासाहेब कर्वे यांचा पुनर्विवाह ९–३–१८९३ रोजीं झाला. ( आत्मवृत्त पृ. १९२ )

मिल्ल : जॉन स्टुअर्ट मिल : ( १८०६–१८७३). उपयुक्ततावादी तत्त्ववेत्ता व अर्थशास्त्रज्ञ. याच्या अर्थशास्त्रविषयक सिद्धान्ताची व स्त्रीदास्य-विमोचनाच्या मार्गाची १९ व्या शतकांतील हिंदी समाजसुधारकांवर विशेष छाप पडली.

स्पेन्सर : हर्बर्ट स्पेन्सर : ( १८२०–१९०३ ) प्रसिद्ध इंग्रज तत्त्ववेत्ता. विश्वाची अखंड उन्नति होत आहे या तत्त्वाचें त्यानें विवेचन केलें. मानस-शास्त्रावरही यानें महत्त्वाचे विचार मांडले.

६७. प्रथम पत्नी वारली : अण्णासाहेबांची प्रथम पत्नी राधाबाई या श्रावण शु. ५ शके १८१३ या दिवशीं मरण पावल्या.

६८. आश्रमाची स्थापना : १४–६–१८९६ रोजीं अनाथबालिकाश्रम मंडळी स्थापन झाली. १–१–१८९९ रोजीं आश्रमाचें प्रत्यक्ष कार्य सदाशिव पेठेंत पेरू गेटाजवळ गोरे यांच्या वाड्यांत सुरू झालें. आरंभीं आश्रमांत एकच विधवा होती.

महिलाविद्यालय : ४–३–१९०७ रोजीं रंगपंचमीच्या दिवशीं लकडी पुलाजवळील एका जुन्या पडक्या पण प्रशस्त वाड्यांत सहा विद्यार्थिनींनिशीं हें विद्यालय सुरू झालें. ( आत्मवृत्त पृ. ३८८ ).

पृ. ६९. **निष्काम कर्ममठ :** ४–११–१९०८ रोजी मुंबईस गिरगांव पोलीस कोर्टाजवळील सेवासदनमध्यें या मठाची स्थापना झाली. या नांवाविषयीं आत्मवृत्तांत पुढील खुलासा आहे : मनःशुद्धि, वैराग्य, निःस्वार्थता वगैरे पौर्वात्यांच्या कल्पना व 'मिशन' या पाश्चात्य शब्दानें ध्वनित होणाऱ्या शिक्षण, लोकसेवा इत्यादि उपयुक्त कार्यांच्या कल्पना यांच्या समुच्चयाचा निर्देश होण्यासाठीं आम्हीं हें नांव योजिलें आहे. अलीकडे रूढ झालेल्या अर्थानें मठ या शब्दाचा उपयोग केलेला नाहीं. 'मठश्छात्रादिनिलयः' असा मठ शब्दाचा अर्थ एका कोशकारानें दिलेला आहे (आत्मवृत्त ४३३).

७४. **देवसमाज :** विश्वबंधुत्वाच्या भूमिकेवर समाजसेवा करणारी ही संस्था १८८७ साली स्थापन झाली. पंजाबांत या संस्थेनें बऱ्याच शाळा काढल्या. अस्पृश्य व गुन्हेगार यांच्यासाठीं शाळा काढणें हें या संस्थेचें विशेष कार्य होय. शिक्षणानें समाजाची नैतिक पातळी वाढविण्यावर संस्थेचा विशेष भर आहे.

"**श्रद्धावान् लभते मोक्षम् :**" गीतेंत 'ज्ञानम्' हा शब्द आहे. गीता अ. ४, श्लो. ३९ :

**श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्पर : संयतेन्द्रिय : ।**
**ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छाति ॥**

**विवेकानंद :** ( १८६२–१९०२ )

## ९ शिवोऽहम्

( हा उतारा स्वामी विवेकानंद यांचे समग्र ग्रंथ, पंचम खंड या पुस्तकांतून पृ. ६२ पासून घेतला आहे. हें कोलंबो येथें दिलेलें व्याख्यान आहे. )

७९. **नैनं छिंदंति :** गीता २–२३

८०. **नचिकेतस् :** उद्दालक ऋषीचा पुत्र. यानें अल्प वयांतच ब्रह्मविद्या यमाकडून संपादन केली. तैत्तिरीय ब्राह्मण व कठोपनिषद् यांत याचा वृत्तान्त आहे. श्रेष्ठज्ञानसंपादनाचा कठोर निश्चय पार पाडण्याबद्दल नाचिकेताचें नांव प्रसिद्ध आहे.

८४. **कर्मण्येवाधिकारस्ते :** गीता २–४७.

## १० हिंदुस्थानचा भविष्यकाल

( हा उतारा विवेकानंद यांचे समग्र ग्रंथ खं. ५ पृ. २०९ पासून घेतला आहे. )

९१. अंगं गलितं पलितं मुंडम्

शंकराचार्यकृत चर्पटपंजरिकास्तोत्रांत हा चरण आहे:—

अंगं गलितं पलितं मुंडं दशनविहीनं जातं तुंडम्

**चार्वाक :** अवंती प्रांतीं होऊन गेलेला कट्टर नास्तिकवादी. भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः । ऋणं कृत्वा घृतं पिबेत् । इत्यादि याच्या तत्त्वज्ञानाचीं वचनें प्रसिद्ध आहेत.

९७. जिहोवा Jehovah इस्राइलमधील एक देव. तो विश्वकर्ता आहे असा जुन्या बायबलमध्यें उल्लेख आहे.

**ना. गो. चापेकर ( १८६९ )**

## १२ मनुष्यस्वभाव

( समाजनियंत्रण या ग्रंथांतील हें दुसरें प्रकरण आहे. पृ. ६ ते २१ )

**वि. रा. शिंदे ( १८७३–१९४४ )**

## १३ धर्मसंघाची आवश्यकता

( शिंदे यांचे लेख, व्याख्यानें व उपदेश या ग्रंथांतील पृ. १९४ वर दिलेल्या व्याख्यानांतील उतारा. २३ जून १९०७ रोजीं प्रार्थनामंदिरांत दिलेलें हें व्याख्यान आहे. )

११८. सरकारी धर्मसंघ इंग्लंडच्या राजानें बळकाविला. १५२७ मध्यें आठव्या हेन्रीनें राणीशीं घटस्फोट करण्याच्या बाबतींत पोपची धार्मिकसत्ता झुगारून दिली.

**नॉन्कन्फॉर्मिस्ट :** इंग्लंडमध्यें १० व्या शतकांत उदयास आलेला धर्मसुधारकांचा एक पंथ.

**प्रेस्बिटर्स :** धर्मव्यवस्था एकतंत्री राहूं नये, ती विचारवंतांच्या प्रतिनिधींच्या हातीं ( प्रेसबिटर–वडील, ज्येष्ठ ) असावी अशा मताचा स्कॉटलंडमधील एक पंथ. १५२३ मध्यें हा पंथ उदयास आला.

**कॉंग्रेगेशनॅलिस्ट :** धार्मिक बाबतींत स्थानिक-स्वराज्यासारखी स्वायत्तता असावी असें मानणारा प्रॉटेस्टंट पंथ.

**मुक्तिफौज :** ( साल्व्हेशन आर्मी ) जनरल बूथ यानें १८७७ मध्यें ख्रिस्तीधर्मप्रसारार्थ ही लष्करी पद्धतीची संस्था काढली. समाजोपयोगी अनेक संस्था या संस्थेतर्फे देशोदेशीं चालू आहेत. गुन्हेगारांची सुधारणा करण्याचेंहि कार्य ही संस्था करते. हिंदुस्थानांत १८८२ सालीं या संस्थेच्या कार्यास आरंभ झाला.

११९. जे कां रंजले :—तुकारामाचा प्रसिद्ध अभंग :

जे कां रंजले गांजले । त्यांसी म्हणे जो आपुले ।
साधु तोची ओळखावा । देव तेथेंची जाणावा।

## १४ शासनयोग

( शिंदे यांच्या 'लेख, व्याख्यानें व उपदेश' या ग्रंथांतील पृ. २०१ वर दिलेला उपदेश. )

१२१. Kant इम्यान्युएल कान्ट (१७२४–१८०४). जर्मन तत्त्वज्ञानी. सर्व व्यवहारांत आपलें कर्तव्य बजावलें म्हणजे ईश्वराची खरी भक्ति झाली असें त्याचें मत होतें.

वि. दा. सावरकर (१८८३)

## १५ मनुष्याचा देव आणि विश्वाचा देव

( सावरकर साहित्य भा. १ ला या ग्रंथांतून ( पृ. १६ ) हा निबंध घेतला आहे. )

१३१. दुर्गादेवीचा दुष्काळ : १४६८ मध्यें महाराष्ट्रांत जो दुष्काळ पडला तो ७ वर्षे टिकला. या काळांत महाराष्ट्रांतील अनेक प्रसिद्ध कुटुंबें परप्रांतीं स्थायिक झालीं. गोदावरी ते कृष्णा या टापूंत दुष्काळाचे परिणाम दीर्घकाल टिकले.

**टिटानिका :** १४ एप्रिल १९१२ रोजीं टिटानिका नांवाची बोट समुद्रांत तरंगणाऱ्या बर्फाच्या डोंगराच्या ( Iceberg ) घर्षणानें कापली जाऊन बुडाली. त्या काळांत ती सर्वांत मोठी बोट होती. बोटीवरील २२०१ लोकांपैकीं या अपघातांत १५०० लोक ठार झाले !

**देवनदी जॉर्डन :** खिस्ताची जन्मभूमि पॅलेस्टाइन प्रांत. त्यांतील सर्वांत मोठी नदी. यमुना नदीच्या श्रीकृष्णजीवनासंबंधीं जशा कथा आहेत तशा जॉर्डन नदीच्या खिस्तजीवनाविषयी कथा आहेत.

१३८. **चंगीझखान :** (११६३–१२२७) या मोंगल माणसानें आपल्या पराक्रमानें मध्य आशियांत बरीच सत्ता मिळविल्यावर इराण, काबूल, कंदाहार घेऊन चीनवरहि धडक मारली. अशा रीतीनें भारताच्या पांचपट विस्ताराइतका प्रदेश यानें जिंकला. आपल्या क्रौर्यानें यानें सर्वांना चळचळा कांपावयास लाविलें. विद्येचा हा कट्टर द्वेष्टा होता. अनेक प्राचीन ग्रंथालयांचा यानें संहार केला. यानें जवळ जवळ १॥ कोट माणसांची कत्तल केली. भारताकडे मात्र हा वळला नाहीं. बाबरची आई याच्या वंशांतली होती.

श्री. व्यं. केतकर ( १८८४–१९३७ )

## १६ समाजाचें धर्मनियमन व तें करणारा वर्ग

( केतकरांचे संकीर्ण लेख या पुस्तकांतून पृ. ७१ पासून हा व यापुढील हे उतारे घेतले आहेत. )

## १७ समाजशास्त्र आणि धर्मशास्त्र यांचा परस्पर संबंध

१४२. **चंदावरकर :** सर नारायण गणेश चंदावरकर (१८५५–१९२३) हायकोर्टाचे न्यायाधीश, विद्यापीठाचे कुलगुरु, कायदे मंडळाचे अध्यक्ष अशा बहुविध लौकिकाचे विद्वान्. सामाजिक सुधारणेंत ते प्रगतिपर होते. प्रार्थना-समाजाचे ते एक मान्यवर कार्यकर्ते होते.

१४६. **भांडारकर :** रामकृष्ण गोपाळ भांडारकर (१८३७–१९२५). जगप्रसिद्ध प्राच्यविद्यापंडित. पाश्चात्य विद्यापीठांनीं पदव्या देऊन यांचा गौरव केला इतकी यांनीं मान्यता संपादिली. त्यांनीं प्राच्य विद्येचें आधुनिक पद्धतीनें संशोधन करण्याची परंपरा इकडे सुरू केली. ते समाजसुधारक व प्रार्थनासमाजाचे कार्यकत होते.

१४७. **एक इंग्रज वृद्धा :** डॉ. ॲनी बेझंट ( १८६७–१९३४ या प्रसिद्ध विदुषीचा उल्लेख केतकरांनीं या शब्दांत केला आहे. या आंग्ल विदुषी १८९३ सालीं भारतांत आल्या. त्या आमरण याच देशांत होत्या.

वयाच्या ६७ व्या वर्षी हिंदी राजकारणांत त्या टिळकांच्याबरोबर कार्य करूं लागल्या; परंतु थिऑसफीचा प्रचार हें त्यांचें मुख्य कार्य. मद्रासजवळ अड्यार येथें थिऑसफीचें मोठें केंद्र यांच्यामुळें निर्माण झालें. धर्मशिक्षण देणारें पहिलें हिंदी विद्यापीठ यांनीं काशी येथें १८९८ सालीं काढलें.

श्री. म. माटे ( १८८६ )

## १८ जातीच्या हरळीचें मूळ

( विचारशलाका या पुस्तकांतून (पृ. २३–३४) हा निबंध घेतला आहे. )

१५४. डांगे : डांग हा फारसी शब्द आहे. त्याचा अर्थ डोंगराळ जमीन. या शब्दाचा धात्वर्थ पर्वतशिखर असा आहे.

हडप : या शब्दाचा अर्थ पानदान असा आहे. त्यावरून श्रीमंतांच्या घरीं विडे देणारा नोकर असा अर्थ.

बिनीवाले : बिनी–सैन्याची आघाडी. बिनीवाला–आघाडीवरील शिपाई किंवा आधिकारी.

१५५. लिंगायत : १२ व्या शतकाच्या उत्तरार्धांत स्थापन झालेला पंथ. या पंथांत सामान्य, विशेष, व निराभारी असे भेद आहेत; चार वर्ण आहेत; भक्त व माहेश्वर असे वर्ग आहेत. भक्तभेदांत पंचम, दीक्षित, शीलवंत, धूळपावड इ. उपभेद आहेत.

इरावती कर्वे (१९०५)

## १९ वाटचाल

( अभिरुची मासिकाच्या १९४९ सालच्या दीपावलीअंकांत आलेल्या लेखांतून हा उतारा निवडला आहे. )

१६०. भारुडें, खेळिये इ० : विशेषतः एकनाथानें लोकप्रिय केलेलीं हीं वेदान्तपर लोकगीतें आहेत. लौकिक व्यवहारांवर लौकिक भाषेंत रचिलेलीं हीं एक प्रकारचीं रूपकेंच होत. उदाहरणार्थ, एका भारुडाचा कांहीं भाग पाहा.

मी आलों रायाचा जोशी । होरा ऐका दादांनो ॥ ध्रु० ॥
मनाजी पाटील देहगांवचा । विश्वास धरूं नका त्याचा ॥

हा घात करील नेमाचा । पाडील फशीं ॥
वासना बायको शेजारीण । झगडा घाली मोठा दारुण ॥
तिच्या पायीं नागवण घर बुडविसी ॥

१६४. **पुत्रकामेष्टी** : पुत्रप्राप्तीसाठीं करावयाचा एक यज्ञ.

**कुरुपांचाल** : ब्राह्मणसंस्कृतीचें उगमस्थान असा इंद्रप्रस्थाजवळील प्रदेश. कुरु व पांचाल हीं कुलांचीं नांवें आहेत. ब्राह्मण या देशांत उत्पन्न झाले असा जैमिनीय उपनिषद् ब्राह्मणांत उल्लेख आहे.

१६४. **पुत्रप्राप्तीसाठीं मनूनें सांगितलेले मार्ग** : निपुत्रिक विधवेनें वडील दिरापासून, दीर नसल्यास सपिंडापासून पुत्रप्राप्ति करून घेण्याचा मार्ग मनुस्मृतींत ( अ. ९–५९ ) सांगितला आहे.

देवराद्वा सपिंडाद्वा स्त्रिया सम्यङ्नियुक्तया ।
प्रजेप्सिताधिगन्तव्या संतानस्य परिक्षये ॥ ९–५९.

या पद्धतीस नियोग असें नांव आहे. नियोगास गौतम, बौधायन, वसिष्ठ इत्यादि स्मृतिकारांनींही मान्यता दिली आहे.

१६५. **वैशाली** : गंडकी नदीच्या पूर्वेस हें नगर होतें. सध्यां तेथेंच बेसार नांवाचें खेडें आहे. बुद्धाच्या वेळीं तेथें शेंकडों बौद्ध विहार होते.

**श्रावस्ति** : कोसल देशाची राजधानी. रामाचा पुत्र लव येथें राज्य करीत होता.

**चंपा** : अंग देशाची ( बिहार प्रांताचा भाग ) राजधानी. अश्वमेध यज्ञाच्या वेळीं रामाचा लवकुशाशीं येथें संग्राम झाला. हें संस्कृत विद्येचें माहेरघर होतें.

**बोलरे काऊ** : ज्ञानेश्वरांच्या पदांपैकीं एक पद असें आहे :

पैल तो काऊ कोकताहे । शकुन गे माये सांगताहे ।
उड उड रे काऊ । तुझे सोनियानें मढवीन पाऊ ॥
पाहुणे पंढरीराऊ । घरा कैं येती ।

दाराशीं कावळ्याची कावकाव होणें ही घरीं पाहुणा येण्याची सूचना आहे अशी समजूत आहे.

**१६५. ताटीचे अभंग :** ज्ञानेश्वर एकदां संत्रस्त मनःस्थितींत घरांत एकटेच बसले होते व त्यांनीं आंतून ताटी (दार) लावून घेतली होती. मुक्ताबाई बाहेरून आली. तिनें ताटी उघडण्यासाठीं ज्ञानेश्वरास कळवळून विनंति केली :

**रागें भरावें कवणासी। आपण ब्रह्म सर्वदेशी।**
**ऐशी समदृष्टि करा। ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥**

अभंगाच्या भाषेवरून हे अभंग मुक्ताबाईचे नसावेत असें आजगांवकर म्हणतात (महाराष्ट्र-संत-कवयित्री पृ. ३९). हे ४२ अभंग उपलब्ध आहेत. त्यांस ताटीचे अभंग म्हणतात.

**१६९. मार्क्स :** (इ. स. १८१८–१८८३). **कार्ल मार्क्स :** जर्मन अर्थशास्त्रज्ञ, समाजसत्तावादी तत्त्ववेत्ता. अर्थमूलक विषमता हें सर्व दुःखांचें मूळ कारण आहे. तेव्हां श्रम या एकाच मूल्यानें संपत्तीची वांटणी व्हावी. श्रमजीवि, कामगार यांच्या हातीं सत्ता असावी, हीं तत्त्वें असलेल्या समाजसत्तावादाचा मार्क्स हा प्रणेता होय.

